मौज प्रकाशन : १७

आवृत्ति पहिली : १५०० प्रती
२४ मार्च, १९५५



वेष्टन : केशव फडके



मुद्रक :
वि. पु. भागवत
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, मुंबई ४

प्रकाशक :
वा. पु. भागवत
मौज प्रकाशन लि.
खटाववाडी, मुंबई ४

झोलायचा. पण माणूस कसला होता! साडेचार हात उंच. दोन हात जाडा. जेवायला बसला म्हणजे पायलीचा भात एका सपाट्याला उडवायचा.

त्यानं चार बायका केल्या होत्या. त्यांतली एक खाडीपलीकडे तिचं माहेर होतं, तिथं पळून गेली. हा गेला. बायकोच्या झिंज्या धरून तिला पाठुंगळीं टाकलीन्, नि तस्सा सबंध खाडी पोहून आला. बायको खाडीभर आरडत होती, नि त्याच्या पाठींत दणके घालीत होती. पण याला ढीम कांहीं झालं नाहीं! घरीं आणून बायकोला गाईच्या खुंट्याला बांधून घातलीन्, नी म्हणाला,

"रांड पळून जाती!"

असला राक्षस. पण कामालाहि तसलाच. सकाळीं एकदां नागलीच्या आठ-दहा भाकरी खाऊन कामाला लागला, कीं मग वाघासारखा दिवसभर कामाचे नाभाडे काढीत असायचा. काम जणुं थराथरा कापायचं त्याच्यापुढं.

एकदां राघोभटांनीं त्याला हांक घातली,

"गेंगाण्या—"

"वो."

"रे, एकदां हें रान काढून टाकायचांय्."

"मंगशीन् कारूं."

"मंगशीन् केव्हां? वाढलंय् बघ कसं अस्वलाच्या केसांसारखं."

"मंग म्हन्तांव् तरी काय्?"

"कुऱ्हाड घे घासून कुरुंदावर, नि चल माझ्याबरोबर."

दोघे कुऱ्हाडी पाजळून निघाले. धडाधडा झाडं तुटायला लागलीं. वावेंत मावणार नाहींत अशीं कुंभ्याचीं नि किंजळीचीं झाडं—पण कुऱ्हाडीच्या आठ-दहा घावांत गेंगाण्या भुईसपाट करायचा.

एक झाड होतं रानआवळीचं. राघोभट म्हणाले,

"गेंगाण्या, तें तोडूं नकोस रे."

"करायचां काय्? झंव् लागतील तितक्या आवली!"

"अरे, नको तोडूं सांगतांय् तुला!"

पण ऐकेल तर तो गेंगाण्या कसला? मुलखाचा धसमुसळ्या! त्यानं घाव घातलाच बुंध्यावर. तश्शी कुऱ्हाड मागं फिरली, नि हा रक्ताचा दोदाणा वहायला लागला त्यांतून!

कुऱ्हाड फेंकून दिली गेंगाण्यानं, नि फडाफडा आपल्याला थोबाडून घ्यायला

लागला. राघोभटांचं लक्ष नव्हतं. गेंगाण्याचा आरडा ऐकला, तशीं अचंब्यानं ते म्हणाले,

"रांडेच्या, वेड लागलं काय?"

"राघूकाका, मना—मना—"

"झालं काय?"

"हें आक्रीत बघा!"

"काय रे हें? कुऱ्हाड पायावर बसली कीं काय?"

"न्हाय्! आवलींतून निघतांय् रगात!"

हातांतली कुऱ्हाड खालीं टाकून राघोभटांनीं आवळीपुढं नमस्कार घातला. म्हणाले,

"आवळीमाते, आम्ही तुझीं लेकरं. गेंगाण्याला माहीत नव्हतं. त्यानं चुकून तुझ्यावर घाव घातला. तूंच आम्हांला एवढीं वर्सं वागवून घेतलंस. न कळतां अपराध झाला. आतां तूं द्रिष्टांत देईपर्यंत तुझ्या खालून उठायचा नाहीं. गेंगाण्याला झाडं तोडायला मीं सांगितलं होतं. त्याचा अपराध नाहीं हा. माझा आहे. शिक्षा करायची ती मला कर."

"राघूकाका, तुमांना कां शिक्षा? मना शिक्षा. मिनीं मारला घाव."

"गप्प बैस! तूं तरी मीं सांगितलं म्हणूनच कुऱ्हाड उचललीस ना?"

"पर आवली तोरूं नोको, असां तुमीं मना सांगलां व्हतांत्."

"तूं गप्प बैस! तुला कांहीं समजत नाहीं. माझा गडी तूं. बऱ्याचा धनी मी, अन् वाइटाचा तूं? तें नाहीं व्हायचं. मीच शिक्षा भोगीन."

खोत नि कूळ. दोघेहि हट्टी. दोघेहि मांड्या घालून बसले आवळीखालीं. हा म्हणतो, मी शिक्षा भोगीन. तो म्हणतो, मी भोगीन.

एक दिवस झाला, दोन झाले. खाणं नाहीं पिणं नाहीं. तिसऱ्या रात्रीं दोघांनाहि द्रिष्टांत झाला. अशी धवधवीत सवाशीण आली दोघांच्या स्वप्नांत. म्हणाली,

"मी कांहीं रागावल्यें नाहीं. पण झाड तोडूं नका, नि त्याच्याभोवतीं पार बांधा. आवळी अष्टमीला माझ्या नांवानं दोन कुमारिका जेवायला घालीत जा."

लगेच आवळीभोवतीं पार उभा राहिला.

झालं. झाडोरा तोडला. मोठाले रुख होते ते तसेच ठेवले. मुळ्या खणून काढायला लागले. लागवडीस आणायची होती ना जमीन? म्हणून. भिवऱ्या

म्हणून दुसरं एक कुळ होतं, तें, गेंगाण्या नि राघोभट तिघे चोंढे पाडायला लागले.

एका ठिकाणीं होतं एक टेकूड. नेमकीं नव्हेत, पण अंधुक अंधुकशीं बिळंहि दिसत होतीं. गेंगाण्या नि भिवऱ्या दोघे कुदळी घेऊन टेकूड उकरायला लागले. वरचा पापुद्रा दूर केला, तशीं बिळं उघडीं पडलीं. राघोभट धोंडी रचीत होते बांधावर, ते आरडले,

"गेंगाण्या, बिळं दिसताएत रे! सांभाळून उकरा!"

गेंगाण्या फिदीफिदी हसला नि म्हणाला,

"आमचा खोत ढुंगान खाजवायचां असंल तरी बी सांबाळून खाजवील! गळूं बिळूं झालां तर!"

"गेंगान्या, तुजां बी असलां इद्रूप बोलनां! रागूकाका उगीच काय बी सांगायचा न्हाय!"

"भिवऱ्या, माजां म्हन्नां असां हाय, कीं हा ट्येकूर खनाया नको?"

"चालूं द्ये, चालूं द्ये! तुजां बोलनां ऐकतांना मना तरास येतो."

गेंगाण्या आपल्या तळहातांवर थुंकला, नि दोन्ही हात चोळून त्यानं पुनः कुदळ उचललीन्. एक घाव घातलान् तशीं फोऽऽ असा लांबवेरी ऐकूं जाणारा धुंदारा सोडीत हे येवढे थोरले महाराज बाहेर पडले! हे असले जाड!

पिवळा धमक! डोळ्यांवर पापण्या लोंबताहेत. अंगावर बोट बोट केस. बाहेर येतांच सुपाएवढी फणा काढलीन्, नि भात भरडायच्या जात्याच्या तळीएवढं वेटोळं घालून बसला!

भिवऱ्यानं गेंगाण्याचा बाव्हटा धरून त्याला मागं ओढलंन्. एवढा राक्षस गेंगाण्या खरा, पण तोहि कुदळ खालीं सोडून वेंधळ्यासारखा टुकुटुकु बघायला लागला. घाम फुटला त्याला.

फोफाटा ऐकला नि तस्से राघोभट धावत आले. गेंगाण्याला मागं घालून ते दांडकं उचलून पुढं झाले. तंवर गेंगाण्याहि सावरला. त्यानं कळकीचा दांडा पडला होता, तो उचलला. भिवऱ्यानंहि एक लाकडू उचललंन्.

पण नागोबा थंडपणं यांच्याकडे पहातोय्! गेंगाण्या म्हणाला,

"मांगं व्हा तुम्ही राघूकाका!"

"ऐक रांडेच्या! काम मोठं आहे. जरा विचार करून मारला पाहिजे घाव. तूं तस्सा पलीकडून हो, त्या बांधाच्या अंगानं. सांभाळून हो!"

तिघे तिहींकडून झाले. राघोभटांनीं दांडकं वर केलं, तसा चमत्कार काय

तो ऐका! नाग आपला डोलतोय्! नको मारूं म्हणतोय्! आंसवं गळताहेत त्याच्या डोळ्यांतनं!

राघोभटांची नि त्याची दृष्टिभेट झाली. दोघे एकमेकांकडे पहाताहेत. एकदम राघोभटांनीं दांडकं खालीं घेतलं, नि आरडले,

"गेंगाण्या!"

"वो!"

"मागं सर."

"कां वो राघूकाका?"

"अरे, रडतोय् नाग. मारूं नको म्हणतोय्."

"पन् काका, माजां डास धरील—"

"नाहीं धरायचा."

हताश होऊन मागं सरला गेंगाण्या. दांडा खांद्यावर टाकून म्हणाला,

"मग आतां काय करायचां?"

"थांबवा काम. पुरे झालं आज. हे महाराज जाताहेत कुठं, तेवढं पहा म्हंजे झालं."

तिघेहि बांधावर बसले. संथपणं नाग आपला बिळांत शिरला. गेंगाण्या दिवसभर कुरकुरत राह्यला. त्याचं काय म्हणणं, कीं मीं कुदळ मारल्यै, माझा दंश धरणार नाग. शेवटीं चिडून राघोभट म्हणाले,

"गेंगाण्या, आला नाग तुला चावायला, मग मी होईन हो पुढं! मला चाववून घेईन."

"पन राघूकाका, तुमाला सोधायचां खुटं?"

"मी माझ्या पंचाच्या कासोटीला बांधून ठेवतों तुला, नाहीं तर तूं तुझ्या लंगोटीच्या टोकाला बांध मला. रांडेच्या, सांगतोंय् तुला, नाहीं दंश धरायचा हा नाग. अरे, हा कांहीं साधा नाग नव्हे!"

रात्र झाली. राघोभटांनीं गेंगाण्याला ओसरीवर सावध झोंपायला सांगितलं, नि आपण झोंपले अंगणांत. पहिल्या रात्रीं एकदम दचकून जागे झाले ते.

"गेंगाण्या—"

"वो!"

"कण्हतोएस रे कां?"

"मी नाय बा."

"तूं नाहीं तर कोण मी ? चांगलं स्वच्छ कण्हणं ऐकूं येतंय्."

"व्हय, पर मी नांय्."

"मग कोण ? वाटेचा चोर ?"

"त्ये मनां हो काय म्हाईत ?"

रात्रभर आपलं कण्हणं ऐकूं येतंय्. पहाटे पहाटे बंद. उजाडल्यावर पाहिलं हिकडेतिकडे शोधून तें कुठं कांहीं नाहीं.

दुसऱ्या दिवशीं तेवढा टेकाडाचा भाग सोडून बाकीचे चोढे पाडले, नि रात्रीं पुनः आदल्या दिवसासारखे झोंपले हे दोघे. त्या रात्रीं झोंप लागत्ये न लागत्ये तों राघोभटांच्या स्वप्नांत एक जख्ख म्हातारा उभा! डोळ्यांत पाणी. घसा सुजलेला. म्हणाला,

"खोता, मी जुन्या धामधुमींतल्या दाभोळच्या राजाचा प्रधान. राजाला राज्य सोडून पळावं लागलं, तसा मीहि या अरण्यांत लपून बसलों. हितंच मेलों मी. वासना राह्यली, म्हणून नाग झालों. काल तुमच्या दृष्टीस पडलों. एखादा असता, तर मला मारताच. तूं भला माणूस. मला सोडून दिलंस.

"आणखी एक काम कर माझं. गंडमाळा झाल्यैत मला. तेवढ्या कापून काढ. काल रात्रीं मीच कण्हत होतों. घाबरूं नकोस. चावायचा नाहीं मी. उद्यां सकाळीं माझ्या बिळाजवळ ये."

स्वप्नांतून जागे झाले राघोभट. त्यांनीं गेंगाण्याला हांक घालून उठवलं, नि हा दृष्टांत सांगितला.

"मग काय करायचा यवजलांव् ?"

"करतोएस काय ? एवढा आला बापडा स्वप्नांत. कळवळून सांगितलंन्. जायचं नि काढायच्या गंडमाळा."

सकाळीं घरीं न सांगतां कट्यार घेऊन बाहेर पडले राघोभट. तिकडून आला गेंगाण्या. त्याच्या हातीं चिलखत.

"चिलखत रे कशाला आणलांएस ?"

"इक्तां आंगावर घालून मंग गंडमाला कापा."

"तें रे कशाला सोंग आणखी ?"

"न्हाय काका. इक्तां घाला."

"अरे चावायचा नाहीं तो. दृष्टांत दिलाएन्."

"मला बी द्रिष्टांत झाला तुमाला चिलखत घालाया लावावा असा."

"तूं का ऐकायचाएस ? आण."

राघूकाकांनीं अंगावर चिलखत चढवलं, नि दोघे टेकाडाजवळ गेले.

"या महाराजा! आलोंय् गंडमाळा काढायला."

तशीं आपलं तें एवढं थोरलं धूड बाहेर निघालं, नि या दोघांच्या समोर येऊन आडवं पडलं!

"गेंगाण्या, असा पलीकडून हो. ही हळद घे. मीं कापलं कीं मग सांगेन तेव्हां घाल जखमेवर."

अलगद कट्यारीनं कापल्या गंडमाळा, नि वर गेंगाण्यानं हळद घातली. मग पट्टीनं बांधली जखम. दोघांनीं नमस्कार केला नि राघोभट म्हणाले,

"महाराजा, अशीच लागेल तेव्हां सेवा घेत जा."

त्या रात्रीं म्हातारा पुनः स्वप्नांत आला, नि म्हणाला,

"खोता, शाबास तुझी नि शाबास तुझ्या गड्याची. आतां माझं टेकूड तेवढं मोकळं सोडून भोतालीं बागा करा. चांगल्या उठून येतील. माझ्या मानेला चार चिरे दिलेस. तुझ्या चार पिढ्या सुखानं या बागा पिकवून खातील!"

राघोभट नेमानी नागपंचमीला त्या टेकडाजवळ इवलं दूध नि लाह्या नेऊन ठेवीत. अगदीं परवां व्यंकूभावजींच्या मनीं दळभद्रीपणा उभा राहीपर्यंत तो नेम चालू होता आमच्या घरीं. पण तें सगळं मग सांगेन.



चोंढे पाडले, बागा लावल्या—गांव हिरवागार दिसायला लागला. पण तेवढ्यांत आणखी एक अरिष्ट येऊन गेलं गांवावरून.

मराठे नि मुसुनमान यांच्या अंजनवेल अन् दाभोळेसाठीं सारख्या लढाया चालायच्या. दाभोळ बंदर ना? म्हणून. तर दाभोळेस मुसुनमानांचा चांगला जमाव. भल्या भक्कम जुन्या काळच्या मसुदी. बंदरपट्टीला सगळीं मुसुनमानांचीं घरं. आजहि तशींच आहेत.

पडघवली नि दाभोळच्या मधोमध एक भली उंच टेकडी आहे. एकटीच उभी आहे बापडी. चिवड्याची सुळकुंडी पुडी उपडी ठेवावी ना, तशी सुळके-दार. तिच्यावर आहे बालेपिराचं ठाणं. एऱ्हवीं पडघवलींत सुद्धां उन्हाळ्याच्या भरांत पाण्याचा कोण काहार! पण तेवढ्या उंच बालेपिराजवळ काळ्याशार पाण्याची कसली छानदार बाव आहे! त्या पट्ट्यांतल्या मुसुनमानांची बालेपिरावर

भारी श्रद्धा. कितीक आपले हिंदूसुद्धां त्याला गलेफ वाहण्याचा नवस बोलतात.

त्या बालेपिराचीहि कथाच आहे. पहिला समुद्र म्हणे तेव्हढा उंच होता. हें आपलं कांहीं तरीच आहे हो! पण असं म्हणतात. तर समुद्रांत झालं जौळ. एक गलबत सांपडलं त्या जौळांत. नाखवा होता मुसुनमान. तो देवाला म्हणाला,

"अल्ला, आतां तुझ्यावर भरवसा रे बाबा! जर गलबत वांचवशील, तर इथून पुढं धंदा सोडून तुझी सेवा करीन."

या टेकडीच्या टोकाला जो खडक आहे, तिथं गलबत लागलं. माणसं बचावलीं. लगेच नाखवा खालीं उतरला. गुडघे टेकून फात्या पढला. नि तेव्हांपासून तो ती टेकडी सोडून कुठं गेला नाहीं. सामक्षा म्हणून त्या गलबताचा नांगर आहे तिथं.

तो मेला, त्याचं थडगं बांधलं तिथंच. त्याचं नांव बालेपीर.

अशी सबंध बंदरपट्टी मुसुनमानांची.

तर राघोभटांच्या वेळीं एकदां दाभोळ मुसुनमानांकडे जायचं, तर दुसऱ्यांदां आपल्याकडे यायचं. त्यामुळं घोडेस्वारांचीं टोळकीं भोतालीं नेहमीं धुमाकूळ घालायचीं. आतां पडघवली अगदीं डोंगराच्या बेचक्यांत. एक्या बाजूनी ओणीच्या डोंगराची सोंड खाडीपर्यंत उतरलेली. नि दुसऱ्या बाजूनी पडघवलीची टेकडी बसलेली. खोऱ्याच्या मधोमध पऱ्ह्या, नि पऱ्ह्याच्या एका अंगाला ओणी नि दुसऱ्या बाजूला पडघवली.

असं डोंगरांत गांव असल्यानं कधीं या भुरट्या टोळ्यांचा त्रास व्हायचा नाहीं गांवाला. पण कशी दुर्बुद्धि आली मनांत कुणास ठाऊक, एक्या दिवशीं एक टोळी वळली पडघवलीकडे.

संध्याकाळीं जेवणं उरकलीं. बागेंत ऊस लावला होता, त्यांत डुकरं येऊन नासाडी करीत. म्हणून गेंगाण्याला राखणवाड्यांत झोंपावं लागे. अधलीचा भात नि सहा सात भाकरी हादडून तो राखणवाड्यांत गेला. बायकामुलं झोंपलीं. राघोभट ओसरीवर उंडीच्या तेलाची दिवली पेटवून योगवाशिष्ठ वाचीत बसले.

असा पहिला प्रहर लोटला असेल. तों सड्यावर आरडा ऐकायला आला. कुत्रा होता दाराशीं. तोहि जोराजोरानं भुंकायला लागला. आमच्या घरापासून अर्ध्या हांकेवर नारभटांचा ठाव. तीं दोन घरं झालीं होतीं. त्यांच्या दारींहि मोठा धनगरी कुत्रा होता. तो लागला भुंकायला. त्याचा भला थोरला आवाज. सगळी दरी दुमदुमली त्याच्या आवाजानं.

राघोभटांनीं पोथी गुंडाळून ठेवली. राघोभटांचा थोरला मुलगा होता दहा वर्साचा. चिंतू नांव. ते माझे पंजेसासरे. पण आपलं सांगायला सोपं जातं, म्हणून आतां चिंतूच म्हणत्यें.

"चित्या—"

खापरपंजेसासूबाईनीं चिंतूला ढुसक्या देऊन उठवलं.

"चित्या, हांक मारताएत रे!"

डोळे चोळींत चोळींत चिंतू बाहेर आला.

"आरडा कसला ऐकूं येताय्?"

"मी नाय् आरडत."

"शिंच्या, मीं कधीं म्हटलं रे तूं आरडताएस म्हणून? तुला नाहीं ऐकून येत? काय गो?"

"हो. कुत्रीं भुंकताएत."

"चित्या, तरवार आण बघूं!—दे हिकडे. उलटी का धरताहेस? सरळ धराची. बघूं!—गंजल्यै. बरेच दिवसांत तेलपाणी केलं नाय् म्हणून. ऐकलंस काय गो, मी जरा जाऊन येतों सड्यावर."

"कशाला जायचं तें? घर उघडं टाकून?"

"अगो, कुळं आहेत तिथं! जायला नको? चित्या, सोडगं घे. नि ऐकलंस काय, गंगाण्या झोपलाए खालीं. वेळ पडली तर त्याला हांक मार."

पण राघोभटांना सड्यावर जावंच लागलं नाहीं. कुत्र्यांचं भुंकणं वाढलं. आमचा कुत्रा पुढं जाऊन भुंकत होता, त्याला कुणीं तडाखा मारला, तशीं तो केंकाटला, नि दाराशीं येऊन भुंकणं आपलं सुरूच. राघोभट त्याला ढुसकीत खेकसले,

"रांडेच्च्या! घरांत काय शिरताहेस?"

तों आठ दहा मुसुनमान आपले अंगणांत! हातीं सोडगीं, सोटे नि तरवारी! राघोभट ओरडले,

"अगो, दार लावून घे!"

तोंवेरी मुसुनमान दांडग्यांनीं राघोभटांच्या हातांतली तरवार हिसकावून काढून घेतली. त्यांना नि चिंतूला खांबांना बांधीत म्हणाले,

"बम्मनक्या बच्च्या! दार लावायला सांगतोएस! क्यूं? अब्बी गंमत समजेल!"

नि आपली दांडकायला केली सुरुवात!

खापरपंजेसासूबाईंना कुठून सुचलं कोण जाणे. सगळ्या पोरांना कोंडलीं न्हाणीघरांत. नि दार तस्सं उघडं टाकून मागं धावल्या. पडत झडत राखण-वाड्यांत पोंचल्या. तिथं गेंगाण्या झोंपला होता हातपाय पसरून राक्षसासारखा घोरत.

त्याचं घोरणं म्हणजे एक अपुर्वाईच ती! ढग गडगडल्यासारखा घोरायचा म्हणे. उगीच नाहीं बायको माहेरीं पळून गेली! असल्या गडगडाटांत झोंप कशी लागायची ती?

सासूबाई तिथं पोंचल्या, नि त्यांनीं दारांतूनच हांकारलं—

"गेंगाण्या—"

ढीम नाहीं.

"गेंगाण्या रे—"

उगीच आपली कूस बदललीन् त्यानं.

"ए दावेदारा! गेंगाण्या!"

या पाळीला करकरा अंग खाजवीत गेंगाण्या अर्धवट जागा झाला, नि आरडला, "हुर्र! हा ऽऽ! होड ऽ हो! रांडेच्यांनीं तरास दिलाय्! घावला येकादा त एका हापटींत भेजा भाएर काडीन!" नि पुनः झोपला.

खापरपंजेसासूबाई पुढं झाल्या, नि त्यांनीं त्याच्या अंगावरलं पांघरूण ओढलं.

"मेल्या! मी काय डुक्कर बिक्कर आहें होय रे? गेंगाण्या!"

"चिप न्हा सावित्र्ये! न्हाई तर लात घालीन कमरंत!"

त्याला वाटलं, बायकोच उठवतेय्.

मडकं भरलं होतं पिण्याचं उशाशीं. तें उचलून खापरपंजेसासूबाईनीं गेंगाण्याच्या डोसक्यावर ओतलं. तशीं खडबडून जागा झाला तो, नि ओरडला,

"कोन तां?"

"रांडेच्या, मी खोतीण."

"काकी, काय वो झालां?"

"तिकडे ह्यांना मारलीं मुसुनमानांनीं!"

"म्हनतांव काय?"

"खोटं का सांगत्यें तुला?"

"त्यांच्या हलकांत दुक झालां! कुसला त्यांचा शेकरा!" असं कांहीं तरी

बडबडत गेंगाण्यानं चिव्याचा सोडगा होता तो उचललान् नि धावत सुटला.

हिकडे राघोभट नि चिंतूजवळ एक्या मुसुनमानाला उभं करून बाकीचे सारे घरांत शिरले होते. रांडेच्यांनीं पार देवघरापर्यंत शिरून सोन्याची कुलस्वामिनी होती, ती काढली होती शोधून. नि फडताळं, रांजण—सगळं उपशीत होते.

"म्हंमद, हंयशीं बग,—या फरतालांत काय ठेवलांय् बामनानी!"

"थंय्शीं काय बगतायस? हंवर हा साला रांजान धर! भारी लागताय."

"फत्त्या, झंव् तूं तिकरे काय करतोयस्? बामनाची बिब्बी खंय गेली?"

"ह्व् रे ह्व् रे! सोन्यानी पिवली पिवली हल्दीसारकी झाली ती!"

"पर साली गेली खंय्?"

"ह्या दरिवज्यान् गेली असल!"

आमच्या हिकडं दारं ठेंगणीं असतात. परसाच्या दारांतून त्या मुसुनमान दांडग्यांचा म्होरक्या वाकून शिरायला लागला, तों दण्णदिशीं त्याच्या छातींत सोडग्याची ढुसणी बसली, नि उताणा कोसळला!

सगळे चपापले. तिकडे पहायला लागले, तों त्या म्होरक्याच्या छातीवर सोडण्याचा दुसरा दणका घालीत त्या एवढ्याशा ठेंगण्या दारांतून साडेचार हात उंच राक्षसासारखा गेंगाण्या आंत शिरला. उघडाबंब. जसा एखादा दैत्यच!

मग काय विचारतां! पुढल्या दरवाजांत हा तोबा! उठला तो बाहेर पळतोय्! गेंगाण्याचे दणके खात खात कसाबसा म्होरक्या बाहेर निसटला. पण गेंगाण्यानं त्याच्या मागोमाग बाहेर पडून नुसते धोपटून काढले मुसुनमान! कशाच्या तरवारी नि कशाचे भाले! राह्यलं सगळं ठिकच्या ठिकाणावर.

मशाली तिथंच टाकून हायतोबा बोंबलत सगळे मुसुनमान पळत सुटले. अंधार गच्च. वाटा माहीत नाहींत. चहूंकडे रान. पण पळताहेत तसेच. गेंगाण्यानं धोपटे घालून तिघे अंगणांतच आडवे पाडलेन्, नि चौथ्यामागं धावत सुटला.

"अरे तोबा! मारूं नोको! तूं हाएस तरी कोन? कोई मुरशद का मौला?"

दणका घालीत गेंगाण्या बोलला,

"वलिकलास न्हाय माका? मी बालेपीर!"

पुढल्या दणक्याला त्या मुसुनमानाची कवटी फुटली, नि तो आंब्याच्या कलमावर कोसळला. कुणी दुसरा मुसुनमान दिसला नाहीं, तेव्हां घाम पुशीत गेंगाण्या मागं फिरला. अंगणांतलीं प्रेतं त्यानं पाय धरून एकावर एक रचून

ठेवलीं, नि राघोभटांना नि चिंतूला मोकळं केलंन्. कडकडून मिठी मारून राघोभट म्हणाले,

"गेंगाण्या, रांडेच्या, पाठच्या भावांनीं केलं नसतं तें तूं केलंस!"

खापरपंजेसासूबाई दारांत उभ्या होत्या आंसवं गाळीत. त्यांच्याकडे पाहून गेंगाण्या म्हणाला,

"रडतीस काय काकू! पानी पाज मना. तान लागली कसली!"

ढसाढसा घागरभर पाणी रिचवलंन् पोटांत, नि गेंगाण्या उठला.

"जातोएस कुठं?"

"तां इच्यारूं नका. काकू, राघूकाकाच्या वलावर औषाद लाव—नि चिंतूच्या."

"अरे, नेतोएस कुठं ते मुडदे?"

"खारींत देतों फेकून."

"ऐक ऐक गेंगाण्या! धसमुसळ्या तूं. अरे, माणूस मेला कीं वैर संपलं. आतां खड्डे करा, नि गाडून टाका."

"राघूकाका, तो तुमचां सवलां तुमच्या बासनांत न्हाऊं द्या! म्हंतांव तर खारींत न्हाय न्हेत, पर पऱ्ह्यांत तर न्हेनार या तिगांना."

"आत्तां तूं इकडे ये बघूं गेंगाण्या! हें इवलं देत्यें तें खा. मग सकाळीं उजाडल्यावर कर काय करायचं तें."

साईचं मुरवणी दहीं होतं, तें एक्या वाडग्यांत ओतून खापरपंजेसासूबाईंनीं आणून ठेवलं गेंगाण्याच्या समोर.

"यवरांच?"

"मेल्या! अरे, चार दिवसांचं चार चार शेर दुधावरल्या साईचं मुरवण आहे तें."

दहीं खाऊन गेंगाण्या म्हणाला,

"आतां न्हाय जात राकनवाड्यांत. हंयसरच्च झोंपतांय्."

"झोंप हो!"

थोड्याच वेळांत गेंगाण्या घोरायला लागला.

पहाटेच राघोभट उतरवेल म्हणून मुसुनमानांचा गांव आहे ओणीच्या पलीकडे, तिथं गेले. तिथून चार मुसुनमानांना घेऊन आले.

"आमचा गेंगाण्या झोंपलाए, तंवर हीं प्रेतं हलवा हितून."

"तोबा तोबा! खोत, तुमाला मारलीन् का काय?"

"मारलींच होतीं! देव धांवला गेंगाण्याच्या रूपानं."

"लई खराब काम केलीं! आपल्या मुल्काचे न्हाईत हे असामी! तिकल्डे हाएत मुरुडजंजिऱ्याकल्डे—हबसानांतले."

तीं प्रेतं उचललीं त्यांनीं नि पऱ्ह्याच्या कांठीं पुरलीं. परत फिरताहेत, तों कलमावर आणखीन् एक प्रेत दिसलं. सगळं कलम रक्तान भरलं होतं. ते गोंगाटा करीत अंगणांत आले.

"खोत, आनीक एक हाय्."

तंवर गेंगाण्याची झोंप झाली. मुसुनमानांना पहातांच तो पुनः दांडकं उचलून चालला.

"खोत! खोत! सांबाला ह्याला!"

"मागं हो गेंगाण्या! अरे, ओळखलं नाहींस त्यांना? आपल्या उतरवेलच्या कासमचिच्या—"

"कशाला इले हे?"

"कशाला? अरे, मींच बोलावलं त्यांना."

"मुर्दे खंय् हाएत?"

"गाडले त्यांनीं."

गेंगाण्यानं दांडकं खालीं टाकलंन्.

"आमच्या राघूकाकाचां सगलां काम हा असां मुळूमुळू!"

कसाबसा त्याला समजावला राघोभटांनीं, तों कासमचिच्या म्हणाला,

"मंग खोत, त्या कल्माजवलच्याचां काय करायचां?"

पटकन् गेंगाण्या उठला. म्हणाला,

"राघूकाका, इसरलांच होतां मीं त्या साल्याला. थितंच गारायचा त्याला. कलमाला खात होऊं द्ये!"

"अरे—"

"न्हाय्! आतां मी न्हाय् ऐकनार तुमचां!"

"कासमचिच्या, गेंगाण्याचं होऊं द्या. तिथंच पुरा तुम्ही त्याला."

मग तो मुडदा तिथंच कलमाखालीं पुरली. त्या खतानं तें कलम असं छान झालं! ही एवढी एकेक कैरी. नुसता मधासारखा गोड आंबा. त्याचं नांव पीरांबा.

ज्या दिवशीं मुसुनमान मेला, त्या दिवशीं राघोभट एक फकीर बोलावून त्याला जेवूं घालीत. म्हणत,

"आशा राहायला नको त्याची."

गेंगाण्या त्या कलमावर चढायचा नाहीं, त्याचे आंबे काढायचा नाहीं. कां म्हणून विचारलं, तर म्हणे,

"मेल्यांनीं राघूकाकाला मारला व्हता! त्याचां खत ज्या आंब्याला, त्याचा आंबा खाल्ला, तर माज्या मनांत तशी सर्धा व्हईल."

त्या कलमाखालीं पुढं मुसुनमानांनीं थडगं बांधलं. त्याला नवसहि करायला लागले. पावतो म्हणे तो पीर नवसाला! ज्याच्या मनीं जसा भाव, तसा देव भेटतो ना त्याला?

ꙮ ꙮ ꙮ

गेंगाण्याची नि राघोभटांची मारुती नि रामासारखी जोडी. पण पुढं लवकरच ती फुटली.

एक रायवळ आंबा होता. यायचा उशीरां. पण रसाला भारी चांगला. असा गंधासारखा दाट नि पिवळाधम्मक रस. रुचीला तर कलमांना मागं टाकी. दर वर्षी यायचा.

त्र्यंबकभटांच्या श्राद्धाची तीथ येई आषाढांत. त्या तिथीला त्या रायवळाचा रस करीत राघोभट. त्या श्राद्धाला सगळीं कुळं घरीं जेवायला असत. दुपारपासून संध्याकाळवेरीं चालायच्या पक्ती. राघोभट म्हणत,

"इष्टै सह भुज्जताम्. हे सगळे माझे इष्ट."

त्या वर्षी काय झालं कोण जाणे, त्या आंब्याच्या खालच्या फांद्यांना मोहोरच नाहीं आला. वरच्या शेंड्याच्या फांद्याच तेवढ्या आल्या. राघोभट म्हणाले,

"गेंगाण्या—"

"वो!"

"कसं रे करायचं यंदां? आंबा तर कांहीं दिसेनाय् झाडावर."

"हाय् तो सगला कारूं. पर सराधाच्या दिवशीं रस व्हायला पायजे."

"अरे, पण झोल्यानं कसा निघेल? भारी उंच झाड!"

"वर चरूं नी एकेक सोदून कारूं."

"नको रे बाबा! पाऊस कोण कोसळतोय्. सगळं झाड शेदावलंय्. शेवाळं

आलंय् फांद्यांवर. पडलाबिडलास तर पाय मोडायचा. तुझं कांहीं फारसं नुकसान व्हायचं नाहीं. पण माझं मात्र होईल."

"तां कसां?"

"कसा काय विचारताएस रांडेच्या? अरे, मी म्हणजे नुसतं डोस्कं. हातपाय म्हणजे तूंच आहेस!"

"त काय हा हातपाय श्येनाम्येनाचा हाय का काय? लोकांड हाय लोकांड!"

आठ दिवसांनीं श्राद्धाची तीथ. तर आज आंबा उतरायचा. पावसानं थोडीशी उघडीप दिली. टोपली नि दोर घेऊन गेंगाण्या निघाला. खापरपंजे-सासूबाई म्हणाल्या,

"गेंगाण्या, जातोएस कुठं?"

"इच्यारलीस काकू?"

"चुकलं हो माझं! विचारूं नये कामाला बाहेर निघतांना. पण आंबे का काढताएस?"

"हां."

"झाडावर चढून का काय?"

"एक थाबा द्ये काकी पेटलेला. चिलीम वढायला होवा."

"थाबा देत्यें रे! पण चढूंबिढूं नकोस रे बाबा. नाहीं आंबा तर नाहीं. खीर करूं यंदा."

"काकूचां म्हन्नां गांवाला सांगा! गांव थुकल माज्या तोंडावर! म्हनल, गेंगान्या, रांच्या झारावर आंबा हाय्, तूं जिता हाएस, नि गांवाला रस न्हाई? द्ये, थाबा द्ये लवकर. चिंतू, चल माज्या बरुबर."

"चित्या, सांभाळ हो गेंगाण्याला!"

कसला सांभाळतोय् चित्या! दोघे गेले आंब्याशीं घोंगडीच्या खोळी पांघरून. सगळा आंबा शेवाळून हिरवागार झाला होता. तरी तसाच गेंगाण्या चढला वर. दोन टोपल्या काढल्यान् त्यानं कशा तरी. नि मग सोसासोसानं अगदीं शेंड्यावरच्या कैऱ्या काढायला वर गेला. वरची फांदी अगदीं उभी होती. मध्यें कुठंहि फांदोरली नव्हती ती. पार निसरडीहि झाली होती. त्या फांदीवर दोन्ही पाय ठेवलेन् त्यानं, नि वर चढायला लागला, तों पाय घसरला! तोल गेला! खालीं कोसळतां कोसळतां हातांत फांद्या धरायला लागला. पण एवढा डोंगरासारखा माणूस! फांद्याहि तुटून खालीं आल्या त्याच्याबरोबर!

खालीं केवढा थोरला खडक होता अणकुचीदार. नेमका वरून हापटत हापटत त्याच्यावर उलटा येऊन कोसळला! एक शब्दहि कांहीं नाहीं काढलान् तोंडांतून. पार चिंध्या चिंध्या झाल्या कवटीच्या!

एवढ्या थोरल्या माणसाचा जीव जायला दोन पळं कांहीं लागलीं नाहींत! असं असतं माणसाचं जिणं. आळवावरल्या थेंबासारखं!

चिंतू उभा होता खालीं, त्याला तर थोडा वेळ काय झालं तें उमगलंच नाहीं. तें रक्त उडालेलं पाहिलंन्, तशीं फेंपरं येऊन तो त-त-त करीत खालीं पडला. पण शुद्धीवर आला, नि मग त्याला कळलं!

आपला गेंगाण्या गेला! बोंबट्या मारीत घरीं धावत सुटला तो,

"गेंगाण्या रे! अरे गेंगाण्या रे!—"

राघोभट अंगणांतून आरडले, "अरे, झालांय् काय? आरडताएस कां गेंगाण्याच्या नांवानीं?"

चिंतू कांहीं बोलला नाहीं. पण त्याच्या अंगावर रक्त उडालं होतं. तें पाहिलं राघोभटांनीं, तस्से आंब्याकडे धावत सुटले.

खालीं काढलेल्या आंब्याच्या ढिगांत गेंगाण्याचं प्रेत पडलं होतं!

राघोभट त्या प्रेतावर पालथे पडले, नि धाय मोकलून रडायला लागले,

"गेंगाण्या रे!—अरे गेंगाण्या! रांडेच्च्या—मला एकस्याला सोडून कुठं गेलास रे?"

सगळा गांव गोळा झाला. दुःख सगळ्यांनाच झालं. पण गेंगाण्याच्या चारी बायकांचा आक्रोश कांहीं सांगतां पुरवेना. थोरली थडाथडा कपाळ बडवीत होती. तिच्याहून धाकटी दांतांनीं ओठ दाबून तशीच बसली होती. उरल्या दोघींचा कोल्हाळ साऱ्या दरींत गर्जत होता.

शेवटीं राघोभट उठले, नि म्हणाले,

"गोज्ये, सोड त्याला. तुझा घो गेलाय्, माझा भाऊ गेलाय्. शूरासारखा काम करतां करतां गेलाय्. हंतरुणावर घोळला नाहीं, तापानं झिजला नाहीं. सगळ्यांनाच जायचांय्. माझंहि मरण दिसायला लागलंय् मला. पण त्याचा अग्निसंस्कार करायला हवा—"

"रागूकाका वोऽऽ! आतां कसां करूं! माज्या दादल्यान् चारदा हल्द लावली, पर पालना येकदा बी हाल्ला न्हाय् त्याच्या घरीं!"

"दैवांत नव्हतं गोज्ये! तुला अग्नि कोण देईल हीच काळजी ना? मी दीन

अग्नि. माझा धाकटा भाऊ तो. दिवसवारे सगळं मी करीन. कांहीं काळजी नको करूस तूं."

गोजी बाजूला झाली, तों दुसरी सावित्री बसली होती ओठ दांतांखालीं दाबून, ती वाघिणीसारखी गेंगाण्याच्या प्रेतावर जाऊन पडली.

"अगो, आतां तुम्ही चौघीहि पाळींपाळीनं दमवणार कीं काय मला?" राघोभटांनीं म्हटलं.

पण कसली भयासुर दिसत होती सावित्री! राघोभटांकडे डोळे रोखून ती म्हणाली,

"रागूकाका! मी सोरनार न्हाई माज्या भरताराला."

"अगो, त्याचा संस्कार नको का करायला?"

"करा! पन मला बी जाला तुमी त्याच्याबरुबर!"

"सती जात्येस का काय?"

"हां!"

गोजी होती शेजारीं उभी, ती पिसाळली.

"तूं गो कोन सती जानार? मी थोरली. मी सती जानार."

प्रेताचा मुका घेऊन सावित्री म्हणाली,

"माज्यावर लय पिरिम होतां माझ्या दादल्याचां. मीच जानार. मागं ऱ्हानार न्हाई मी."

"कवटालनी, तुज्यावर पिरिम होतां, तर माजा काय दायेदार होता का काय? आता कंदी कंदी मारीत बिरीत असऽ. पर मारल्याबिगर का परपंच चालताय् काय? सांगा हो तुमीच रागूकाका!"

"बायो, मी कांहीं सांगत नाहीं. जगावेगळं भांडण तुमचं. मी काय सांगूं?"

"रागूकाका, तुमी गांवचं खोत. तुमाला सांगून ठेवत्यें—मी सती जानार!"

"मी थोरली! माजा हाक हाय रागूकाका! ही हडल—"

"हां! नीट बोल! श्या नको घेऊं!"

"दीन, हज्जारदां दीन! रांड—हडल—"

वाघिणीसारखी सावित्री जी उठली ती तिनं गोजीचं मानगूट धरलं. दुसऱ्या दोघी रडत होत्या, त्याहि धावून आल्या. नि मग जो काय गोंधळ सांगूं! हो हो करून भांडण तोडतां तोडतां राघोभटांना पुरेवाट झाली. त्यांना दोघींना बाजूला केलं, तशी पदर सावरीत गोजी म्हणाली,

"रागूकाका, मंग सती कोन जानार ?"

"तूंच जायचीस हो बायो !"

दांत चावीत सावित्री ओरडली,

"रागूकाका, मना जाऊ द्येनार न्हाई, तर मी फास घीन तुज्या दारासंबूर ! नि हडल होईन ! काकीला छलीन !"

राघोभटांच्या डोळ्यांत पाणी आलं. ते भरल्या गळ्यानं म्हणाले,

"सावित्र्ये, तूंहि जा हो बायो सती ! अगो, तुम्ही सत्ययुगांतल्या सीता-सावित्री. कशाला आलांत या युगांत जन्माला ? नि तुम्हांला ना म्हणून कुणाचं भलं व्हायचंय् ? जा. दोघीहि जा सती. भिवऱ्या, मसणवट्यांत चिता रचा भली थोरली. तिघंहि एकाच चितेवर जळूं देत."

भांडण मिटलं. मोठ्या दिमाखानं मळवट भरून, तुलुंबडीं, नांगोत्रीं, मनी, हें सगळं अंगावर घालून साबित्री नि गोजी दोघी गेंगाण्यामागं चालल्या. सगळ्या गांवकरणींनीं त्यांचं दर्शन घेतलीं.

खापरपंजेसासूबाईनीं दोघींच्या ओट्या भरल्या, नि नमस्कार करायला लागल्या.

"हां हो काय काकी ? अवो, तुमचा सासूचा मान—"

"गोज्ये, सावित्र्ये, तुम्ही दोघी भाग्याच्या. आमचा मान राहिला मागं. आगो, मोठेपण तुमच्याकडे आपल्या पायांनीं चालत आलं हो !"

चिता दोघींनीं पेटवली. जळतांना हूं का चूं केलं नाहीं. गेंगाण्याच्या दोन्ही-कडे बसून होत्या. सरण खालीं बसल्यावर राघोभट डोळे पुशीत परत फिरले.

घरीं येऊन त्यांनीं भिवऱ्याला हांकारलीं—

"भिवऱ्या, असाच या पावलीं अंजनवेलीस जा."

"नि काय करूं ?"

"किल्लेदारांना म्हणावं, दोन सुतार इथं राहाते धाडून द्या."

"घर नवां बांधतांव् काय ?"

"नाहीं रे ! देऊळ बांधायचांय्."

"कुनाचां ?"

"मारुतीचं. गेंगाण्या गेला त्या आंब्याखालीं बांधायचं. त्याची आठवण राह्यला हवी ना ? म्हणून."

"आटवनीसाटीं द्येऊल ?"

"भारी विचारूं नये भिवऱ्या ! अरे, गेंगाण्या देवमाणूस. त्याची आठवण

देवळानी नाहीं करायची तर काय रंगशाळेनी ?"

भिवऱ्या गेला, नि दोघां सुतारांना घेऊन आला. राघोभट म्हणाले,

"नांवं रे काय तुमचीं ?"

"माझां नांव शिवराम नि याचां तुकाराम."

"शिवरामा, तुम्हांला जागा देतों राहायला. तिथं घरटा बांधा. पण लगेच्च देवळाचं काम सुरू करायचंय् रे !"

"किती लांब, किती रुंद—"

"सांगतों. खणभर लांबी रुंदी, चौबाजूंना सोपे. दुघई देऊळ धरायचं, समजलेत ? अन् लक्षांत ठेवा. नवा गांव म्हणून अडचण मानूं नका. राहाती जागा वंशपरंपरेनी दिली तुम्हांला."

सुतार आले गांवांत. कौलं पाडायला म्हणून कुंभार आणला. राघोभटांनीं अंजनवेलीस ये-जा करायला म्हणून नाव करून घेतली. जयवंती तिचं नांव. ती चालवण्यासाठीं कोळी बोलावून घेतले.

देऊळ उभं झालं, सांगता झाली, मूर्तीची स्थापना केली. अशी बैठी ठेंगणीठुसकी मूर्ति. पुण्याहून कारागिराकडून घडवून आणली. गांव वसला तरी मारुती नव्हता. गेंगाण्याच्यामुळं मारुती आला गांवांत.



पण आणखीन् एक भांडण उभं राह्यलं.

सुतार घर बांधीत होते, ते एक्या दिवशीं अंगणांत येऊन बसले.

"कां रे शिवरामा ?"

"हें तुमचां भांडन, तें तुमी आपले तोडा हो ! आमाला काय ? सांगितलीत, म्हनून घराचा पाया घेतला."

"पण मग भांडण कोण करतांय् ?"

"तुमचां चुलत घर. सदूभट म्हनतो, घर बांधूं नका."

"पण कां ?"

"तो म्हनतो, राघोभट एकटा कोन घर बांधायला सांगनार ? त्याची खोती निम्मी, आमची निम्मी."

"रांडेच्यानो ! रे, सांगतोएस काय ?"

सदूभट म्हंजे कोण तें सांगत्यें. राघोभट केशवभटांचे नातू. नि सदूभट

नारभटाचे. पाहुणे म्हणून आले, नि घरधनी झाले!

राघोभट उठले नि त्यांनीं जाऊन विचारलीं,

"सद्या!"

"नीट बोल. सदाशिवभट नाहीं म्हणतां येत?"

"सदाशिवभट नाहीं, सदाशिवाचार्य म्हणतों. पण हें मांडलाएस काय रांडेच्या?"

"पुनः शिव्या—"

"शिंच्या! शिव्या का दिल्या तुला?"

"पुनः—"

"बरं बरं! पण सुतारांना घर कां बांधूं देत नाहींस?"

"कां म्हणजे? तुझ्याचसारखा मीहि खोत."

"कधींपासून झालास?"

"तूं कधींपासून झालास? सनद आहे? मराठ्यांची—विजापूरची?"

"रांडेच्या!"

"पुनः शिव्या!"

खरोखरीच सनद नव्हती. राघोभट उठले, नि त्यांनीं अंजनवेल गांठली. पण म्हातारा किल्लेदार काळपुळीनं आजारी. म्हणाला,

"राघोभटा, पुण्याला जायला हवं. तिथं पेशव्यांकडून सनद आणायला पाह्यजे. आजची रात्र थांब. उद्यां सकाळीं तुला पत्र देतों."

राघोभट मुक्कामाला राह्यले. मध्यरात्रीला हांकारा घाबऱ्या घाबऱ्या आला, नि म्हणाला,

"किल्लेदारांनीं बोलावलाय्."

राघोभट धावत पळत गेले. तों किल्लेदाराला घरघर लागलेली! म्हणाला,

"राघोभटा!—नाहीं झालं—पत्र लिहिणं—पुण्याला—तुझ्या मागं—मी उभा!"

संपलं.

दिवसवारे झाले, नि राघोभट पडघवलीला आले. खातरपंजेसारखूबाई म्हणाल्या,

"आतां कसं?"

"कसं काय? पुण्याला जायचं."

"प्रकृति कोण खराब झाल्यै—"

"होऊं दे. पूर्वजांनीं कमावलीं, तें चोरांपोरांनीं खाण्यासाठीं नव्हे. सरळ मागता तर दिलंहि असतं. पण हा आडवा पडतोय्."

"आज गेंगाण्या असता तर—"

"तेंच! तेंच! पाय मोडला माझा, नि भुतावळ उठली. पण त्यांना म्हणावं, हातपाय मोडले, तरी डोज्कं शाबूत आहे अजून."

चौथ्या दिवशीं चांगला मुहूर्त पाहून भिक्या म्हणून कूळ बरोबर घेऊन राघोभट पुण्याला निघाले. पुण्यास कुणी देवधरशास्त्री म्हणून होते. मूळचे मुर्डीचे. पण अगदीं शिवाजीपासून पुण्याला स्थाइक झालेले. त्यांची ओळख काढून तिथं उतरले. रात्रीं जेवणंखाणं झालीं, नि आपलं काम सांगितलं राघोभटांनीं.

"शास्त्रीबुवा, तर मूळचा गांव आमचा—"

"कशावरून?"

"भले! तुम्हीहि तेंच म्हणायला लागलांत!"

"रागावूं नका राघोभट. अहो, ढीग तुमचं म्हणणं खरं आहे. पण प्रमाण पाहिजे ना? बरं. कोंकण म्हणजे दूरचा पल्ला. तिकडचे लोक काय करतात तें त्यांचं त्यांना माहिती. वसूलहि धड येत नाहीं. हिकडूनच धाडावा लागतो पैका. बरं! तुम्ही म्हणतां किल्लेदार. तर तो गुजरला. तेव्हां प्रमाणाशिवाय कांहीं व्हायचं नाहीं हें."

"अहो, पण आमच्या आजोबांनीं चाचे मारून—"

"तें कबूल हो! पण भावाला कुणीं आणलं?"

"त्यांनींच."

"मग त्यांनीं अर्धी खोती कशावरून कबूल केली नसेल?"

हताश होऊन राघोभट म्हणाले,

"शास्त्रीबुवा, मी कांहीं रिकाम्या हातानं घरीं जायचा नाहीं. इथं पेशव्यांच्या दारीं उपाशी पडून राहीन."

"राघोभट, आतताईपणा करून भागायचं नाहीं. आपण रामशास्त्र्यांपुढं मांडूं प्रकरण. ते काढतील तोड."

रामशास्त्री म्हणजे प्रभुणे हो! तर त्यांच्यासमोर प्रकरण गेलं. तेव्हां ते म्हणाले,

"प्रतिवादी कुठाय्?"

"पडघवलीला. कोंकणांत."

"हजर करा."

पेशव्यांचीं माणसं गेलीं, नि सदूभटाला घेऊन आलीं. सदूभटाला विचारलीं रामशास्त्र्यांनीं, तेव्हां तो म्हणाला,

"अर्धी खोती माझी."

"प्रमाण आहे?"

"राघोभटाजवळ तरी कुठाय्?"

क्षणभर विचार केला रामशास्त्र्यांनीं, नि कारकुनाला म्हणाले,

"या दोघांकडून दिव्य करवा."

दिव्याचं नांव निघालं बरीक, सदूभट घाबरला. म्हणायला लागला,

"माझा पक्ष खरा आहे. मी कशाला दिव्य करूं? खोटा असेल तो करील."

लग्गेच रामशास्त्र्यांनीं बेड्या अडकवलीं सदूभटाच्या हातीं. राघोभट म्हणाले,

"मी करतों दिव्य."

दुसऱ्या दिवशीं कसब्याच्या गणपतीपुढं दिव्य केलीं राघोभटांनीं. पहाटे नदींत आंघोळ केली. संध्या केली. देवाला नमस्कार केला. पूर्वजांचं स्मरण केलं. नि गणपतीसमोर आले.

तिथं ही लोकांची गर्दी. पंचवीस पावलं जागा आखली होती. तोफेचा हा एवढा थोरला गोळा तापून लाल भडक झाला होता. पुनः कारकुनानीं विचारलंन्,

"भटजी, दिव्य करणार का?"

"हो, करणार."

"म्हणा तर. खोती तुमची आहे."

"खोती माझी आहे. माझ्या आजोबांनीं कमावलेली. गणराया साक्षी आहे."

"करा हात पुढं."

राघोभटांनीं दोन्ही हात पुढं केले. त्यांना तूप लावलं. पिंपळाचीं सात पानं ठेवलीं त्यांच्यावर. नि सांडशीनं तो एवढा थोरला लालभडक गोळा हातावर ठेवलीं!

राघोभट गणरायाचं स्मरण करीत पंचवीस पावलं चालून गेले, नि त्यांनीं खालीं गवत होतं त्याच्यावर गोळा टाकला. भडाभडा गवत पेटलं.

पण राघोभटांच्या हातांना कांहींसुद्धां झालं नाहीं! उगीच थोडेसे लाल काय ते झाले!

राघोभट खरे झाले! पेशव्यांनीं सहीशिक्क्याची सनद करून दिली त्यांना.

मग रामशास्त्र्यांनीं त्यांना विचारलं,

"आतां प्रतिवाद्याला काय शिक्षा देऊं ?"

"काय देतां येईल ?"

"पायांत मणाची बेडी घालून वैराण गडावर ठेवतां येईल. हात किंवा पाय तोडतां येईल—"

"त्याच्याबद्दल मी क्षमा मागतों. सोडून द्या त्याला."

"भले भटजी ! माणूस आहेस खरा. सोडून देतों. पण पुनः यानं तुमच्या गांवीं पाऊल घालतां कामा नये."

तेव्हांपासून दापोलीच्या पलीकडे खोलगांव आहे, तिथं जाऊन राह्यला सदूभट. त्याचा वंश तिकडे वाढला.

۵ ۵ ۵

राघोभट घरीं आले, नि त्यांना कळलं, इकडे सदूभटाच्या घरावर रात्रंदिवस आंब्याएवढाले दगड येत ! त्या रात्रीं स्वप्नांत शेणवी किल्लेदार आला, नि म्हणाला,

"राघोभटा, तुला वचन दिल्तं. तें खरं करायला आलोंय्. लोणचांबा आहे हिरडीच्या खाचराशेजारीं, त्याच्यावर राह्यलोंय्. सदूभटाच्या घरावर दगड मींच मारले ! आजपासून गांवचा राखणदार मी."

सकाळीं उठले राघोभट नि म्हणाले,

"अगो, आधीं भात टाक."

"अग्गो बाई ! तो कशाला ?"

"दहींभात न्यायचाय्."

"कुणाला ?"

"किल्लेदाराला."

"बायो माझी ती ऽ ! किल्लेदार तर—"

"हो. मेला. पण गांवची राखण करायला आलाय्. सदूभटाच्या घरावर धोंडे—"

"अग्गो बाऽई ! खरं का काय ?"

"रात्रीं स्वप्नांत आला होता माझ्या."

"कुठं—"

"लोणचांब्यावर. बोलत बसूं नकोस. आधीं भात टाक. दहीं घाल त्याच्यावर. तंवर मी आंघोळ करून येतों."

राघोभटांनीं दहींभात घेतलीं नि लोणचांब्याशीं गेले. दहींभाताची आगोतली ठेवून म्हणाले,

"रक्षक पुरुषा! आलाएस तो सुखानं रहा. पोरंसोरं हिकडे गुरं घेऊन येतात पसाऱ्यावर. त्यांना त्रास देऊं नकोस. आम्ही सगळीं तुझीं लेकरं. सांभाळ रे बाबा! आम्ही दरिद्री कोंकणांतलीं दरिद्री माणसं—तुला माहितीच आहे म्हणा! तर कांहीं कार्य निघालं कीं गूळपोहे ठेवत जाऊं. गांवावर तुझी सांवली असूं दे. आजपासून हा आंबा गांवाचा. पोरासोरांनीं झोडून खावा. नि एक कर. सदूभट गेला गांव सोडून. त्याच्या घरावर दगडबिगड कांहीं मारूं नकोस. सामक्षाच द्यायची असेल तर दुसरी कांहीं तरी चांगली दे."

दुसऱ्या दिवशीं पसाऱ्यावर गुरं नेलेलीं पोरं धावत आलीं.

"रागूकाका—"

"काय रे?"

"लोंचांब्याशीं फुलं फुललींत!"

"कसलीं रे?"

"मना न्हाई म्हाईत!"

राघोभट गेले नि पाहिलं त्यांनीं.

"अरे, हीं सीतेचीं आंसवं!"

"काल न्हवतीं."

राघोभटांनीं नमस्कार केला नि म्हणाले,

"गिरोबा, सामक्षा दिलीस ती पोंचली. हीं फुलं लेकीबाळी मंगळागौरी-साठीं नेतील हो! देवीची पहिली पूजा ह्या फुलांनीं."

त्या फुलांची गंमत सांगत्यें. वर्षभर रोपं हिरवंगार, नि फुलांनीं भरलेलीं! अगदीं सगळ्या पंचक्रोशींतून बायका देवीच्या पूजेसाठीं फुलं न्यायला हितं यायच्या.



बरेच दिवस राघोभटांच्या मनांत होतं, तें शेवटीं अगदीं म्हातारपणीं केलीं त्यांनीं.

विटा पाडल्या, नि सतींचे ओटे बांधले. दोन ओटे शेजारीं शेजारीं. मध्यें तुळशीवृंदावन. कोनाड्यांत दिवली लावायची रोज. मागं पिंपळाचं रोपटं लावलीं. कुणीं विचारलं, मसणवट्यांत कशाला पिंपळ? तशीं म्हणाले,

"अरे, गोजीला नि सावित्रीला सांवली हो!"

आतां तो पिंपळ वठूं लागलाय्.

सदूभटाचा धाकटा भाऊ होता कोंडभट म्हणून. चिंतूपेक्षां तो दहा वर्षांनीं थोरला. त्याला एक दिवस बोलावला राघोभटांनीं.

"कोंडू, बस तसा. रे, तुला कांहीं सांगायचांय्."

"काय सांगायचांय्?"

"अरे, तूं आमच्या चिंत्यापेक्षां दहा वर्सांनीं थोरला. झालंगेलं विसरून जा—"

"मी विसरलांय् राघूनाना."

"विसरलाएस रे! पण आपलं तुला सांगतों. सदू जरा कुरापत्या होता. तूं तसा नाहींस. मला दिसतं तें. म्हणून तर तुला बोलावलं. चिंत्या आहे लहान अजून. माझ्यामागं खोत तो—"

"मागच्या गोष्टी कशाला सांगतांय् राघूनाना एवढ्यांत? अजून दहावीस वर्सं जगायचेत तुम्ही."

"हो रे! पंचवीससुद्धां जगायचा. पण उद्यांच गेलों तर? म्हणून तुला सांगून ठेवतों. चिंतू खोत असला, तरी थोरला तूं. तुझ्या सल्ल्यानं त्यानं चालायचं. आलं का लक्षांत चिंत्या? नि या बागा केल्याएत. खपाल तर आणखीन् वाढवाल. गिरोबा आहे राखणीला. समजलं का?"

त्यानंतर महिन्यानं राघोभट एका दिशीं देवपूजेहून उठले. गंगाण्याच्या नांवानीं देवांत टाक करून बसवायला आणला होता, त्यावर फुलं वाहिलीं त्यांनीं, नि नमस्कार घातला. तो शेवटचा. त्यावर कांहीं उठले नाहींत.



# २

पडघवलींत येऊन कशीं राहिलों तें सांगितलं हितवर. पुढल्या दोन पिढ्या घरं वाढत गेलीं. एकाचीं दोन, दोहोंचीं चार. मी पडघवलींत आल्यें, तेव्हां आमचीं बारा नांदतीं घरं होतीं.

नांदतीं म्हणजे खरोखरीच नांदतीं हो! समोर अंगण, मागं परसूं. भोंतालीं नारळीपोफळींची बाग. पावसाळ्याचे चार महिने काय तो अंगणांत मांडव नसायचा. एऱ्हवीं सताठ महिने अंगणांत मांडवाची सांवली. कोंकणी माणसं हुशार. एका दगडांत दोन पाखरं. खालीं सांवली नी वर वाळवणं. कोंकणांत वाळवणांचं भारी बंड. पोफळांच्या वेळीं पोफळं. झालंच तर आमसुलं, साटं, कडवे, वाल, गरे, आंब्याची आंबोशी, केळ्याचे काप, मातावलेलीं कडधान्यं.

प्रत्येक घर खपतंय्. बायका, पोरं, पोरी, म्हातारे, म्हाताऱ्या. अगदीं कुणी कुणी म्हणून रिकामं नाहीं. चटा चटा चटा आपलीं कामं चालल्यैत.

केशवभटांनीं गांव मिळवलीं, राघोभटांनीं विस्तारलीं. त्यांनीं पेरलीं, तें मामंजींच्या वेळेपावेतों उगवलं. पुढं तेवढंच राखून ठेवते तर!

तर हें सगळं सांगायची पाळी कशाला आली असती? पण म्हणतात ना? फाशांचा डाव नी दैवाचा घाव. कसा पडेल तें कुणाला सांगतां का येतंय्?

माज आला सगळ्यांना. चांगलं खातंपितं कोंकण बघवेना. जसं अंगावर आलं एकेकाच्या. उतले, मातले—माडी प्यालेल्या कुळवाड्यांसारखे. नव्हतीं भांडणं, तीं उकरून काढलीं. जुनीं वैरांचीं भुतं धूप घालून पुनः जागतीं केलीं. वाद्ले. मारामाऱ्या केल्या. कोर्टं झालीं, कचेऱ्या झाल्या. अगदीं हायकोडताचे उंबरेसुद्धां झिजवले मेल्यांनीं. नी आतां गांवचा मसणवटा करून पांगलेत चहूं दिशांना वाऱ्यावर!

पण मी भारी पुढं गेल्यें. मी पडघवलींत आल्यें, तेव्हांचं सांगत होत्यें. आमचीं बारा घरं गांवभर पांगलेलीं.

आमचं मुख्य घर गांवाच्या मधोमध. आमच्या पलीकडे खालच्या अंगास माझ्या चुलत सासऱ्यांच. त्यांच्या पलीकडे आंधळ्या भिऊआबाचं. मग मधून पाट गेलेला, नी त्याच्या पलीकडे दत्तूअण्णा अन् दामूअण्णा या भावांचीं दोन घरं. खालीं तळांत फौजदाराचं, भिकूनाना, नी शंकर. सड्याच्या डोणीजवळ गुजाभावजींचं.

आतां हिकडे वरच्या बाजूला मधें टोसरांचं. मग गेंगाण्याचा मारुती, त्याच्यापुढं पावसाळी पऱ्ह्या नी पलीकडे जोशी.

तिथून मग बरंच वर डोंगरांतून धाकटा पऱ्ह्या खालीं धांवतो, तिथं नारभटांचा ठाव. तीं तीन घरं. व्यंकूभावजी हे तिघे भाऊ एक्या घरीं. अलीकडे त्यांच्याच भाऊबंदांचीं दोन घरं. एक्याघरीं नुसती म्हातारी कुशाव्या, नी तिचा वेडा मुलगा. त्या पलीकडे अंबूनाना.

सबंद ब्राह्मणवाड्यांत हीं बारा घरं. सड्यावर कुळवाड्यांचीं पांचपन्नास. धारेंत सुतार. बंदरवाटेवर महार. खालीं बंदरावर कोळी नी खारव्यांचीं दहावीस झोंपडीं. एवढं कमावीत मेले मासे धरून; पण कध्धीं त्यांच्या घरीं सुखाची हंडी कांहीं चुलीवर चढली नाहीं. मासे मारून कमवायचं नी दारू पिऊन घालवायचं. कुळवाड्यांची तीच तऱ्हा. ओणींत ताडीचा गुत्ता. दिवसभर हातांत त्या पांढऱ्या बाटल्या, अलिमिनिमचीं गलासं नी फुटाण्याच्या पुड्या घेऊन बसलेले असायचे मेले.

तरी मी आल्यें पडघवलींत, त्या वेळेस कमी कुणालाच नव्हतं. कष्ट करील, खपेल, त्याला दुवक्त ताकभात कांहीं कमी पडायचा नाहीं.



अगदीं आमच्या म्हाताऱ्या कुशाव्याचंच घ्या ना! नवरा जाऊन दहा वर्सं झालेलीं. एवढा थोरला बारातेरा वर्साचा मुलगा, पण अगदींच वेडाबावळा. अंगावर कपडा कांहीं टिकूं द्यायचा नाहीं. नागडाउघडा वईवई धांवायचा. कुशाव्या त्याच्यामागं लंगोटी घेऊन लागायची. हिनं त्याला धरून लंगोटी नेसवलीन्, कीं तो ती फेंकून देऊन आपला दिगंबर! मग कुशाव्या त्याला मारीत घरीं न्यायची. तो एखाद्या गुरासारखं ओरडायचा!

आम्ही लहान. माझी एक चुलत नणंद होती माझ्याहून वर्सानं लहान. आमच्या शेजारींच तिचं घर. बनी तिचं नांव. पण तिला मी म्हणायची

बनूवन्सं ! बन्ये म्हटलं तर तिला राग यायचा. एवढं एक सोडलं, तर आमची दोघींची भारी गट्टी. ती नी मी दोघी जायच्या अंबूनानांकडे कांहीं कामासाठीं.

वाटेंत कुशात्त्या नी तिच्या मुलाची शिवाशिवी चाललेली असायची. आम्हाला खूप मजा वाटायची. मी नी बनी दोघी ही ही ही हसत उभ्या रहायच्या.

"अंबूवहिनी, तें बघ ! ही ही ही !"

"इश्श ! चला बाई बनूवन्सं. सासूबाई रागावतील."

नुसतं तोंडानं म्हणायची. पण पाय कुठं निघतोय् ! जसा कांहीं पायीं फणसाचा चीक चिटकवलाय्. एवढी गंमत सोडून जाववेल, तर तें पोरपण कसलं ?

वेड्या मुलाला—त्याचं नांव होतं रंगू, रंगनाथ; पण सगळीं जणं त्याला येडा किल्लेदार म्हणायचीं—कशीबशी लंगोटी नेसवून कुशात्त्या त्याला फरफटत घरीं न्यायला लागायची. तों आम्ही दोघी दिसायच्या तिला.

"रँडेच्यांनों ! काय गो पहात उभ्या राह्यल्यात ?"

"कांहीं नाहीं. ही ही ही—"

"मग ? थांबल्यात कां हितं ?"

"कांटा मोडलाय् बनूवन्संच्या पायांत. ही ही ही—"

"खोटारड्यांनों ! नी कांटा मोडला म्हंजे हसूं येत असतं वाटतं ?"

"नाहीं ! ही ही ही—"

"निघतां कीं नाहीं ? थांब हो ! येऊन सांगत्येंच जिऊला तुझं तंगडं मोडायला !"

मग आम्ही दोघी कसंबसं हसूं दाबीत घरीं निघायच्या, तों रंगनाथ बनीकडे हात करून ओरडायचा,

"ए ऽ ऽ बन्ये ऽ ऽ"

मग मी बनीच्या पोटांत कोपर खुपशीत म्हणायची,

"बनूवन्सं, तुम्हाला बोलावताहेत किल्लेदार—"

"हूं ऽ ऽ ! लाथ घालीन त्याच्या कमरेंत !"

बनीची एक गंमत होती. सगळीं तिला म्हणायचीं,

"बनीचं नी येडया किल्लेदाराचं लगीन लावून द्यायचं."

मग बनी अशी कांहीं चिडायची ! आत्तांदिखील तिनं मला चिमटा काढावा.

दिवसांतून केव्हां तरी कुशात्त्या आमच्या घरीं यायची, नी कमरेवर हात

ठेऊन आतेसासूब्राईंना सांगायची,

"जिऊ, या तुझ्या सुनेचा पाय मोड गो!"

"कां गो कुश्ये?"

"आगो! रांडेची सकाळीं त्या बनिटलीला घेऊन आमच्या आंगणाशीं उभी राहून खिदळत होती ही ही ही करून! नी विचारलं कां म्हणून, तशीं म्हणत्ये कशी, बनूवन्संच्या पायांत कांटा मोडलाय्! शेंबडी बनूवन्सं! गधड्या दोघी गंमत पहात होत्या रंग्याची!"

आतेसासूब्राईंनीं रागाचा आव आणून हांक मारावी,

"अंबे!"

पण मला ती हांक ऐकूं कशाला येत्येय्! मी दारामागं लपायची. मग आतेसासूब्राईंनीं कुशात्त्याची समजूत काढावी.

"आयत्या वेळीं सांपडेल तर ती अंबी कसली? कुश्ये, तूं जा हो! मी रागावेन तिला."

"नुसती रागाऊं नकोस. तुझं रागावणं मला माहिती आहे. अंब्ये म्हणून हांक मारशील, नी समोर आली म्हंजे हसायला लागशील. पायाला चटका दे तापलेल्या पळीचा!"

"दीन हो, दीन!"

कुशात्त्या गेली, कीं आतेसासूब्राईंनीं मला शोधून काढावं. माझे दोन्ही हात धरून विचारावं,

"अंबे! सांग. राह्यली होतीस कीं नाहीं उभी कुशात्त्याच्या दाराशीं?"

इतर कुणीहि रागावलं, तरी मला वाईट वाटायचं नाहीं. पण आतेसासूब्राई बोलल्या, कीं मग मात्र वाईट वाटायचं. टचकन् पाणी उभं राह्यचं डोळ्यांत. लगेच आतेसासूब्राई विरघळायच्या. मला पोटाशीं धरून त्या म्हणायच्या,

"रडूं नकोस हो अंबे! मी कांहीं रागावल्यें नाहीं तुझ्यावर. पण कुशी दुःखी आहे बिचारी. नक्षत्रासारखा होता रंग्या जलमला तेव्हां. पण लहानपणीं आजारी पडला. खालींसुद्धां ठेवला होता हा मेला म्हणून. तों पुनः जीव धरलान् त्यानं. पण तेव्हांपासून अस्सा वेडा. त्याला हसूं नये. त्याला कांहीं कळतंय् का? तिला बिचारीला तेवढाच आधार."

अशी होती कुशात्त्या. पण तीसुद्धां खाऊनपिऊन टुमटुमीत. रंगनाथाला खोलींत कोंडून ठेवायची, नी बागेंत एखाद्या गड्याला लाज येईल असं काम

करायची. तणवणं, बेणणं, नांगर धरणं, पातेरी करणं, कवळ तोडणं, अगदीं सगळं यायचं तिला. नी नुसतं येऊन काय करायचंय्? पण तिला यायचंहि नी करायचीहि ती.

तिला एक आशा. आज, उद्यां, परवां, केव्हां ना केव्हां माझा रंग्या ताळयावर येईल, नी मग मी त्याचं लगीन करून दीन! ती नेहेमीं म्हणायची आल्यागेल्याला.

"ऐकलंस का दामूअण्णा, मी नातवाचं मुख पाहून मग मराची हो!"

"कुशात्त्या, तूं आणखीन् सुद्धां जगशील. कशी टुणटुणीत आहेस अजून."

"जगेन त काय? जगेन हो. तूं माझ्यापेक्षां पंधरा वर्सांनीं लहान. पण तुझ्या केसांच्या झाल्या अंबाडया. तें पलीकडून कोण येतांय् सांग बघूं!"

"कोण—नाय बा दिसत मला."

"मला दिसतांय् रे स्वच्छ. पारी चालल्येय् टकल्यावर पाटी घेऊन! तुझ्या डोळयांच्या झाल्या कवडया! अजून दांत बघ माझे. रोठा सुपारी काड्दिशीं फोडीन. तं काय म्हणत होत्येंं, नातू पाहीस्तोंवर मराची नाहीं हो मी!"

अन् त्या आशेवर तिनं आपली बाग हिरवीगार ठेवली होतीन्. सांचण-बावेंतलं सांठलेलं पाणी स्वतः हिंडवायची बागभर. वर्साला खंडी दीड खंडी सुपारी व्हायची तिची.

कुशात्त्याची ही परी. मग व्यंकूभावजींच्या घरचं काय विचारतां?

ते तिघे भाऊ. व्यंकूभावजी थोरले, केरू मधला, नी वासू धाकटा. व्यंकूभावजी यांच्यापेक्षां दोन घटकांनीं वडील. नेहेमीं यांना म्हणायचे,

"म्हादेवा, अरे मोठेपणाचा मान माझा!"

"किती मोठा तूं माझ्यापेक्षां?"

"कां होईना! दोन घटका म्हणजे कांहीं कमी नाहींत."

"बरंऽ बरं. तूं थोरला. मी धाकटा."

व्यंकूभावजी—काय सांगायचं त्यांच्याबद्दल? स्वभावांत दुष्टपणा नसता, तर सगळी पडघवली त्यांनीं सोन्यानं मढवून काढली असती! पण—!

आज पडघवलीला अवकळा आल्यै. सगळेच्च कारण आहेत म्हणा त्याला. दसकी लकडी नी एकका बोजा. पण मुख्य कारण व्यंकूभावजी! आपलं सगळं शहाणपण त्यांनीं वाइटाकडे खर्चीं घातलं! नी एवढया नांदत्या गोकुळाचा मसणवटा केला!

पण आतां तेंच सांगायला बसल्यें. ओघाओघानीं येईलच सगळं.

माझं लगीन झालं तेव्हां व्यंकूभावजींचे वडील होते. म्हातारपणीं द्रिष्टी गेली, म्हणून घरचं सगळं व्यंकूभावजीच बघत. तिघे भाऊ खूप काम करीत. केव्हांहि घरीं जा. हे तिघे रिकामे म्हणून सांपडायचे नाहींत. सारखे हात चाललेत.

त्यांनीं धाकट्या पऱ्ह्याला खडकांत अडवून नी खडक फोडून त्या तीन घरांपुरतं पाणी आणलं होतं. त्या पाण्यावर त्यांची बाग सगळ्या पडघवलींत उजवी म्हणायची. भारी खटपट्ये. कुठूनशीं लवंगा नी मिऱ्यांचीं रोपंहि आणून लावलीं होतीं बागेंत!



आणखी दोनचार घरांचं सांगून मग आमच्या घराकडे वळत्यें.

आमच्या शेजारीं यांचे धाकटे चुलते यादोनाना. बनी म्हणून सांगितली तिचे वडील. पोर तेवढी एकटीच. बाकी दोघं भावंडं. तिघंहि मुलं म्हातार-पणीं झालेलीं. नी बनी सगळ्यांत थोरली. यादोनानांना तबला वाजवायचा भारी नाद. तेवढ्या पट्ट्यांत कुठं गाणं असलं, कुठं कीर्तन असलं, कीं यादोनानांना हट्कून बोलवायचे. वाजवायचेहि चांगलं. पण त्यामुळं बागेकडे दुर्लक्ष व्हायचं. चुलतसासूबाई भारी कष्टाळू. दिसायला अगदीं कशाशाच होत्या. काळ्याकुट्ट. दांत पुढं आलेले. डोक्यावरचे केंस सगळे गेलेले. पोफळाएवढी अंबुडी व्हायची त्यांची! त्यांत एका डोळ्यांत फूल पडलेलं!

पण बाई स्वभावानं भारी चांगली हो! नवरा असला नादी. तर बागेकडे ही स्वतः पहायची. भाताचे चोंढे होते. आंब्याचीं कलमं होतीं त्यांत. हें सगळं तिच्या खटपटीवर चालायचं. कलमं लागलीं, कीं राखणीला पहाटे उठून स्वतः जायची!

पाड लागला कीं कुळवाड्याचीं पोरं पहाटे अगदीं अंधारांतच आंब्याखालीं जायचीं, नी पडलेले पाडाचे आंबे वेंचायचीं. पण बनीची आई कुठली त्या पोरांना वेंचूं द्यायला! ती हातीं कळकाची काठी घेऊन पहाटे आंब्याखालीं उभी!

एकदां एक गंमत झाली. दामूअण्णाच्या घरीं आला पुण्याचा कुणी पाव्हणा. पहाटेस तो उठला, नी यादोनानांच्या चोंढ्याकडे परसाकडे गेला. अशी वद्याची द्वितीया कीं त्रितीया होती. चांदणं स्वच्छ पडलं होतं. पाव्हणा आपल्याच तंद्रींत चालला, तो आंब्यापाशीं आला.

त्याच्या हातांतला तांब्या पाह्यला, तशीं बनीच्या आईला चोरट्यासारखं झालं. ती आंब्याखालून बाजूला व्हायला लागली, नी छायेंतून चांदण्यांत आली.

पाव्हण्यानं हें ध्यान पाह्यलंन्, नी असा घाबरला! लागला बोंबटायला!

"दामू ऽ अण्णा ऽ ऽ! ह–ड–ळ–! धांवा!"

नी मग त्याला परसाकडे जावंच लागलं नाहीं!

बनीच्या आईला झालं चमत्कारीक. ती पुढं येऊन सांगायला लागली,

"अहो, मी हडळ नव्हे! बनीची आई—"

पण हें ऐकायला शुद्धीवर कोण होतं? बनीची आई जवळ आलेली पाह्यली नी पाव्हणा फेंफरं येऊन आपला बेशुद्ध पडला! मग दामूअण्णा, दत्तूअण्णा सगळे धांवत आले. त्यांना काय झालं तें उमगलं, तशीं पाव्हण्याच्या डोळ्यांत कांद्याचा रस पिळीत दामूअण्णा म्हणाला,

"वहिनी, तूं अडमडत्येस कशाला पहाटेस? कुणी एखादा तुला पाहून खपायचा दिखील."

बनीच्या आईच्या डोळ्यांत टचकन् पाणी उभं राह्यलं. ती म्हणाली,

"दामूभावजी, मी मुद्दाम भिववायला का गेल्त्यें?"

"अगो हो! ढीग नव्हती गेलीस. पण पाव्हणे भ्याले ना?"

"आतां देवानीं केलं आहे मला असं. मी काय करूं या रूपाला?"

"कांहीं करूं नकोस. पहाटेस कुणाच्या द्रिष्टीस पडत जाऊं नकोस म्हंजे झालं."

"नी मग आंबे?"

"असे काय मोठे आंबे आहेत! रांडेच्चीं दोन कलमं!"

"दामूभावजी, तीं दोनच दोनशेंच्या जागीं आहेत हो आम्हांला!"

"बरं बरं! एवढी काळजी आहे, तर यादोनानाला धाडीत जा राखणीला."

"दामूभावजी, तुम्ही तरी माहीत नसल्यासारखं बोलतां! त्यांना त्यांच्या त्या मडक्यांपुढं वेळ आहे का घराकडे पाह्यला? ते थोडं ध्यान देते तर—"

यावर काय बोलणार दामूअण्णा! डोळे पुशीत बनीची आई घरीं परतली.

यादोनानांची ही परी. आंधळ्या भिऊआबाची निराळीच तऱ्हा! देव करतो, तें सगळं बऱ्याकरतां करतो म्हणे! बरं म्हंजे हेंच कीं काय कोण जाणे. आपलं पहिल्या काळचं म्हणणं आहे, त्याच्यावर विश्वास ठेवायचा एवढंच. विश्वास न ठेवला, तर कांहीं जगायची सुद्धां सोय नाहीं. या विश्वासावरच तर जगल्येंय् एवढे दिवस.

भिऊआबाचं आंधळेपण अगदीं जगावेगळं. डोळे अगदीं स्वच्छ. भावल्या तेजस्वी. कुठं फूल नाहीं का सारा नाहीं. पण आपलं दिसायचं म्हणून नाहीं! अगदीं भिंतआंधळा!

बापानीं एका गरिबाची देखणी, गोरीगोमटी मुलगी पाह्यली, नी तिला मुलासाठीं मागणी घातली. मुलीच्या बापानीं हंडाभर सुरती रुपये मोजून घेतले, नी आपली नक्षत्रासारखी पोर भिऊआबाला दिली. माझ्या अगोदर दोन वर्सं भिऊआबाचं लग्न झालं. मी पडघवलींत आलें, नी भिऊआबाच्या बायकोला बघितलं. एका वर्सानं माझ्यापरीस लहान. मला भारी आवडली ती. पण बनी म्हणाली,

"माहीत आहे का तुला?"

"काय?"

"तिचा नवरा आंधळा आहे. आमचा भिऊआबा—"

"आंधळा?"

"हो."

"बनूवन्सं, आंधळा कसा असेल?"

"होऽओ! खोटं का काय? अगदीं भिंतआंधळा!"

"कांहींसुद्धां दिसत नाहीं?"

"नाहीं."

"माझीं बोटंहि दिसायचीं नाहींत? डोळ्यांसमोर धरलीं तरी?"

"मोठी आली बोटं धरणारी! अगो, हत्तीसुद्धां दिसायचा नाहीं हो!"

मला वाईट वाटलं. मनांत आलं, कशाला बिचारी जल्माला आली? जल्मभर आंधळ्याशीं संसार करायचाय्!

आतांहि तसंच वाटतं. कशाला जल्माला आली? पडघवली नासवलीन्—

पण आत्तां कशाला हवं तिचं पुराण? सांगायलाच बसल्यें आहें—सगळं सांगावंच लागेल. भलंहि अन् बुरंहि. पण ओघाओघानं अगदीं सांगावंच लागेल, तेव्हढं सांगेन.

भिऊआबाचं एक सांगितलं पाह्यजे. डोळ्यांनीं आंधळा. पण ते डोळे जणूं त्याच्या हातांनाच फुटलेत! मिरच्या तोडायला लागला, त नेमकी पिकली मिरची तोडायचा. पडवळं, कारलीं, तोंडलीं—हातांत धरलींन् कीं सांगायचा कोंवळीं कीं जून तीं. पोफळं पष्टाळायला बसला, कीं पहातां पहातां हा एवढा थोरला

ढीग व्हायचा त्याच्या पुढं. नी बिशाद सुपारीला धक्का लागेल! नेमकं सालपट तेव्हढं काढायचा.

नी कितीतरी पाठ होतं त्याला. दिंड्या, साक्या, आर्या, शिलोक, कित्ती कित्ती. एकपाठयाच होता तो. वडील शिकवायचे. तो पाठ करायचा. मोरोपंतांच्या भारताचीं कित्तीतरी पर्वंच्या पर्वं पाठ होतीं त्याला. गीताहि पाठ होती. पण बावेंत उडी घेऊन जीव दिलान् तेव्हां बरीक गीताहि कामीं आली नाहीं, नी भारतहि आलं नाहीं.

विचार करावा, तितका तितका खेद होतो. नी मग असं वाटतं, एव्हढं हें सगळं पाह्यला का देवानीं मला एवढं आयुष्य दिलं?

असूं दे. भिऊआबाचं घरहि खातंपितं होतं. तो आंधळा होता, तरी घरचा गडी जन्मभर त्याच्या दारीं खपला. त्यामुळं त्यालाहि कमी म्हणून पडलं नाहीं.

फोजदार तर काय! फोजदारच्च तो. बापाचा धाक होता तोंवेरी बरं होतं. तो गेल्यावर मग उतला, मातला, वाटेल तें मातीम्हसणं खायचाप्यायचा. पण सरकारची पोलिसपाटिलकी त्या घरांत होती, म्हणून तेंहि घर कांहीं उपाशी राह्यलं नाहीं.

खालीं भिकूनानाचं घर एक नावाजण्यासारखं. पाणीहि भरपूर. बागहि नामांकित. पसाराहि खूप मोठा. म्हशी पाळायचा भारी नाद त्याच्या वडलांना. भिकूनानानं तोच नाद चालवला. अगदीं जाफ्राबादेस्नं म्हशी आणायचा. ताज्या तुकतुकीत ठेवायचा. येता जाता साद घालायचा,

"भिकूनाना, यंदा कोणची आहे?"

"काठेवाडी आहे!"

"खालीं काय?"

"पारडी."

"दूध—"

"सकाळीं पांच शेर नी संध्याकाळीं पांच. ही एवढी थोरली आहे कास! या कीं बघायला! जनावर नामांकित आहे, काय समजलेत?"

मग त्या वाटसरानं म्हशीजवळ जावं.

"जवळ जा कीं! थाप टाका अंगावर. मारायची नाहीं—"

"नाहीं?"

"ऊं हूं! अगदीं बारकं पोर बसूं द्या धारेला."

"छान आहे हो! किंमत काय?"

डौलानें त्याच्याकडे पहात भिकूनाना म्हणायचा,

"नगदी अडीचशें दिलेत! नी पांच वर! काय समजलेत?"

ⵠ ⵠ ⵠ

आणखी एका घराविषयीं सांगायला हवंच. तें सांगितल्याशिवाय पडघवली पुरी व्हायची नाहीं, सांगायला बसल्यें, तेंहि संपायचं नाहीं.

वर डोणीवर परसूकाका म्हणून राहात. त्यांचीं दोन मुलं. थोरले गुजाभावजी नी धाकटे त्र्यंबकभावजी.

गुजाभावजी नी हे, या दोघांची भारी गट्टी. पण गट्टी म्हटलं कीं समजेल कीं नाहीं कोण जाणे. दोघे दिसायला दोन, पण आंत अगदीं एक. अगदीं लहानपणापासून हा मैतरपणा. तसं पाह्यलं, तर दोघांत कांहीं फारसा सारखे-पणा नव्हता. हे प्रकृतीनं अशक्तच. सारखं कांहींबाहीं होत असायचं. दर चौथ्या सहाव्या दिशीं चुलीवर कसला ना कसला काढा कढतोय्.

पण गुजाभावजींचं नेमकं उलटं. त्यांची तब्येत अगदीं ठणठणीत. म्हातार-पणीं सांगत ते,

"अंबावहिनी, एवढा म्हातारा झालोंय्. पण कधीं सुंठ कांहीं घातली नाहीं कपाळावर! नाहीं तर तुझा म्हादेव! जल्मभर चूर्ण नी काढे सुरू! आपला खातोय्! आज त्रिफळा, तर उद्यां सुदर्शन! सगळ्या जल्माचं आर्यमहौषधालय करून टाकलंनी!"

गुजाभावजींना उत्तर देऊन प्रपादायची सोय नसायची. त्यांचंहि अगदीं खरं होतं. जल्मापासून आडव्या बांध्याचे. त्यांत वडिलांनीं सूर्यनमस्कारांची संवय लावून दिलेली. दूधहि प्यायले लहानपणीं. त्यामुळं शरीर कसं लिंबासारखं.

म्हातारपणीं फार धावाधाव झाली. झाली तरी कां? करून घेतली त्यांनीं आपल्या हातांनीं. तरी पण त्या धावाधावींतहि तब्येत खणखणीत!

तर काय सांगत होत्यें? हो. या दोघांचं भारी रहस्य. लहानपणींसुद्धां दोघांना एकमेकावांचून करमलं नाहीं. आमच्या घरास्नं गुजाभावजींचं घर उणंपुरं अर्ध्या मैलाच्याहि वरच घ्या दहा पावलं. पण अगदीं रात्र पडेस्तोंवर हे दोघे एक्या ठिकाणीं असायचे. नी मग रात्रीं घरीं गेले कीं दोघेहि मार खायचे.

दहा वर्सांचे होते हे दोघेहि, तेव्हांची एक गंमत सांगत्यें.

केशवभट अंजनवेलीहून आले, ते अगोदर राह्यले सड्यावर. रायवळ आंब्यांची एक राईसारखी होती, त्यांत तात्पुरतं घर बांधलं त्यांनीं. कुळवाड्यांचे घरटे होते, [illegible] अर्ध्या हांकेवर. पुढं जेव्हां खालीं बागा झाल्या, तेव्हां तें घर पाडून त्याचे वासे नी कौलं खालीं वापरलीं त्यांनीं. आतां नुसतं जोतं राह्यलंय् तिथं. त्या जोत्याशेजारीं जांभ्या कातळांत त्यांनीं खणलेली एक बाव होती. केशवभट तें घर सोडून आले, तशीं कोणी पाणी भरीनाय् तिथं. कुळवाडी सगळे डोणींतल्या डुऱ्यांत पाणी भरायचे. पण रांडेचे हितल्या हितं बावेवर कांहीं यायचे नाहींत. ते म्हणायचे,

"यवरा वर वढील कोन पानी बावंतून? डुरींतला पानी द्येवानं दिलेलां. बावंतला मानसानं खनून काडलेलां."

तर त्या बावेंतल्या पाण्याचा उपसा कांहीं व्हायचा नाहीं. गुरंढोरं चरत भोंतालीं, म्हणून आजेमामंजींनीं कुपाटी घातली होती बावेभोंतीं. कुणी गुरूं पडूं नये म्हणून.

अमोशा होती. जेवणंबिवणं अवशींच उरकलीं होतीं. हे मामंजींच्या धाकानं अंगणांत फेऱ्या घालीत परवाचा म्हणत होते.

"एकतीस अडचं साडेसत्त्याहत्तर, बत्तीस अडचं—"

"म्हाद्या!"

"कोण? गुज्या?"

"होय. बोंबटूं नकोस. हिकडे ये. एक जम्मत आहे."

यांना बाहेर जातांना पाह्यलं, तशीं मामंजी म्हणाले,

"मम्हादेवा, कोण? गुजा ना तो? रांडेच्याला दिवस नाहीं, रात्र नाहीं. नी तूं जाताहेस कुठं परवाचा अर्धवट टाकून?"

"कुठं नाहीं. मुतायला जातांय्."

"हितेंच जरा पलीकडे बस हो! लांब जाऊं नकोस अंधाराचा."

हे बाहेर गेले.

"काय रे गुजा?"

"चल माझ्याबरोबर."

"कुठं?"

"मसणांत. चल म्हटलं कीं चलावं. पायावर पाणी घाल म्हटलं, तर गोरड्या किती तोळ्यांच्या—!"

रस्ता पायाखालचा होता. दोघे निघाले. पण गुज्ञाभावजींनीं आपल्या घरचा रस्ता सोडून जेव्हां सड्याच्या रस्त्यावर पाऊल टाकलीं, तेव्हां बरीक हे थांबले.

"म्हाद्या!"

"ऊं हूं. कुठं तें सांगितल्याशिवाय आपण नाहीं या यायचे."

मग मात्र सांगणं आलं.

"सड्यावर जायचांय्."

"तें कळलं. कशाला?"

"ऊं:! तूं तरी असा आहेस हेंदरा!"

"हेंदरा? तर मग मी चाललों—"

"बारं बारं! नाहींस हेंदरा. मग तर झालं?"

"तरी पण कुठं जायचांय् तें सांग."

"तुला खूप सोनं मिळालं तर काय करशील?"

"सोनं? ओ हो! खरं सोनं?"

"हो."

"आईच्या बांगड्यांसारखं?"

"हो!"

दंड थोपटून हे म्हणाले,

"वा:! मग मी—मग मी—! पण कुठाय् सोनं?"

"आहे."

"कुठाय्?"

"एका जमतींत."

"तुला कसं कळलं?"

"काल रात्रीं बापू म्हणत होते."

"काय म्हणत होते?"

"केशवभटांनीं म्हणे सोन्याचे देव बावेंत टाकलेत. मुसुनमानांच्या हल्ल्याच्या वेळीं."

"सड्यावरल्या?"

"हो."

"हात्तिच्या! मग ते आपल्याला कांहीं मिळायचे नाहींत."

"मिळतील."

"कसे?"

"आज आमोशा ना?"

आमोशा आहे, हें कळलं बरीक, नी यांना भरलं कांपरं. यांनीं गुजाभावजींना धरलीं नी म्हणाले,

"गुजा! तुझ्या पाया पडतों. मला घरीं पोंचव!"

"कां रे?"

"आपल्याला बा भिती वाटते!"

"आहा रे! भित्री भागूबाई, चुलीशीं बसूबाई!"

भागुबाई म्हणवून घेणं यांना कांहीं आवडलं नाहीं.

"हें काय रे! पण—"

"पण नाहीं नी बीण नाहीं. जायचं."

"पण कसे मिळतील—"

"हो! तें राह्यलंच कीं सांगाच्चं. आमोशेला रात्रीं ते बावेच्या पाण्यावर तरंगतात."

"पाण्यावर?"

"हो. नी कुणी तरी काढून नेईलशी वाट पहातात."

"पण बावेंत उतरेल कोण?"

"मी उतरेन कीं! तूं आपला नुसता माझ्याबरोबर अस म्हंजे झालं."

"गुज्या!"

"आतां काय आणखीन् गुजा?"

"नव्हे रे! मी म्हणतों, आज भुतं निघतात ना रे?"

"हो! चुडीसुद्धां पेटतात. तुला पहायच्यात?"

"नको रे बा! तुझ्या पायां पडतों!"

"म्हाद्या, लेका आपल्याला काय करतात भुतं?"

"कां रे!"

"अरे, आपला गिऱ्ह्या नाहीं का?"

"हो—"

"तो हिंडतो चहूंकडे पडघवलीच्या. कुणाला येऊं देत नाहीं."

"मग आपण असं करूं या का?"

"काय?"

"लोणचांब्याशीं जाऊन गिऱ्ह्याच्या पाया पडूं."

"कशाला? हितंच पडूं."

"पण त्याला कळेल कसं?"

"कळतं त्याला. अगदीं तूं नी मी बोलतोंय् तेंसुद्धां ऐकूं येतं."

"तुला काय माहीत?"

"माहीत आहे तर! मी बापूंना उतरून घ्यायला रात्रीं कंद्या घेऊन जातों बंदरावर. तेव्हां तो माझ्या मागोमाग चालतो."

"कशावरून?"

"कशावरून काय? मला माहीताहे."

"शप्पत?"

"शप्पत!"

मग तेवढ्या रात्रीं हीं दोघं मुलं आपलीं त्या बावेशीं गेलीं! गुजाभावजींनीं जपून कुपाट्या काढल्या. बावेच्या बांधणींत चिरे बसवले होते. त्यांवर अंदाजानं पाय देत ते यांना म्हणाले,

"म्हाद्या, भिऊं नकोस बरं का!"

पण यांनीं त्यांचा दंड धरलीं, नी खालीं डोकावून विचारलीं,

"गुजा, देव दिसत नाहींत कीं रे!"

"एवढ्या वरून कसे दिसतील? तूं तरी खुळाच आहेस."

"ऐक गुजा. चल, परत जाऊं आपण."

"एहेरे! बांगड्या भर!"

"भरीन हो! पण तूं उतरूं नकोस. नाहीं तर मी बोंब मारीन!"

"आतां बरीक थोबाडीन हो म्हाद्या तुला! रांडेच्या बावेंत उतरतांय् मी. तुला नुसतं उभं रहावेनाय् बाहेर?"

यांचा हात हसडून गुजाभावजी आंत उतरले. दोन तीन पाह्यऱ्या उतरले असतील नसतील नी एकदम जे कोसळले, ते खालीं!

गुजाभावजी पडलेले पाह्यले, नी यांना जें रडूं आलं! मोठमोठ्यानें गळा काढायला लागले. कुळवाड्यांनीं ऐकलीं, तशीं तेहि हादरले. पण मग हे नांव घेऊन रडायला लागले, तशीं मग मात्र आठ दहा जण काठ्या घेऊन, चुडी पेटवून दबकत दबकत पुढं झाले. यांना पाहून एकानं हांक घातली,

"म्हादूनाना?"

"मीच रे काल्या! या रे लवकर!"

"झालं तरी काय?"

"गुजा देव काढायला विहिरींत उतरला! मेला रे तो ऽऽ! आयो ग ऽ!"

"चिप ऱ्हा! मांगं व्हा बगूं तुमी!"

मग चारसहा चुडतं बावेवर धरलीं चौ बाजूंनीं, नी आंत डोकावले. तों आपले गुजाभावजी कंगोऱ्याला धरून पोहोताहेत!

"मी हितं आहे रे काल्या!"

मग धांवत जाऊन दोर आणलीं. एक जण दोराला धरून खालीं उतरला, नी गुजाभावजींना वर काढलीं.

चांगला भरपूर मार लागला होता. आठदहा दिवस हंतरुणावर पडून होते गुजाभावजी. हे गेले तशीं यांना म्हणाले,

"म्हाद्या, लेका तूं तरी असला आहेस पेद्रूपापड!"

"मग? तूं बुडत होतास—"

"काय सांगूं नकोस! तूं केकाटलास नी देवांनीं बुडी मारली!"

△ △ △

आणखी एक गम्मत गुजाभावजी वानवानून सांगत.

ओणींतल्या मुसुनमानाची एक बकरी चटकली होती आमच्या बागेंत यायला. रांडेची अशी हुशार! एक्या डोळयानं चरायकडे लक्ष नी दुसऱ्यानं कुणी येताय् का काय याच्याकडे. माणसाचा वारा कांहीं लागू द्यायची नाहीं. हे तेला धरून ओणीच्या कोंडवाड्यांत घालायला भारी धडपडायचे. पण पुष्कळ दिवस जमेनाय्.

एकदां गुजाभावजी नी हे असे दोघे आमच्या घरीं फोडणीचा भात खाऊन बागेकडे निघाले.

"हाय! भारी बा तिखट खातात तुमच्या घरीं!"

"तिखट? हें तिखट आहे वाटतं! आई एकेका घासाला एकेक हिरवी मिरची कराकरा चावते, म्हाईत आहे का?"

"छल्! कांहींतरीच सांगताएस! शेंडा ना बुडखा!"

"पैज लावायची का—अरे गुजा!"

"काय रे!"

"रांडेच्या मुसुनमानाची बकरी—"

"कुठाय् ?"

"ती बघ ! केळीचं रोपटं खात्येय् !"

"हो रे हो !"

"मग ?"

"मग काय ? धराची."

"अरे पण रांडेची हातीं येत नाय्—"

"तिचा बापूस येईल ! तूं त्या बेचक्याची बाजू तेवढी संभाळ म्हंजे झालं !"

नी शेवटीं मग मोठ्या शर्थीनं त्या दोघांनीं बकरी धरली. तिचा कान घट्ट धरून पाठींत एक कणका घालीत हे म्हणाले,

"तुला खाल्ली वाघानीं ! रांडेच्च्ये, सोकली होतीस नाहीं का ?"

"थांब म्हाद्या. मारूं नकोस. कास भरल्ये बघ."

"आमच्या केळी खाऊनच भरल्यै."

"दूध काढूं."

"कशांत ?"

"रहाटाचा लोटा असेल ना ?"

"गळका ?"

"असूं दे. तिथं दाबून धरूं. तूं तंगडं धर हिचं. नाहीं तर चकवा देऊन पळून जायची."

मग गुजाभावजींनीं दूध काढलीं. यांचे तडाखे सुरूच होते. दोघे दूध प्यायले.

"उष्टं दूध प्यालास ना माझं ?"

"बरं बरं ! सांगूं नकोस आतां. नाहीं तर घरीं कानपटायचे."

"आतां काय करायचं ?"

"ओणीला कोंडवाड्यांत ना न्यायच्यै ?"

"हो. तूं कान धर. मी मागून शिपटीनं हाकलतों."

"हुंः ! शिपटीनं ? तें दांडकं घे."

"नको रे ! मरेल ना !"

"शहाणा आहेस. तूं घे."

मग गुजाभावजींनीं कान धरला, नी हे दांडक्यानं ढोसायला लागले. पण

बकरी अशी जहांबाज! जाम हालेना. शेवटीं फरफटत चालवली. शेताडींतून तर कसेबसे गेले पलीकडे. पण पऱ्ह्यांत ह्या थोरलाल्या धोंडी. रस्ता दोन धोंडींमधें अगदीं चिंचुळका झालेला एक्या ठिकाणीं. तिथं बकरी मुळीं खालींच बसली!

"आतां रे गुजा?"

"तूं कान धर. दांडकं हिकडे दे. शिंची कशी उठत नाहीं तें पाहातों. सांभाळ हो! नाहींतर हिसडा देऊन पळून जायची."

नी मग गुजाभावजींनीं हातीं दांडकं घेतलं. बकरीनं मान खालीं घातली. गुजाभावजींना आला राग. एक ढोसा असा कांहीं मारला! वर्मी लागला कुठं तरी नी बकरी लागली आचके द्यायला!

"रांडेची सोंगं करत्ये काय?"

पुनः एक ढोसा. बकरीनं केले डोळे पांढरे! जीभ बाहेर निघाली! मग मात्र यांनीं गुजाभावजींचा हात धरला.

"गुजा, कसं करत्ये रे!"

गुजाभावजीहि ताळ्यावर आले. बकरीनं हातपाय पसरले. हे धावले नी ओंजळींत पाणी आणून तोंडांत घातलीं. पण आतां काय उपयोग? गुजाभावजी कावरेबावरे होऊन बकरीला हालवून म्हणाले,

"अग बकऱ्ये, उठ! जा तूं आपल्या घरीं. नाहीं घालीत तुला कोंडवाड्यांत."

पण बकरीनं केलं होतंन् कूच! तसे दोघे तिच्या भोंतालीं बसून रडायला लागले!

मामंजींना कळलं, तशीं ते आले धांवत.

"कशी मेली रे?"

"आपोआपच—सहज मेली!"

"शिंच्यांनों! खोटं सांगतां नाहीं का?"

"नाहीं—ठेंच लागून पडली नी मेली!"

"नी हें दांडकं कुणाचं?"

मग खरं सांगावं लागलं.

"आमचं—"

यांना कानपटून मामंजी म्हणाले,

"खरं सांगा! नाहींतर हग्या मार दीन!"

पटकन् हे म्हणाले,

"आम्हीं!"

"तूं कीं गुजानं?"

दोघांनीं क्षणभर एकमेकांकडे पाहिलीं. नी मग पटकन् हे म्हणाले,

"मीं!"

"नाहीं काका! मीं! म्हाद्या खोटं बोलतो!"

"एहेरे! खोटं का बोलतों मी? मींच नाहीं का—"

"बार बार! जा घरीं आतां! रांडेच्यांनों, त्या मुसुनमानाची बकरी भरून द्यायला हवी."

नी मग बकरी कशानं भरून द्यायची, त्याचा खल करीत हे दोघेजण परतले.

अशी यांची नी गुजाभावजींची जोडी.



आतां आमच्या घरचं सांगायला हवं.

पण घरचं कसं सांगायचं? दुसऱ्याचं पट्दिशीं सांगतां येतं. पण आपल्यांचं तसं नाहीं सांगतां येत. आपल्या माणसांचे स्वभाव नेमके कळत नाहींत आपल्याला. गुणांचा चांगुलपणाहि ध्यानीं येत नाहीं. दोष मात्र खूप मोठाले दिसतात. दोषी माणसं अगदीं जवळ असतात ना? म्हणून.

कधीं कधीं गुणांचंहि तसंच होतं. उगीचच आपल्याला वाटतं. लोकांचं कशाला सांगूं? मी माझंच सांगत्यें. कोंकणांतलीं माणसं मूळचींच गोरीं असतात. त्यांत मी थोडी अधिक उजळ होत्यें. आमच्या पडघवलींत एक भिऊआबाची बायको सोडली, तर माझ्याएवढं गोरं कुणी नव्हतं. आतेसासूबाई म्हणायच्या,

"कशाला बोलतां म्हणावं जिभा लांबवून? आहे का कुणी आमच्या अंबी-एवढं गोरं? होऽ त्या भिऊआबाची बायको आहे हो—तेवढी बरीक आहे थोडीशी उजळ. तरी पण अंबीचं गोरेपण किनई वेगळं दिसतं बरं का!"

यामुळं बरेच दिवस मला असं वाटायचं, कीं सगळया जगांत गोरी कोण ती मी! पण पुढं अभिमान झडला!

त काय सांगत होत्यें—हो. आपलं आपल्याला धड कळत नाहीं. एकनाथी भागवतांत म्हटलंय् तसलं डोळ्याचंच उधारण घ्या ना आपल्या. डोळा अगदीं

आपला. डोळ्याएवढं जवळ डोळ्याला दुसरं कुणी नाहीं. पण आपल्याला आपला डोळा दिसलाय् का कधीं?

तरी पण पडघवलीचं वाटोळं झालं, त्यांत आमच्यांचा वाटा होता कीं नाहीं?

हो, होता.

नाहीं म्हणून भागायचं नाहीं. सांगायला बसल्यें त सगळं खरं खरं सांगितलं पाह्यजे. नाहीं तर सांगूंच नये मुळीं.

सगळेच पडघवलींतली दिवेलागणी मालवावी म्हणून हातांत पाणी घेऊन बसले होते. त्यांत आमचंहि घर होतं.

आमच्या घरीं सगळ्यांत थोरले हे. मग दोन मुलं झालीं नी गेलीं. त्यावर धाकटे गणूभावजी. त्यांच्या पाठच्या दुर्गावन्सं. त्यांच्याहून धाकटा आणखी एक मुलगा होता सासूबाईंना. पण जलमला तेव्हांपासून हाडांचा सांपळा. सगळं अंग सुरकुतलेलं. अगदीं रडणंसुद्धां माहीत नाहीं. उंदरासारख्या बारक्या डोळ्यांनीं लुकुलुकु बघत असायचा. दोन वर्सांचा झाला नी मेला. मेला तो कळलादेखील नाहीं.

मामंजी मीं फार थोडे दिवस पाह्यले. माझं लगीन झालं, नी वर्स दोन वर्सं सासर-माहेरच चाललं होतं. उगीच कुठं महिनाभर सासरीं जाऊन राहात्यें न राहात्यें तों बाबा गडी नी मेणा धाडून बोलावून घ्यायचे. मग तीनचार महिने कोण जातंय् सासरीं! पण पांचव्या वर्सास मी अशी संक्रांतीला म्हणून माहेरीं गेल्यें, तों पाठोपाठ आपला गडी हजर! मामंजी आजारी म्हणून निरोप.

बाबा मला घेऊन निघाले, नी पडघवलीस आले. पाहात्यें तो मामंजींनीं माझा ध्यास घेतलेला!

"सूनबाई कुठाय्?"

मी घरांत शिरल्यें ती सरळ आतेसासूबाईंनीं डोळे पुशीत मला मामंजीं-जवळ नेलं.

"आलीस सूनबाई? तुझ्यांत जीव अडखळला होता! सांभाळ आतां! केशवभटजींनीं मिळवलीं गांव. वसवलीं. एवढ्या पिढ्या नांदल्या. पूर्वजांच्या आशीर्वादानं कुणाला कमी म्हणून पडलं नाहीं. पण म्हादेव जरा धांदरट आहे. सांभाळा! त्याला तूं नी तुला तो. तुझ्या सासूनं माझं फार केलंन्. तिला दुःख दिसूं देऊं नका. नी सगळीं जिऊच्या म्हणण्याप्रमाणं वागा!"

त्या वेळीं मला यांतलं कांहीं कळलं नाहीं. बावळटासारखी मामंजींच्या शेजारीं बसून ऐकत होत्यें.

पण आतां कळतंय्. आतेसासूबाईच्या बोलाचं मोल आतां समजतंय्. आतां तरी का ? मीं त्यांची अवज्ञा कधींच केली नाहीं.

मामंजींच्या त्या शेवटच्या बोलण्यांत ह्यांचं वर्णन येऊन गेलं. त्याहून जास्ती काय सांगूं? नी कसं सांगूं? बायकांचा जन्म. पतीविषयीं वेडंवाकडं मनांतसुद्धां आणूं नये म्हणतात. एका परीनं खरं आहे तें.

पण आतां ते नाहींत. नी मी काय घडलं तें सांगायला बसल्यें. तेव्हां मर्यादा पाळून ओघाओघानं येईल तसतसं सांगेन.

सासूबाई माझ्या फार चांगल्या होत्या. कुणाच्या अध्यांत ना मध्यांत. कुणीं असं म्हटलं, असं. तसं म्हटलं, तसं. मामंजी गेल्यापासून त्यांनीं प्रपंचांत फारसं लक्ष घातलंच नाहीं. घरांत कर्त्या आतेसासूबाई होत्या. त्यामुळं त्यांच्यावर भार पडलाच नाहीं कधीं.

आतेसासूबाईबद्दल काय सांगूं? माझ्यातलं जें काय थोडंबहुत चांगुलपण आहे, तें सगळं त्यांनीं घडवलेलं आहे. त्या—

पण थांबा हं जरा. आतेसासूबाईच्या अगोदर दुसऱ्या एका देवाच्या जिवाबद्दल सांगायला हवं. कारण असं आहे त्याचं, कीं आतेसासूबाईच्याबद्दल सांगायचं म्हणजे सगळी कथाच सांगायची. मग मधें वेळ नाहीं मिळायचा इकडेतिकडे डोकवायला.

मी तिला देवाचा जीव म्हणत्यें. कां त्यानं तिला घडलं ? कां नेलं ? त्याचं त्याला ठाऊक.

तिचं नांव होतं आक्की.

ह्यांची दूरदूरची मावसबहीण होती ती. आईबाप लहानपणीं गेले. चुलत्यानं लग्न करून दिलं. पण लग्न तरी म्हणायचं का त्याला? पैसे घेतलेन् मेल्यानं. नी एका क्षय झालेल्या नवऱ्याच्या गळ्यांत बांधली! कशाला? म्हणे, त्याचं करायसवरायला त्याच्या घरचं कुणी नव्हतं!

आक्कीनं खूप केलंन् त्याचं. पण त्या रोगाला जरा सांभाळून रहायला हवं. नवी, उफाड्याची, दुसरपणाची बायको! दिवसभर आक्कीनं त्याचं करावं. रात्रीं बिचारी दमून त्याच्या पायथ्याशीं झोंपायची. पण—

मेला शेवटीं. हिला उघडी पाडून. जवळ होतं नव्हतं तें नातलगांनीं

लुग्नाडलीं. पंधरा वर्सांच्या आक्कीला सोंवळी व्हावं लागलं!

नी मग एक्या दिवशीं एक पातळ काखोटीस घेऊन आक्की आपल्या मावशीला शोधीत आमच्या घरीं आली.

"कोण तें? आक्की का काय?"

"मावशी ग ऽऽ!"

"उगी पोरी! रडूं नकोस!"

"रडूं नको तर काय करूं मावशी? सगळीकडून उघडी झाल्यें ग!"

"नी काका?"

"त्यांनीं सांगितलीं, लग्न करून दिलं—आतां तुझा माझा संबंध संपला!"

"मग आतां?"

"आतां? मावशी, तुझ्या दारीं आल्यें! म्हणतात ना? माय मरो नी मावशी जगो! तूं आसरा देशील, तर तुझ्या घरीं चार कामं करून पडून राहीन! न दिलास तर—"

"तर काय?"

"तर—तर बावा नी विहिरी कांहीं कोरड्या नाहींत!"

"आक्क्ये!"

"काय सांगूं ग मावशी? मेल्यांना जशा कांहीं आयाबहिणी नाहींत! नको सांगायला लावूंस!"

"नको सांगूंस आक्क्ये! थांब. मी येत्यें."

सासूबाईनीं आतेसासूबाईंना सगळं जाऊन सांगितलीं. त्या आल्या, नी क्षणभर पाहिली त्यांनीं आक्कीला. मग एकदम म्हणाल्या,

"रहा हो पोरी हितं! आम्ही चौघी तशी तूं पांचवी. कांहीं कमी पडायचं नाहीं तुला जल्मभर."

आक्कीनं पटकन् आतेसासूबाईंचे पाय धरले.

त्या दिवसापासून आक्कीला कांहीं हें अमुक एक करायचंय् असं सांगावं लागलं नाहीं. सारखा आपला तिचा हात सुरू. पहाटे उठायची अशी कोंबडीं आरवायच्या आधीं. तेव्हांपासून जें काम सुरू तें रात्रीं दहा साडेदहा वाजेपावतर. साडेदहा वाजतांसुद्धां एखाद दिशीं आपली दुसऱ्या दिसाकरतां भिजूं घातलेल्या डाळिंब्या उपसून बसायची! आतेसासूबाई म्हणायच्या मग,

"आक्क्ये! किती ग काम करावं? राहूं दे."

" जिऊआते, सकाळीं मग गडबड होत्ये—"

" होऊं दे. आहेत एवढ्या जणी. पोरी बसतील डाळिंब्या काढायला."

" पण मला तरी काय काम आहे दुसरं ?"

" अगो, पहाटे उठत्येस तूं! ढोरासारखी खपत्येस. द्मून नाहींस का जात ?"

आक्की एक स्वास सोडायची. आतेसासूबाई तिच्या हातून डाळिंब्या हिसकावून घ्यायच्या, नी तिला उठवून बळंबळं हंतरुणावर झोंपवायच्या. हंतरुण तरी कसलं होत? एक घोंगडी, नी त्यावर एक चौघडी. पांघरायला एक चौपदरी जुनेर. त्यावर हात उशाला घेऊन आक्की झोंपायची. मीं तर किती तरी वर्सं तिला झोंपलेलीच पाह्यली नाहीं. व्हायचं असं, कीं पोरवयामुळं मला लवकर झोंप यायची. अन् पहाटेस उठून पाहात्यें तों आक्की आपली कामं उपसत्येय् !

यामुळं व्हायचं काय कीं आमचं कसलंहि काम असो, आम्ही तें आक्कीच्या अंगावर टाकून हुंदाडायला मोकळ्या व्हायच्या. कितीक दिवस तर आम्हाला असं वाटे, कीं आक्कीनं आमचीं कामं केलींच पाहिजेत. तिला न झालं करायला, तर आम्ही तिच्यावर रागवायच्या.

एकदां सासूबाई मला म्हणाल्या,

" अंबे, ही एवढी सुंठ कुटायच्यैय्. कुटत्येस का ग?"

बनीनं बोलावलं होतंन् फरंमरं खेळायला. मी तिकडे निघाल्येंच होत्यें. तेवढ्यांत सासूबाईनीं काम सांगितलं! नाहीं कांहीं म्हणवेना. खलबत्ता नी सुंठ घेतली, नी स्वैंपाकघरांत गेल्यें. तिथें आक्की बसली होती केळफूल चिरीत.

" आक्के, ही एवढी सुंठ कुटून देत्येस का ग? मला किनई—"

" कां हो? काय झालंय्?"

" नव्हे ग! हात दुखतोय् माझा."

" अग्गोबाई! मग सांबरशिंगाचा ओढा—"

" न्हाऊं दे. कूट कीं!"

" कुटीन हो! असून द्या."

तिच्या भरंवशावर मी बनीकडे पळाल्यें. थोड्या वेळानं बनीशीं भांडून मी परतल्यें, तशीं सासूबाईनीं विचारलीं,

" झाली का गो सुंठ कुटून?"

हो म्हटलं, नी स्वैंपाकघरांत धांवल्यें. तर आपला खलबत्ता नी सुंठ जशीच्या

तशी ! रागारागानं आक्कीकडे पहात मीं सुंठ कुटली, नी सासूबाईंना दिली. पण आक्कीशीं कांहीं दिवसभर बोलल्यें नाहीं ! तिला तें जाणवलं. संध्याकाळीं अशी दाराशीं उभी होत्यें, तों माझ्याजवळ येऊन आक्की म्हणत्ये,

"अंबावहिनी !"

मी कशाला बोलत्येंय् !

"इश्श ! बोला कीं हो अंबावहिनी !"

"मग ? सकाळीं कां कुटली नाहींस सुंठ ?"

"चुकलं हो माझं ! आतां नाहीं करायची असलं. पण सकाळीं माझा हात किती कापला बघा केळफूल चिरतांना !"

"कुठाय् !"

"हा बघा !"

चांगली बोटभर चीर गेली होती तिच्या हाताला ! तरी आक्की दिवसभर काम करीतच होती ! अन् तिनं सुंठ कुटली नाहीं, म्हणून मी रागावल्यें होत्यें.

दिवसभर आक्कीचं यंत्र सुरू असायचं तें कां, हें मला मोठी झाल्यावर उमगलं. कधीं नव्हत तो तिला ताप आला एकदां. मीं म्हटलं,

"आक्कये, आज राहूं दे हो ! मी बसेन चुलीपाशीं."

पण तिनं कांहीं ऐकलं नाहीं ! शेवटीं दुपारीं पुनः वालांची डाळ निवडायला काढलीन्, तेव्हां मीं तिचा हात धरला, नी म्हणाल्यें,

"आक्कये, ऐकायची नाहींस का तूं ?"

"काय अंबावहिनी ?"

"ऊठ बघूं ! जाऊन पड हंथरुणावर !"

आक्कीनं जें उत्तर दिलंन्, तें उभा जन्म कांहीं माझ्या मनांतनं गेलं नाहीं आहे ! सारखं असं वाटतं, कीं देवा, कां हें मन घडवलंस ? नी ज्यांना सोसावं लागतं, त्यांना तें दिलंस तरी कशाला ?

ती म्हणाली,

"अंबावहिनी, माणूस रिकामं असलं ना, म्हणजे भलभलतं मनांत येतं. तें येऊं नये, म्हणून मी कांहीं तरी काम काढून बसत्यें."

"अग्गो, दिवसभरचं झालं ! पण रात्रींसुद्धां ?"

उदासवाणं हसून आक्की म्हणाली,

"रात्रीं ? कसं सांगूं अंबावहिनी ? रात्र सरतां सरत नाहीं ! जशी कांहीं

गिळायला उठत्ये हो! असं वाटतं—" पुढं कांहीं आक्की बोलली नाहीं. बोलण्यासारखं मुळीं नव्हतंच कांहीं!

ᘐ ᘐ ᘐ

मी सासुरवाडीस आल्यें, तेव्हां कांहीं दिवस गेले कौतुकांत नी नवीनपणांत. पण मग काय काय करायचं तें माझं मला उमगायला लागलं.

घरांत पोरं अशीं आम्ही तिघं. मी, दुर्गावन्सं नी गणूभावजी. मधून मधून दुर्गावन्संच्या अंगांत नणंदपण येई. तेवढं वगळलं, तर आमचा तिघांचा मैतरपणा जमला. नी भरीला चौथी शेजारची बनी.

माझ्या माहेरीं कांहीं बागा नव्हत्या. त्यामुळं हितं पडघवलींत आल्यें, नी हिरवागार गांव पाह्यला, तशीं मला असं झालं कीं किती पाहूं नी किती नाहीं. माहेरीं पाण्याचा खडखडाट. हितं अष्टौप्रहर हा एवढा थोरलां पऱ्हळ हात जोडून तयार. माहेरीं आमचीं दहावीस नांदतीं घरं सोडलीं, तर बाकी मग पीक आपलं सुमारच. आडजिभेनं खाल्लं, तर पडजीभ टुकत बसली. पण सासुरवाडी कशी छान खाती नांदती.

पहिल्या पाळींला आल्यें ती रात्रीं. सकाळीं उठल्यें नी पहात्यें, तों चहूंकडे नारळीपोफळी डुलताहेत! आपली टुकुटुकु पहात राह्यल्यें. दुर्गावन्सं आल्या, नी मला म्हणाल्या,

"वहिनी!"

माझं लक्ष नव्हतं.

"अहो नव्या वहिनी!"

मग मी भानावर आल्यें.

"काय?"

"अशा पहात काय राह्यलाय्?"

"कांहीं नाहीं—पण आपलं घर कुठाय्?"

"हेंच घर! इश्श! आणखी कुठलं घर?"

"हेंच? या बागेंतच?"

"होऽओ! कां तुमचं घर कुठाय्?"

"आमचं? आमचं उघड्यावर आहे. पण हितंच राह्यचं?"

"मग कुठं जायचं? पहा बाई तरी! ऐकलंस का बन्ये?"

दोघी फिसफिस करून हसल्या. पण तें कांहीं माझ्या ध्यानीं आलं नाहीं.

"नाइ—मी म्हणत्यें, अगदीं नेहम्मीं हितंच राह्यचं? या बागेंतच?"

"इश्श! हसत्येस ग काय दुर्गे! वहिनी, हितंच राह्यचं हो!"

मला फार आनंद झाला. मग मी बागभर हिंडल्यें. पाणी पिऊन उतल्या-मातल्या केळी पाहून मन अगदीं प्रसन्न झालं. माहेरीं सटींसहामाशीं कधींबधीं केळीचं एखादं पान द्रिष्टीस पडायचं. नि हितं कुणी ढुंकूनसुद्धां पाह्यचं नाहीं केळीच्या पानांकडे. गड्यांनासुद्धां जेव्हां सासूबाई केळीच्या कोवळ्या लुसलुशीत आगोतलीवर भात वाढायच्या, तेव्हां माझा जीव अगदीं थोडा थोडा व्हायचा.

पोफळीच्या झाडाचा देखणेपणा तर मला कित्ती तरी दिवस अपुर्वाईचा वाटायचा. नाजूक, सडसडीत, इवल्याश्या वाऱ्यानं डुलणारी पोफळ मला अगदीं माझी बहीणच वाटे. आमच्या बागेंतल्या जुन्या चारसहा पोफळी मामंजींनीं तोडलीं, तेव्हां तर मी रडल्येंसुद्धां.

पाटाचंसुद्धां तसंच. बागेंत हिंडत होत्यें, तेव्हां गडी पाणी फिरवीत होता बागेंतून. तो एवढा थोरला दोदाणेश्वर पाहून मला अशी मज्जा वाटली! गडी माझ्याकडे कौतुकानं बघायला लागला.

"आमच्या व्हयनी हाय् काय तुमी?"

मी धीटपणानं त्याच्याशीं बोलल्यें,

"हो. हें पाणी कुठून येतं रे?"

"पाटांतून."

"पाट म्हंजे बसायचा? त्याच्यांतून कसं येतं?"

तेवढ्यांत आले गणूभावजी.

"गनोबा! व्हयनीला पाट दाकवा पान्याचा."

मी घरीं आल्यें तेव्हांपासून गणूभावजी माझ्याशीं बोलायला पहात होते. मग पुढं त्यांनीं सांगितलं, कीं अगोदर माझ्याशीं बोलतांना त्यांना लाज वाटायची. मी कांहीं लाजल्यें नाहीं. माझा भाऊ वासू असा एवढाच होता. गणूभावजी बावळटासारखे इकडे तिकडे पहात राह्यले.

"अहो गणूभावजी, दाखवा कीं पाट!"

जागे झाल्यासारखे ते म्हणाले,

"अं—हो. चला."

आम्ही दोघं निघालों पाटाच्या कडेकडेनं. मधूनच गणूभावजी पाटांत पाय देत. मला भिती वाटूनच मी ओरडल्यें,

"गणूभावजी!"

"काय?"

"काय काय? पाट मोडेल कीं!"

हसून गणूभावजी म्हणाले,

"छल्. मोडत नाहीं पाट."

"मोडत नाहीं?"

"नाहीं."

"मग मी देऊं का पाय?"

"द्या कीं!"

जपूऽन मीं पाटांत पाय ठेवले. किती बरं वाटलं! पायाला कुरवाळीत पाणी वहात होतं. पुष्कळ वेळ मी उभी राह्यलें. मग गणूभावजींना विचारल,

"गणूभावजी!"

"काय?"

"काय नाहीं. हांक मारली कीं ओ म्हणावं." आठ वर्सांच्या अंब्रावहिनीनं आपल्याच बरोबरीच्या शेंबड्या गणूभावजींना शिकवलं.

"ओ म्हणायचं असतं?"

"होऽ ओ."

"बरं. ओ."

"तसं नाहीं. अगोदर मी हांक मारत्यें. नी मग ओ म्हणा."

"बरं."

"गणूभावजी!"

"ओ!"

"मी पाण्याची चूळ भरूं का?"

"भरा कीं!"

मग चुळा भरायला केली सुरवात. साध्या भरल्या. खुळखुळ केलं. गळाळा केलं. अगदीं तोंड दुखायला लागस्तोंवर चुळा भरल्या. मग गणूभावजी म्हणाले,

"चला कीं वहिनी. मला कंटाळा आलाय्."

"चला. पण गणूभावजी—"

"काय—नाइ, ओ!"

"मी पाटांतून चालूं का?"

"चाला कीं."

"कुणी रागवायचं नाहीं ना?"

"कुण्णी नाहीं रागवायचं. आपलाच आहे पाट."

माहेरीं पाऊस पडला, कीं आम्ही त्या गढूळ पाण्यांतून पायानं पाणी उडवीत चालत असूं. तशी मी हें स्वच्छ पाणी उडवीत चालायला लागल्यें.

"गणूभावजी!"

"ओ!"

"पाट खूप लांब पाह्यजे होता नाहीं?"

"म्हंजे काय झालं असतं?"

"आपण पाटांतूनच खूप लांब चालत गेलों असतों."

"हो."

"गणूभावजी—"

"ओ."

"पाट कुठून येतो हो?"

"एका जमतींतून. यायचंय् पहायला?"

"होऽओ."

तेवढ्यांत हांक आली.

"सूनबाई!"

चमकून मी पाह्यलं, तर आतेसासूबाई मागील दारीं हसत उभ्या होत्या. ओशाळून मी पटदिशीं पाटांतून बाहेर आल्यें.

"हिकडे ये."

चोरट्यासारखी मी जाऊन भिंतीशीं उभी राह्यल्यें. मला जवळ ओढीत आतेसासूबाई म्हणाल्या,

"आवडलं का आमच्या पडघवलीचं पाणी?"

"हो."

"नी बागा?"

"हो."

"हें सगळं आतां तुझं आहे हो! तूं गांवची खोतीण!"

हें सगळं माझं? खरंच? या हिरव्यागार बागा? हें रात्रंदिवस वाहणारं पाणी!

△ △ △

दुसऱ्या दिवशीं पहाटेस जागी झाल्यें, तों आतेसासूबाई चौघडी पांघरून भूपाळ्या म्हणत बसल्या होत्या. त्यांचा गळा भारी गोड. मी पुनः डोळे मिटून घेतले, नी ऐकायला लागल्यें.

उठोनिया प्रातःकाळीं। वदनीं वदा चंद्रमौळी।
बिंदुमाधवाजवळी। स्नान करा गंगेचें॥

माझी चुळबुळ त्यांना जाणवली, तशीं त्या म्हणाल्या,

"सूनबाई, उठा आतां."

उठून बसल्यें.

"परसाकडे जाऊन ये, तोंड धू. मी वेण्या घालून देत्यें. अंग धुवा. मऊ भात आवडतो ना?"

"हो."

"तर मग इवला इवला मऊ भात खा, नी मग फुलं आणायला पळा बागेंत."

तोंड धुवून आल्यें, नी आतेसासूबाईपुढं वेणीला बसल्यें. दुर्गावन्सं म्हणाल्या,

"जिऊआते, मी घालत्यें वहिनीची वेणी."

"आजचा दिवस मी घालत्यें! काय समजलीस? नी मग उद्यांपासून तुम्हीच घालायच्यात हो एकमेकींच्या वेण्या."

माझे केंस काळेभोर, नी खूप लांब. म्हणून जिच्यातिच्या उड्या पडायच्या माझी वेणी घालायला. कित्ती परोपरी करायच्या त्या बाया. कधीं तीन पेडी, कधीं अडीच पेडी, कधीं पांच पेडी. एकदां सासूबाईनीं माझी टोपवेणी सुद्धां घातली. आतेसासूबाईनीं पाहिली, तशीं त्या म्हणाल्या,

"हें गो काय वहिनी? टोपवेण्या नी कानशीलवेण्या घालायला सूनबाई का लहान का आहे आतां?"

"नव्हे हो वन्सं! पण किनी कशीहि वेणी घातली, तरी हिला शोभूनच दिसत्ये हो!"

तर काय, माझे लांब केंस ही मला एक शिक्षाच झाली होती. कित्ती तरी वेळ मान ताटकळून जाईस्तोंवेरी बसावं लागायचं.

मी लांब गेल्यें. तर सांगत होत्यें त्या दिसाचं. वेण्या झाल्या. अंगधुणीं झालीं. नी मग दुर्गावन्सं नी मी दोघी दुरड्या घेऊन बागेंत निघालों. गणू-भावजी उभे होते दाराशीं. ते म्हणाले,

"मी येऊं का?"

"कशाला? पोरींत पोरगा लोंब्रोडा—"

"तुला नाय् विचारीत मी. वहिनींना विचारतांय्."

"येऊं द्या ना दुर्गावन्सं!"

"बरं, ये."

तिघं मिळून पाट ओलांडून बागेंत शिरलों. टप्प्याटप्प्यांनीं उतरत बाग अगदीं पऱ्ह्यापर्यंत जाऊन पोंचली होती. वरच्या टप्प्यांत सांचणबाव होती. पाटाचं पाणी तिच्यांत साठायचं. बागेला पाणी द्यायच्या वेळीं तिचा तुंबा काढून पाणी खालीं सोडीत.

एखाद्या हपापल्या माणसासारखी त्या बागेकडे पहात चालल्यें. ठेंचसुद्धां लागली. दुर्गावन्सं म्हणाल्या,

"वहिनी, तुमच्या घरीं बाग नाहीं?"

"नाहीं."

गणूभावजींना कांहीं तें खरं वाटलं नाहीं. बागेवांचून घर कसं असेल? पण मग ते एकदम म्हणाले,

"वहिनी, तुमचं घर सड्यावरल्या कुळवाड्यांच्या घरांसारखं आहे?"

मला कुठं माहीत होता सडा? कांहींच बोलल्यें नाहीं. भावजी म्हणाले,

"दुर्गे, मी फुलं काढतों तगरीचीं. तुम्ही तोंवेरी उंड्या नी पोफळं वेंचा."

आम्ही दोघी पोफळींखालून हिंडायला लागलों. पिवळीं धम्मक पोफळं खालीं पडलीं होतीं एकटदुकट. तीं आम्ही वेचायच्या. पोफळ दिसलं कीं आम्ही दोघी धांवायच्या. कधीं कधीं तर टक्करसुद्धां व्हायची. मग मी म्हणायची,

"दुर्गावन्सं, थुंका."

"म्हंजे?"

"म्हंजे असं." मी थुंकून दाखवायची. तसं थुंकून दुर्गावन्सं विचारायच्या,

"थुंकलं म्हंजे काय होतं?"

"म्हंजे शिंगं फुटत नाहींत."

फुलं, पोफळं, उंड्या असं वेचीस्तोंवेरी सासूबाईची हांक यायची,

"चला गो भात जेवायला!"

पातळ भात, चार शिजाणे, कवडीकवडी दहीं, एखादा पोह्यांचा पापड असं सकाळचं खाणं उरकलं, कीं केळीच्या आगोतल्या तशाच गुंडाळून म्हशीच्या तोंडीं द्यायच्या. खाल्ल्या जागीं शेणगोळा फिरवायचा. नी मग पुजेची तयारी करायची. सासूबाईचं तबक वेगळं. आतेसासूबाईचं वेगळं. आतेसासूबाईच्या तबकांत तुळशीच्या नाजूक मंजिऱ्या नीट रचून ठेवायच्या. सासूबाईना कांहींहि चालायचं. चार फुलं, एखादं बेलाचं पान, चार तुळशीच्या टिकश्या, असं असलं कीं त्यांचं भागे.

देवपूजा पुरुषांकडे असायची. मामंजी होते तोंवरीं ते करीत. त्यांच्यामागं हे. मामंजींची पूजा षोडशोपचारी. सगळं त्यांना नीटनेटकं लागायचं.

पुरुषांच्या संध्येचंहि मांडून आम्हींच ठेवायचं. प्रत्येकाचं ताम्हन, फुलपात्र, पळी, वेगळं वेगळं. गणूभावजी एरवीं आमचीं कामंहि करायला धांवायचे. पण त्यांचं संध्येचं मात्र आम्हीं कुणींतरी मांडून द्यायला हवं.

दुपारचीं जेवणं झालीं, कीं निवडणंटिपणं निघायचीं. कामं काय, ज्या त्या दिवसांत जीं तीं हजार प्रकारचीं. वालांच्या दिवसांत गडी वालांचे भारे आणून टाकायचे, नी मग आम्ही सगळीं शेंगा काढायला बसायचों. वाळक्या वेगळ्या. ओल्या वेगळया. ओल्या लगेच सोलायच्या. नी सगळं झालं कीं मग फोलपटं, वेल सगळं म्हशीच्या पुढं जायचं.

पोफळींचीं पेंडं येऊन पडलीं अंगणांत, कीं मग पोफळं काढायचीं. लगेच विळ्या आणून माणसं सोडे काढायला बसायचीं. मला कांहीं मेलं जमेना तें. दुर्गावन्सं, गणूभावजी, हीं दोघं पहातां पहातां हा एवढा थोरला ढीग करायचीं. मी मग रडकुंडीस यायची. एकदां तावातावानं मी विळीवर पोफळ धरलं. विळी होती लावलेली. खस्सदिशीं हात कापला. मी तशीच पोफळाच्या मागं लागल्यें. पण गणूभावजींचं लक्ष गेलं.

"वहिनी—जिऊआते! वहिनीचा हात—"

"कां रे? आरडताहेस कां?"

"अगो वहिनीचा हात—"

"काय झालं?"

आतेसासूबाई धांवत आल्या. माझा हात उचलून त्यांनीं पाहिलीं.

"अंबे, काय केलंस हें?"

मग सगळीं धांवलीं. सासूबाई, मामंजी, दुर्गावन्सं, गणूभावजी. हेसुद्धां डोकावून गेले. मामंजी म्हणाले,

"म्हाद्या! नाहीं—तूं ये अगोदर! व्हा ग तुम्ही बाजूला! गधड्या, आम्ही सगळीं असतांना तूं रे तोंड कां घालतायस? चल नीघ!"

मग हळद घालून हात बांधला. केवढी त्याची जाहिरात! शेजारणीपाजारणी-सुद्धां येऊन गेल्या.

संध्याकाळीं मी माजघरांत एकटीच होत्यें. तशीं हे कुणीकडून आले कोण जाणे.

"श्शूत्!"

मीं त्यांच्याकडे पाह्यलं.

फुसफुसत विचारलीं,

"लागलं नाहीं ना फारसं?"

मला वाटलं, कीं त्यांना दाखवावं किती कापलंय् तें. पण तेवढ्यांत बनूवन्सं उपटल्या! त्या ही ही ही हसायला लागल्या. तशीं मग मी स्वयंपाकघरांत पळाल्यें.

अशी एकेका गोष्टीची ओळख व्हायला लागली. माणसांचीसुद्धां.



सगळीं माणसं दिवसभर पांगलेलीं असायचीं. तीं घरांत एकत्र व्हायचीं संध्याकाळीं आरतीला. आमच्या घरीं आरतीचं मोठं प्रस्थ. मामंजी होते तोंवेरीं ते संध्याकाळीं पुनः सायंपूजा करायचे. नी मग झांजा, तास, शंख, अशा वाद्यांनिशीं सायसंगीन आरती तासभर चालायची. कित्तीतरी आरत्या म्हणायचे ते. त्यांच्यामुळं घरांतल्या सगळ्यांना त्या आरत्या पाठ झाल्या होत्या. गणपतीची, शंकराची, देवीची, विष्णूची, त्रिपुरसुंदरीची, दत्ताची, पांडुरंगाची, नारसिंहाची, सद्गुरूची, ज्ञानेश्वराची, तुकारामाची, अशा कितीतरी. आरती झाल्यावर मंत्रपुष्पांजलीच्या आधीं देवे व्हायचे. मंत्रपुष्पांजली तर दरीभर गर्जायची.

येणारेजाणारे म्हणतसुद्धां मामंजींना,

"काका, तुमच्या इथल्यासारखी आर्ती अगदीं मुंबैलाहि नाहीं हो ऐकायला मिळत!"

"मुंबैला? मुंबैला कशी मिळेल? शहरांतून कुठं राह्यलंय् धर्मकर्म? आमचं

तरी काय, वाडवडिलांचं आहे, तें चालवतोंय् पुढें. आमच्यामागं किती चालेल तें पाह्यचं."

आमच्या घरांत झोपाळे दोन. एक ओटीवर. नी दुसरा माजघरांत, आम्हीं पोरासोरांनीं कुणी ओटीवर जायचं नाहीं. रात्रीं आम्ही आपल्या माजघरांतल्या झोपाळ्यावर बसायच्या. नी मग सुरू व्हायच्या ओव्या.

"वहिनी, ओव्यांच्या भेंड्या लावायच्या का?"

"ए, भेंड्या नको गडे. मग भांडणं होतात."

"मी नाहीं भांडायचों. ही दुर्गीच—"

"गण्या, मी जिऊआतेला दीन बरं का सांगून! ए आते ग—"

"एहे दुर्ग्ये! लगेच्च सांगायला नको कांहीं. वहिनी, तुम्ही आहांत बरं का हितं! मी म्हणालोंय् कां हो कांहीं तरी हिला?"

"लगेच वहिनीजवळ नकोय् फिर्याद न्यायला! वहिनी, आपण नुसत्याच ओव्या म्हणूं हो!"

"तुम्हीहि या ना गणूभावजी."

नी मग समेट होऊन ओव्या सुरू व्हायच्या.

**पहिली माझी ओवी। पहिला माझा नेम।**
**तुळशीखालीं राम। पोथी वाची॥**

दुसरी, तिसरी, चौथी, अशा कांहीं ओव्या झाल्या, कीं मग ओव्यांची आगबोट यायची पडघवलीच्या बंदरांत.

**पडघवली गांव। गेंगाण्या नी राघोभट।**
**पाठीला दिली पाठ। बंधुराया॥**
**पडघवली गांव। सतीच्या ओढ्यावरी।**
**भर उन्हाच्या पारीं। पिंपळ डोले॥**
**पडघवली गांव। गिऱ्ह्या करीतो राखण।**
**बागा गेल्यात भरून। पोफळींनीं॥**
**पडघवली गांव। भाताला आल्या लोंब्या।**
**गेंगाण्याच्या आंब्या। पाड लागे॥**
**पडघवली गांव। हिरडीच्या झाडाखालीं।**
**सावंतीण झाली। बाळंतीण॥**

रिसेला पेटलों, तर मग आतेसासूबाईदिखील येऊन ओव्या रचायला लागायच्या. अगदीं आक्कीसुद्धां.

मामंजी म्हणायचे,

"जिऊ, आतां झोंपूं देणारांत, का रात्रभर ओव्याच चालाच्च्यात तुमच्या?"

"नाहीं रे! बसल्यात पोरी, म्हणून आम्हीहि बसलों."

मामंजी तोंडानं पुरे म्हणायचे, पण आपण येऊन उंबरठ्यावर बसायचे.

"कोण कोण म्हणतांय्? सूनबाई म्हणत्येकाय?"

"तर! ती म्हणायचीच!"

"काका, तुम्ही आमच्याकडून बरं का!"

"गण्या, मला रे गाढवा कशा येतील ओव्या?"

"येतात तुम्हाला. तुम्ही आमच्याकडून. आते वहिनीकडून."

नी मग बरीच रात्र होऊन जास्तोंवेरी चालायचं ओव्यांचं चक्र.

मला न्हाण येस्तोपर्यंत आम्हीं पोरासोरांनीं माजघरांत आतेसासूबाईजवळ झोंपायचं. एक भली थोरली घोंगडी अंथरायची, नी त्यावर आमची अढी पडायची. मी आतेसासूबाईंच्या जवळ. मग त्या जुन्या एकेक गंमती सांगायच्या. हूं हूं म्हणतां झोंप लागायची.

हळूहळू गांव माझा असं वाटायला लागलं. बायकांचं हें असं आहे. कुठलं तरी रोप. कुठं तरी लागायचं. नी मग तिथलं पाणी, तिथली हवा, या सगळ्याशीं एकजीव होऊन जायचं.



सतीच्या ओट्यावर रोज संध्याकाळीं दिवा तेवे. त्या दिवलींत तेल घालायचं काम गणूभावजींचं. पण ते आजारी होते, म्हणून आतेसासूबाईंनीं सांगितलीं,

"अंबे, जा ग बायो तूं नी दुर्गी!"

"कुठं?"

"सतीच्या पणतींत तेल घालून नी वात पेटवून या. पण लवकर या हो! संध्याकाळ झाल्यै. फार वेळ थांबूं नका."

आम्ही दोघी निघालों. वाटेंत आंधळ्या भिऊआबाची बायको संध्याकाळचे केरवारे करीत होती. आम्हाला पाहून ती म्हणाली,

"दुर्ग्ये, कुठं चालल्यात ग?"

"सतीची दिवली पाजळायला. तूं येत्येस?"

"मी? घरांत कुणी नाहीं!"

"भिऊआत्रा कुठाय्?"

तिची मुद्रा पटकन् उदास झाली. ती बळंबळं हसून म्हणाली,

"ते बागेंत आहेत."

"चल कीं! आत्तां येऊं."

मग तीहि आमच्या बरोबर निघाली. नी मग हिरव्यागार बागांमधून आम्ही तिघी हातांत हात घालून चालल्लों.

दत्तूअण्णा आपल्या बागेच्या एक्या कोपऱ्यांत ऊंस, भेंड्या, वांगीं असा माळवा लावी. असा देखणा माळवा मीं कधीं आमच्या गांवीं पाह्यला नाहीं. कधीं तो काळे तीळ पेरी, कधीं मूगहि करी. काळ्या तिळाच्चीं पिवळीं फुलं धमारलीं, म्हंजे द्रिष्टीला कसं सुख होई. त्याच्या बागेच्या कडेनं जातांना ऊन कांहीं लागायचं नाहीं. एक्या बाजूनं त्याच्या माडांची सावट, नी दुसऱ्या बाजूनं दामूअण्णाच्या कलमांची. म्हणून त्या वाटेनं येणंजाणं मला भारी आवडायचं.

मी आपल्याच तंद्रेंत चालल्यें. या दोघींचं चाललं होतं—

"दुर्ग्यें, आंबोशी आहे का गो तुमच्या घरीं?"

"हो ऽ ओ! खूप केल्येय्. हवी तुला?"

"हो बाई! आमच्या घरची संपल्यै."

"जिऊआतेला सांग. म्हंजे ती दील."

"कां? अंबूताई नाहीं द्यायची वाटतं?"

"ती कशी दील?"

"कां? जिऊआते तर म्हणत होत्या, आतां मालकीण ती म्हणून."

"हो बाई! आम्हाला कोण विचारतंय् आतां?"

दुर्गावन्संनीं मला डिवचलं. मग मी ताळ्यावर आल्यें.

"काय?"

"कांहीं नाहीं. म्हटलं, आम्हाला कोण विचारतंय्?"

"काय विचारायचंय्?"

"जाऊं द्या दुर्गावन्सं. आपण काय बोलत होतों, हिकडे एका माणसाचं लक्षच नव्हतं."

"हो बाई! अशीच करत्ये ही! बागेकडे पहात राह्यली, म्हंजे कोणतं

भूत झपाटतं कोण जाणे!"

"इश्श! हें काय हो दुर्गावन्सं—ईः!"

मीं उडीच मारली. माझ्या पायांतून जनावर संथपणानं सळसळत निघून गेलं. त्या दोघीहि घाबरल्या. पण जनावर पाह्यलं, तशीं म्हणाल्या,

"भिऊं नका वहिनी!"

माझी छाती अजून धडधडतच होती.

"जनावर—"

"ऊं हूं! चावत नाहीं कांहीं तें!"

"चावत नाहीं?"

"ऊं हूं! गरीब असतं."

"असलं कसलं मेलं जाडं!"

"दुतोंडं म्हणतात त्याला. तुम्हाला म्हाईत आहे वहिनी?"

"काय?"

"तो टेंबा दिसतोय् ना, तिथं मोठ्ठा थोरला महाराज आहे. केंस आहेत त्याच्या अंगावर बोट बोट—"

"इश्श! केंस कसे असतील दुर्गावन्सं?"

"हो ऽ ओ ऽ! जिऊआते म्हणत्ये. खूप खूप जुना आहे तो. पण चावत नाहीं कुणाला."

नी मग त्याच्या गोष्टी बोलत नी ऐकत भारावलेल्या मनानं आम्ही वाट उतरून पऱ्ह्याच्या कांठावर पोंचलों. सतीजवळ दिवा तेववला नी परत फिरलों. तोंवेरीं अंधार पडायला लागला होता.

"बरं का अंबावहिनी, सती म्हणे सामक्षा देत्ये."

"सामक्षा?"

"हो. अवसेपुनवेला किनी हितं कुंकू सांडलेलं असतं."

"दोन्ही ओऱ्यांवर?"

"म्हंजे एकावर हळद नी एकावर कुंकू."

भिऊआबाची बायको एवढी देखणी मुलगी. नांव कसं छान होतं शारदा. पण आपलीं सगळीं तिला भिऊवहिनी नाहीं तर भिवी म्हणत. अशीच पद्धत होती आमच्या गांवांत. मलासुद्धां म्हादी म्हणत कुणीकुणी. शारदा म्हणाली,

"चला गडे दुर्गावन्सं! उशीर झालाय्."

"तूं घरांत नसलेली भिऊआबाला कांहीं दिसायची नाहींस."

पुनः शारदा कोमेजली. तिच्या नवऱ्याचं नांव घेतलं, नी त्याचं आंधळेपण काढलं, कीं तिला भारी वाईट वाटायचं. ती तरी माणूसच होती ना! ती म्हणाली,

"इश्श! हें हो काय असलं? मी नाहीं यायची जा तुमच्याबरोबर."

मी पटकन् तिच्याजवळ गेल्यें, नी तिच्या खांद्यावर हात ठेऊन म्हणाल्यें,

"रागावूं नको हो शारदाताई! दुर्गावन्सं बोलतात खरं, पण त्यांच्या पोटांत कांहीं रहात नाहीं."

तिनं डोळे पुसले, नी म्हणाली,

"किनी अंबूताई, यांना दिसत नाहीं, त्याला मी काय करूं? मला का माहीत होतं का आधीं?"

"दुर्गावन्सं, तुम्ही म्हणाल, कीं मोठी आल्यै शिखवायला. पण असं बोलूं नये."

वन्संनाहि थोडं वाईट वाटलं होतं. त्या म्हणाल्या,

"आतां नाहीं बोलायची."

मिटलं सगळं. पुन्हां मोकळ्या होऊन आम्ही चालायला लागलों. लहानपणचं हें असं असतं. क्षणांत ऊन, क्षणांत पाऊस. रागवायला वेळ नाहीं, हसायलाहि नाहीं.

"दुर्गावन्सं, पाय उचलून चला बरं का!"

"हो बाई. अंधारायच्या आंत घरीं पोंचायला हवं."

वाट दोन जागीं फुटली होती. एक जायची सड्यावर. दुसरी ब्राह्मणवाड्याकडे. सड्याची वाट सोडून आम्ही आमच्या वाटेनं चाललों. एक्या ठिकाणीं दोहों बाजूंना सागाचीं नी हिरडीचीं झाडं होतीं. भारीच अंधारलं होतं तिथं.

त्या सावटीपाशीं आलों, तों आम्हाला वाटेवर पिवळीं फुलं पडलेलीं दिसलीं. मीं उचललीं, नी पाहात्यें तों सोनचापीं! अगदीं ताजीं तोडलेलीं. अशीं घमघमत होतीं! सगळी वाट जशी कांहीं शिंपडल्यै सुवासानं.

"अंबावहिनी, सोनचापीं!"

"हो ना! पहा ना कशीं छान आहेत तीं!"

"कुणीं टाकलीं कोण जाणे?"

"कोणी गेली असेल कौतुकाची कुळवाडीण!"

"पण आपल्याला नसती का दिसली? आपण समोरच तर होतों."

"आपण सतीशीं गेलों तेव्हां नव्हतीं!"

"खरंच कीं!"

"कोण जाणे बाई!"

एवढं बोलत बोलत आम्ही सावटींत शिरलों. तों वास आणखीनच यायला लागला.

"कसा छान वास येतोय् नाहीं अंबावहिनी?"

"हो ना!"

एवढ्यांत असं वाटलं, कीं कुणीतरी आमच्या मागं येतंय्.

चमकून मीं विचारलं,

"कोण तें?"

उत्तर नाहीं. आम्ही तिघी एकमेकींना चिकटून उभ्या राह्यलों. तेवढ्यांत काय भास झाला, कीं कुणीतरी आमच्या अंगावरून निघून गेलं! कोण तें दिसलं मात्र नाहीं! नी पुढं कुणीतरी हसल्याचं ऐकूं आलं! बाई ग!

आमच्या अंगाचं अगदीं पाणी पाणी झालं! तें हसणं विरत विरत नाहींसं झालं. मला काय वाटलं कोण जाणे. त्या दोघींचे हात धरले, नी आपली पळत सुटल्यें! तेलाची बुटकुली कुठं तरी पडली. पण लक्ष कुणाचं आहे तिकडे!

आतेसासूबाई ओटीवर वाट पहात होत्या—अजून का ह्या आल्या नाहींत? भिऊआबाच्या घराशीं शारदेला सोडलं. पुढं बनूबन्सं भावांना घेऊन रामरक्षा म्हणत होत्या. त्यांच्यावरून आम्ही दोघी तशाच धांवत ओटीवर शिरलों, नी धप्पदिशीं झोंपाळ्यावर बसलों. अजून आमच्या छातींत धडधडत होतं.

"काय गो झालं?"

आम्ही कांहींच बोललों नाहीं. आतेसासूबाई माझ्याजवळ येऊन बसल्या, नी म्हणाल्या,

"अंबे, भ्याल्यात का काय?"

त्यांना जेव्हां सगळं थांबत थांबत सांगितलं, तेव्हां त्या मला पोटाशीं धरून म्हणाल्या,

"सूनबाई, गिऱ्होबा हो तो!"

"गिऱ्होबा?"

"होऽ! तोच. तुम्हाला सामक्षा देऊन गेला. कुठायुत फुलं? पाहूं?—"

फुलं होतींच अजून माझ्या मुठींत. तीं पाह्यलीं, तशीं आतेसासूबाई म्हणाल्या,

"अंबे, बाई गिऱ्होबा तुझ्यावर प्रसन्न आहे हो!"

"माझ्यावर?"

"हो. ज्याच्यावर तो प्रसन्न असतो, त्याला अशीच सामक्षा देतो तो."

"पण माझ्याबरोबर दुर्गावन्सं नी शारदाताई—"

"कोण भिऊआबाची ना? अगो, त्या जुन्या. तूं नवी. तुलाच दिलेली सामक्षा हो ही! तीं फुलं नीट कुठं तरी ठेऊन दे."

रात्रीं गिऱ्होबाची कथा सांगितल्यावर आतेसासूबाई म्हणाल्या,

"अंबे, सकाळीं आपली लोणचाब्याशीं इवला दहींभात ठेऊन ये हो!"

दुसऱ्या दिवशीं मी नी दुर्गावन्सं गेलों, नी लोणचांब्याखालीं दहींभात ठेवला. मी हात जोडून म्हणाल्यें,

"गिऱ्होबाराया, सांभाळून घे हो!"



खूप पिके त्या काळीं. नि मग गांवांत कुठं चार दहा पानांचं निमित्य निघालं, कीं दहा पानांच्या ठिकाणीं पंचवीस पान अगदीं सहज होई. आणि जरा मोठं कार्य असलं, तर मग काय, घरोघरीं चुलीला निमंत्रण. ज्याचीं त्याचीं कुळं असायचींच. शिवाय आलागेला.

गांवांत आमचं घर मुख्य. म्हणून कुणी गांवचा पाव्हणा आला कीं तो आमच्याकडे. फौजदारकी खालच्या घरीं होती, तरीसुद्धां हवालदारबिवालदार यायचे, ते आमच्याकडे येऊन चहा पिऊन जायचे. एऱ्हवींहि गांवांत कुणाच्याहि घरीं पाहुणा आला, तर तो एकदां आमच्या घरीं आल्याशिवाय जायचा नाहीं. अगदीं कुळवाडवाड्यांत जरी कुणी आलं, तरी त्यानं खोताच्या घरीं तंबाखू ओढायला आलंच पाहिजे. आमच्या घरीं कुणी तंबाखू ओढायचं नाहीं. तरी आल्यागेल्याला पावशेर तंबाखू लागायची महिन्याला.

असा सगळ्या गांवचा मेळ होता. त्यामुळं कुणाच्याहि घरीं कार्य असलं, तरी सगळीं धांवायचीं. निरोप जायचे.

"दत्तूला म्हणावं, तुझ्या मांडवावर पडवळं झाल्यैत मोठालीं. माझ्याकडे ब्राह्मण जेवाच्चेत रे! काढून धाड तेवढीं."

"अच्या, जा पळ. मेल्या, लंगडताएस त मी काय करूं? हळू हळू जा.

जिऊआतेला सांग, उद्यां श्राद्ध आहे म्हणावं आमच्या घरीं. तुमच्या घरापुरतं दूध ठेवून बाकीचं हिकडे धाडायला सांगितलांय् म्हणावं आईनं."

"बन्ये, जा शेजारीं नि सांग, शुक्रवारची सवाशीण सांगितल्यै म्हणावं अंबा-वहिनीला तुझ्या. नि हें बघ, भाजी पाठवा म्हणावं कांहीं असली तर."

"काल्या, खोताकरे पल. जिऊआतेला सांग, सत्येनारायेनाची पुजा कराह्ची हाय. तवा म्हणावं, गाईचां तूप मांगलांय् माज्या बावानं."

नि मग त्या वस्तू त्या त्या घरीं पोंचायच्या. नुसत्या नव्हे. त्यांच्याबरोबर कधीं कधीं निरोपहि यायचे.

"रांडेच्याला म्हणावं, तुझ्या ढुंगणाला नाहीं लंगोटी, नि पाव्हण्यालापितांबर कशाला नेसवताहेस? असेल तेवढ्यांत करावं!—बरं, ने पडवळं. नि ऐकलंस का नाऱ्या, हिरव्या मिरच्याहि ने. नाहीं तर आयत्या वेळेला तुला पाकटवायचा."

अन् हे निरोप कुणी मनावरहि घ्यायचा नाहीं. फाड फाड बोलून मोकळे व्हायचे. मनांत कुणाच्या राह्यचं नाहीं. कुठं कुसणारी घाण थांबायची नाहीं. म्हणून निर्मळ वाहात्या नदीसारखं होतं एकंदर सगळं गांव.

अक्षत्रितीयेला चिपळुणाजवळ परशुरामीं मोठा उच्छाव. गांवोगांवचे कीर्तनकार तिथं हजेरी द्यायला यायचे. प्रसाद झाला नि दुसऱ्या दिवसाची तोफ आइकली, कीं सगळे खालीं उतरायला लागायचे.

त्यांतले चारसहा जण तिसऱ्या दिवशीं आमच्या गांवीं यायचे मुक्कामाला. एक होते सासवडकर. दुसरे कुणी डोळेबुवा. तिसरे—काय त्यांचं नांव, कोण जाणे. असे जाडेसे नि काळे होते. मोठे गमत्ये होते ते.

लग्न झालं नि सहा महिन्यांनीं ही मंडळी आली मुक्कामाला. पडशाबिडशा ठेवलीं, नि पंचांनीं डोकीं पुसत ते झोपाळ्यावर बसले.

"काय जिऊआते, लग्न केलंत ना यंदा भाच्याचं?"

"मी कोण कराची? पर्शरामानीं केलींन्."

"अहो, पर्शरामच सगळं कांहीं करायचा. कर्ताकरविता तोच आहे. पण माणूस निमित्य होत असतं ना?"

"हो ऽ ओ ऽ! तेवढी बरीक झाल्यें हो मी. पण तुम्हांला सांगत्यें बुवा, सून बरीक मनाजोगी मिळाली हो मला!"

"कुठाय्? आम्हांला दाखवा कीं!"

"अंबे, जा हो पोरी! नमस्कार कर बुवांना. तिघांनाहि कर हो!"

मीं नमस्कार केला. त्या जाड्या काळ्या बुवांकडे पाहून हसूं आलं होतं, तें तसंच दाबलं. ते म्हणाले,

"अष्टपुत्रासौभाग्यवती भव! छान आहे हो सून."

"आवडली ना?"

"आवडली हो! नांव काय ठेवलंय्?"

"ठेवलंय् अंबा."

"छान छान! म्हंजे गिरिजेचंच नांव! महादेव अन् अंबा! छान जिऊ-आते! ऐका. आर्या करतों."

नि मग त्यांनीं आपली पटकन् आर्या रचली—

**पडघवली सुग्रामीं जिउआते मृत्युलोकिं जगदंबा**
**गोजिरवाणी सुंदर सून तिला लाभली अहा अंबा ॥**

झालं! मग काय त्यांचं कौतुक! त्यांना आंघोळीला गरम पाणी रे! प्यायला दूध रे! कांहीं विचारूं नका. आतेसासूबाई मामंजींना म्हणाल्या,

"अरे, चार पानं अधिक व्हायच्यैत बरं का!"

"पाहुण्या कीर्तनकारांचींच ना?"

"हो! ते तर आहेतच. नि बरेच दिवसांत आपल्याकडे कांहीं झालं नाहीं. म्हणून आणखीनहि सताठ जणांना सांगितलांय म्हादेवाला धाडून."

"बरं केलांएस. मग म्हणत्येस काय?"

"काय म्हणायची? मोदक करायचायत. चार सुकडी पाडून धाड बागेंतून गड्याच्या हातीं."

सताठ म्हणतां म्हणतां चांगलं पंचवीसतीस पान झालं. याला बोलावलं, मग त्याला कसं नाहीं बोलवायचं? असं वाढत गेलं.

गुजाभावजी म्हणाले,

"म्हाद्या, तूं केव्हां बसणाराएस?"

"मी बा मागून बसेन."

"मग मीहि तुझ्याबरोबर बसेन."

"थांबताहेस कशाला? मला होईल उशीर."

"अरे लेका! बायकोच्या बरोबर बसायचा विच्यार दिसताय् तुझा!"

"छल्!"

"मग मला कां नको म्हणताहेस?"

"नाहीं म्हणत. थांब."

सगळी मंडळी आली. सोंवळीं नेसून पानांवर बसली. नि व्यंकूभावजींनीं लावलीं उशीर. दोनदां गणूभावजी जाऊन आले.

"म्हणाला काय?"

"येतांय् म्हणाला."

"रांडेच्च्या, येतांय् तें झालं. पण केव्हां?"

शेवटीं एकदांचे आले. नि मग पंगत बसली. शिलोकांचा नुसता धूमधडाका. मोदक नि तूप वाढायचं काम होतं माझ्याकडे. हे वाढीत होते पाणी. एकदां त्यांची नि माझी टक्कर व्हायला आली. गुजाभावजी खेकसले,

"म्हाद्या! डोळे उघडून चाल कीं!"

यांनीं त्यांच्यावर डोळे काढलीं. व्यंकूभावजी खोखो करून हसले. सारखे माझ्याकडे पहात होते. त्यांचं तें पहाणं मला मुळींच आवडलं नाहीं.

आतेसासूबाई दाराआडून म्हणाल्या,

"कथेकरीबुवा, ती आर्या—"

"हो हो! म्हणतों हां!"

नि मग त्यांनीं चांगली सुरांत आर्या म्हणून दाखवली. आतेसासूबाईनीं त्यांच्या पानांत मला दोन मोदक जास्त वाढायला लावलीं. नि वर तुपाची धार.

व्यंकूभावजी म्हणाले,

"वहिनी, आम्हांला नाहीं वाटतं?"

मला असा राग आला! वाढायला गेल्त्यें, तेव्हां मारे दोन्ही हात पानांवर धरून नको म्हणाले. आतेसासूबाई म्हणाल्या,

"अंबे, वाढ हो त्याला!"

जशी कांहीं मी वाढीतच नव्हतें. पानापाशीं गेल्यें, तेव्हां सारखे टक लावून पहात म्हणाले,

"आधीं नांव घ्या. तर घीन मोदक!"

जरासुद्धां लाज नाहीं. भोंतीं मोठाली मंडळी बसलेली. दत्तूअण्णा म्हणाले दिखील,

"व्यंकू, अरे, कांहीं लहान, मोठं?"

"मग? मी काय वावगं सांगतांय्? नांव घ्यायला—"

"अरे हो! पण तें तूं का सांगायच्चंस?"

"मीं सांगितलं म्हणून काय बिघडलं?"

"मला नाहीं माहीत. तूं आहेस माजोरा—"

मामंजी म्हणाले,

"असूं दे दत्तू. सूनबाई, म्हणतोय् तो तर घे नांव."

नांव घेतलं खरं, पण मला रागच आला व्यंकूभावजींचा.

जेवणं झालीं, नि पटापट उष्टींशेण करून मागलीं पानं घेतलीं. आतां गुजा-भावजींचा पत्ता नाहीं! शेवटीं आतेसासूबाई म्हणाल्या,

"कुठवर थांबाल पोरींनो? बसा तुम्ही. मी रहात्यें त्याच्यासाटीं मागं."

तेवढ्यांत घामाघूम झालेले गुजाभावजी आले.

"गुजा गेल्तास कुठं? वाट किती पाह्यची तुझी?"

"गेल्तों व्यंक्याला कसं बोलावं तें शिकवायला."

"रांडेच्च्या! मारलंस का काय त्याला?"

"मारलं नाहीं. पण पुनः असला चावटपणा केलन्, तर थोबाडीन."

हे म्हणाले,

"गुजा, तूं तरी भारीच आहेस हो!"

"भारीच? कशाला चोंबडेपणा केलन् त्यानं? मी पहात होतों सारं."

"काय?"

"शिंचा सारखा वहिनीकडे पहात होता. मानगूट धरून सांगून आलोंय्. पुनः असं केलंस तर कानपटीन म्हणून."

"बरं हो गुजा! तूं आपला जेवायला बस!"

एकदांचं विझलं तें तिथंच. संध्याकाळीं गुरव सगळीकडे कीर्तनाचं सांगून आला. रात्रीं कथेकरीबुवांना कुणाला जेवायचं नव्हतं. शहाळीं पाडलीं होतीं, तीं कोरून खाल्लीं. पाणी प्यायले. डराडरा ढेकरा देत बुवा म्हणाले,

"जिऊआते, ऐकलंत का?"

"काय?"

"आज रात्रीं आख्यान कसलं लावायचं?"

"द्रौपदीवस्त्रहरण—"

"नको. आज महादेव नि अंबेच्या विवाहाचं आख्यान लावूं."

"अहंविशेष!"

नि मग कंद्ये पाजळींत सगळा गांव आमच्या अंगणांत गोळा झाला. आम्ही

बायका पडवीवर बसलों. मीं आक्कीला सांगितलं,

"आक्क्ये, एक काम करशील का माझं?"

"काय?"

"बुवांनीं छानदार गोष्ट सुरू केली, कीं मला उठव हां!"

"म्हंजे झोपणार काय तुम्ही?"

"नाहीं ग! पण आपली झोप लागली तर सांगून ठेवत्यें."

मी, बनूवन्सं, दुर्गावन्सं, शारदा अशा जवळ बसलों होतों. तिकडे बुवांचा पूर्वरंग चालला होता. हिकडे आमचं फुसफुस चाललं होतं.

"ई! अंबावहिनी, बुवा कसे दिसतात ग?"

"कसे?"

"काळेकाळे दुस्स! जसा तेल्यामारुती!"

"दुर्गे, लग्न करतेस का बुवांशीं?"

"तूंच कर! बनिटली!"

"आहा ग! एवढंहि का समजत नाहीं? मी गंमत करत्येंय्."

"बोलूं नको जा आमच्याशीं."

"दुर्गावन्सं, अशा रागावतां कां?"

"मग? ती कां असं म्हणत्ये?"

"अहो, त्या कांहीं खरं खरं नाहीं म्हणत—"

"अंबूताई—"

"काय हो?"

"यादोनाना तबला बघा कसा वाजवताहेत ते—"

"अग्गो बाई! किती डुलताहेत ग डोळे मिटून!"

"मी सांगूं का कसे ते?"

"दुर्गे, माझ्या दादांची चेष्टा करशील तर मी चिमटा घीन हं!"

"मोठी आल्यै ग चिमटा घेणारी!"

तेवढ्यांत आतेसासूबाईंचं लक्ष गेलं आमच्याकडे. त्या म्हणाल्या,

"काय ग पोरींनों चाललंय् तुमचं? धडपणीं ऐकूंहि दीनात! अंबे—"

थोडा वेळ आमचीं तोंडं बंद झालीं. बुवांचा पूर्वरंग चाललाच होता. पोरंसोरं बुवांकडे पाय करून आडवींतिडवीं झोपलीं होतीं. मलाहि झोप आली.

"बनूवन्सं!"

"काय ग वहिनी ?"

"मी तुमच्या मांडीवर डोकं ठेवूं का ?"

"कां, झोप आल्यै वाटतं ?"

"नाहीं हो—आपली सहज."

"ठेव कीं."

मी बनूवन्संच्या मांडीवर डोकं ठेवून पडल्यें. केव्हां झोप लागली कुणास ठाऊक. आक्कीनं डोळ्यांना पाणी लावून उठवलं नि म्हणाली,

"अंबावहिनी, उठा आरतीला !"

"अगो बाई ! संपलं कीर्तन ?"

"तर काय ? बुवा गोष्टी सांगायला लागले, तेव्हां कित्ती उठवलं तुम्हांला."

मी एकटीच नव्हे, तर बनूवन्सं, दुर्गावन्सं, शारदा, सगळ्याच एकमेकींच्या अंगावर डोकीं ठेवून घोरत होत्या.

रात्रभर चक्रीकीर्तन करून तिघां बुवांनीं पहाट उजाडवली. आरती झाली. मंडळी घरोघर गेली. बुवा झोपलेच नाहींत. चुळा भरलीं; दूध प्यायले; आतेसासूबाईनीं साटांचा खाऊ दिला मुलांकरितां, तो पडशांतून ठेवलीं. मामंजींनीं दक्षिणा दिली ती कडोसरीला लावली. नि पडशा आमच्या गड्याच्या खांद्यावर देऊन निघाले.

"जिऊआते, येतों आतां."

"या. पुढल्या वर्षी आतां—"

"हो. पुढल्या वर्षी. सूनबाई कुठाएत ? त्यांचाहि निरोप घ्यायला हवा आतां !"

"तर—आतां खोतीण ती !"

"अहो अंबावहिनी, येतों बरं का !"

"या." मीं लाजत लाजत म्हटलं. दापोलीच्या वाटेनं बुवा चालते झाले.

ꕥ ꕥ ꕥ

कुशाल्यासारखा आवाज आला, म्हणून मीं डोकावून पाह्यलं, तर तीच होती.

रंगनाथ शहाणा व्हावा, म्हणून तिनं सोळा सोमवार केल्ते. ते येत्या सोमवारीं उजवायचे होते.

" जिऊ, सोमवार उजवायचाएत."

" धन्य हो कुशे तुझी! केलेस पुरते तूं सोमवार!"

" न करून कुणाला सांगत्येस बायो? आशा आहे ना? ती मेली कांहीं सुटत नाहीं."

" पाणी कशाला गाळत्येस कुशे? होईल हो रंग्या चांगला!"

" तुझ्या तोंडीं साखर घालीन हो! किती ग सोसूं मी? आतां माझं वय का आहे धावायचं?"

" नाहीं हो! शामत तुझी. तूंच आहेस म्हणून एवढं करत्येस. दुसरी एखादी—"

" जीव देती हो दुसरी एखादी!"

" खरंच देती बाई! इतक्यांना टक्कर देऊन—"

मी कांहीं तरी निमित्त काढून आंत येऊन बसल्यें. दुसऱ्याचं कांहीं असलं ऐकायला मिळालं, कीं बरं वाटतं. सगळ्यांनाच वाटतं. मीहि त्यांतलीच.

कुशात्त्या हळू आवाजांत म्हणाली,

" मेल्याचा डोळा आहे हो!"

" कुणाचा?"

" दुसऱ्या कुणाचा?"

" व्यंकूचा का?"

" नांवहि घ्यायची सोय नाहीं! जळांत राहून माशाशीं वैर—"

" कां नाहीं? कांहीं हबसाण नाहीं म्हणावं!"

" हळू बोल हो जिऊ! अगो, भिंतीला कान असतात हो! ही असलीच आहे वाटतं? अंबे, कुणाला सांगूं नकोस हो!"

" नाहीं."

" होऽओऽ नाहीं तर फट् म्हणतां संन्याशी मरायचा! शेजारीं रहायचांय् ना? पाणी तोडलंन् तर?"

" कठीण आहे बाकी हो!"

" म्हणून तर सोमवार केले. गुरुवार करत्यें—संकष्टया, एकादश्या, कांहीं करायचं ठेवलं नाहीं. न्हाऊं दे. तर सोमवार उजवायचाएत."

" या सोमवारीं का?"

" हो. उजवून घ्यावेत म्हणत्यें. पापड करून ठेवलाएत. सांडगे घातलाएत.

कुर्डया, चिकवड्या, सगळं कांहीं तयार आहे."

"केलंस तरी केव्हां हें सगळं?"

"केलं हळू हळू."

"शर्थ तुझी हो!"

"अगो, तांदूळ ठेवलेत बारकाचे."

"किती ठेवलेस?"

"आहेत पुरेसे. चार अधिक आगळं पान व्हायचं—"

"सगळ्या गांवाला का बोलावणाराएस?"

"अगो, कमींत कमी ब्राह्मणवाडा तरी नको बोलवायला?"

"करायचे काय? मुद्द्याचे तेवढे बोलाव."

"अगो, हे गेले तेव्हांपासून पान झालं नाहीं आमच्या हितं. होऊन जाऊं दे म्हणत्यें या निमित्तानं. नाहीं तर कुणी कुणाला रोज का बोलावतंय्?"

"बारं. मग आतां म्हणत्येस काय?"

"दुसरं काय म्हणाच्ची? तूं स्वतां उभी रहा येऊन. नि सगळं करून घे."

"काय काय करायचं?"

"आपलं थोडकंसं होमहवन, पुण्याहवाचन—अभिषेक सांगितलाय् करायला जोश्याला."

"पुण्याहवाचन कोण ठेवणार?"

"कोणाकडून ठेववूं?"

"रंग्याकडून कां ठेववत नाहींस?"

"तो का ठेवाच्याय्? कांहीं तरी खुळेपणा करील."

"मग काय म्हणत्येस?"

"म्हादेव नाहीं का ठेवायचा?"

"ठेवील तर काय झालं? पण रंग्याबद्दल तो हो!"

"हो. रंग्याबद्दल. मग येत्यें आतां. रंग्याला कोंडून ठेवलाय्. एकदां दुपारीं येऊन जा."

"यीन हो!"

कुशास्त्र्याकडून आल्यावर आतेसासूबाई मामंजींना म्हणाल्या,

"ऐकलंस का?"

"काय?"

"कुशीकडचं—"

"सोमवारच्या उद्यापनाचं ना?"

"हो. तर म्हादेव ठेवायचाय् पुण्याहवाचन. तूं सगळं उभं राहून करायचास."

"निमंत्रणं?"

"हो. सगळ्या गांवाला निमंत्रण करायचंय्. सोळा मेहुणं, पैपाहुणा, सगळं सगळं."

"कुशात्त्याकडे जाऊन आलीस एकदां? काय काय आहे, काय काय नाहीं—"

"गहूं मिळवून ठेवलेन् तिनं पानग्यांकरतां. दूध तेवढं सांगायला हवं. श्रीखंडपुरी करायची म्हणत्ये."

"भिकूनानाकडे सांगतों. दत्त्याकडे निघतं पांचसात शेर. आपल्या घरचं कांहीं. भाज्याबिज्या?"

"तें सगळं केलं आहे तिनं. सामान्य का आहे ती?"

"शाबास हो तिची! बाई कसली? बिनमिशांचा बुवाच आहे तो!"

झालं. सोमवारीं सकाळपासनं बनीची आई, सासूबाई, शारदा, दत्तूअण्णाची बायको, द्वारकीकाकू, अशा सगळ्या कंबरा बांधून कुशात्त्याच्या घरीं कामाला नि सैंपाकाला लागल्या. पोरं, पोरी, खेळणीं, रडणीं, भांडणं—सगळं घर कसं गजबजून गेलं. आतेसासूबाई म्हणाल्या,

"किती रे आरडतांय् कारट्यांनों!"

कुशात्त्या डोळे पुशीत म्हणाली,

"आरडूं दे हो जिऊ! कसं बरं वाटतंय्. जसं कांहीं घर जिवंत झालंय् आज!"

मामंजी ओटीवर बसून एकेक कामं करवून घेत होते. केळीचीं पानं कापणं, फाळके करणं, पान, सुपारी—सगळं.

मी नि हे दोघं बसलों होतों पुण्याहवाचनाला. गुजाभावजी मध्येंच चोंबडे-पणा करीत होते,

"म्हाद्या, लेका जरा सावरून बस कीं! असा ऐसपैस काय बसलाएस? आजूबाजूला दुसरीं माणसं बसलींत—"

"कां? तुला बघवत नाहीं का?"

"न बघवायला काय झालं? पण माझ्या वहिनीला अडचण होत्येय्—"

"तुझी वहिनी—नी माझी?"

"तें मला काय माहीत?"

"गुजा, तिथं कां तोंड घालताहेस? जा, पळ. गुरवाला म्हणावं, तुझा सनईचौघडा आला नाहीं अजून."

होमाचा धूर डोळ्यांत जाऊन पाणी येत होतं. नाकहि गळायला लागलं होतं. यांनीं कुणी बघत नाहीं असं पाहून पलीकडचा पंचा हात लांबवून घेतला, नि मला दिला. मीं तो घेतला, नि यांच्याकडे पाहून गालांतल्या गालांत हसल्यें. तसा गणूभावजींना ठसका आला!

तों व्यंकूभावजी येऊन हजर झाले. आमच्याकडे एक तिरकी नजर टाकली त्यांनीं, नि मग मामंजींजवळ गेले.

"काका, काय काय झालं? काय काय राह्यलं?"

"आत्तां आलाएस विच्यारायला, तो गेल्तास कुठं एवढा वेळ?"

"अहो, तो शिंचा राग्या शिरका—त काय म्हणत होतों, काय लागलं त सांगा हो!"

"सांगा हो म्हंजे काय? अरे, हें तुझंच काम. तूंच पुढं येऊन करायचास."

"तें खरं काका! पण त्याचं असं आहे—नाहीं, मी बसलों काय पुण्याहवाचनाला नी म्हादेव बसला काय—एकच तें. ताटांतलं वाटींत नि वाटींतलं ताटांत. मला म्हणाली होती कुशाच्या एकदां—पण मींच म्हटलं, तुम्ही करतांय् तें बरं होतंय् सगळं मोठेपणानं."

"बापूस कुठाय तुझा?"

"त्यांचे डोळे भारी बिघडले. म्हणून मीच म्हणालों त्यांना. हितं होमाबिमाचा धूर—"

"बारं बारं. सगळं झालंय आतां. रांगोळं तेवढं देस धाडून. आमच्या हितलं मोडलंय्."

"धाडतों."

"धाडतों म्हणून काळं नकोस करूं हितून."

"नाऽहीं! हा आतां आलों."

"नि हो—गुलाल आहे का तुझ्या घरीं? अन् काय रे, तुझी बायको नाहीं दिसली ती?"

"काका, तिला जुलाब होताहेत सकाळपासून."

"कशानीं रे?"

"काल रात्रीं जरा अपचन—काय समजलेत! असंच आहे तें पाण्याचं पितर—"

"अरे, मग तुझ्या मेहुणाचं कसं रे?"

"आमचा काई भरवसा धरूं नका काका."

"रांडेच्च्या! अन् आतां का सांगताएस? तूं तरी येणार आहेस का नाहीं?"

"हो हो तर! दाभोळला न लागलं जावं, तर मी येणारच अन्!"

पुनः एकदां आमच्याकडे पहात व्यंकूभावजी निघून गेले. काय होतं त्यांच्या मनांत तें हरी जाणे. पण आम्ही पुण्याहवाचनाला बसलों, तें त्यांना आवडलं नाहीं, एवढं बरीक खरं.

झालं. मंडळीं जमत चालली. ज्याचा कुणी नाहीं त्राता, त्याचा सगळा गांव दाता. सगळेच धावताहेत. सगळेच खपताहेत. येतोय् तो कांहीं बाहीं काम शोधतोय्. कुणी मातीच्या सोंगट्या करतंय् उदबत्त्यांसाठीं. कुणी केळीचीं पानं पुसतंय्. कुणी पाट मांडतंय्. कुणी पिण्याच्या पाण्याची सोयसाय बघतंय्. मामंजी म्हणाले,

"भिकूनाना, पळ पळ! त्या जोश्याचा अभिषेक संपलासा पाहून ये. हितं उरकलंय् सगळं. तोच बसेल लांबण लावीत."

"जोशी ना? दीर्घसूत्री तो. एक सूत्र म्हणेल, मग तपकीर भरील नाकाच्या फुंकणींत, मग दुसरं म्हणेल, नि मग नाक शिंकरून येईल—"

"बारं बारं! आतां पाढा वाचीत बसूं नको. जा लवकर."

पाट मांडले. पानं घेतलीं. पोरंसोरं एका बाजूला. पुरुष एका बाजूला. बायकांची पंगत आंत.

"चला रे! सोंवळीं नेसा."

पुरुष सोंवळीं नेसून पानावर आले. डावं उजवं वाढून आम्ही पोरी जेवायला बसलों. कुशाच्या ऐकेचना.

"अंबे, बायो तूं पहिल्या पंक्तीला जेवायला बस हो! म्हादेव नि तूं."

"अगो कुश्ये, ती वाढायला थांबेल."

"कांहीं नको वाढायला. आहेत पुष्कळ जणी. बस गो तूं."

मी आतेसासूबाईच्या तोंडाकडे पहात राह्यल्यें.

"बस हो पोरी तूं. आज कुशीच्या मनासारखं होऊं दे."

"पाह्यजे तर पान धर. अनशुद वाढ. नि मग बस हो."

बाहेर गुरवाची सनई नि चौघडा वाजत होता. पुरुष सगळे आले होते. उशीर झाला, त्यांना पोरं पाठवून बोलवून घेतलीं. पण व्यंकूभावजी दिसेनात.

त्यांचा धाकटा भाऊ वासू सोंवळं नेसत होता. त्याला मामंजी म्हणाले,

"वाश्या, व्यंकू कुठाय् रे?"

"मला नाय बा माहीत."

"तुला नाहीं तर कुणाला? ओणींतल्या मुसुनमानाला?"

"मघां कुठं बाहेर गेला."

"दाभोळेस तर नाहीं गेला ना?"

"छा:! दाभोळेस कशाला जाईल? सकाळींच तर निरोप आला, आज येऊं नका, उद्यां या म्हणून."

"आहे? मला सकाळीं म्हणाला—बारं. तुझी वहिनी?"

वासूनं काचकुच केलीन्. मामंजी आतेसासूबाईंना हांक मारून म्हणाले,

"जिऊ, अगो व्यंकूच्या बायकोला—"

"ती नाहीं यायची."

"कां?"

"नाहीं यायची. तब्येत बरी नाहीं म्हणे."

"बारं. कुशे, झालीं—पानं वाढलीं. निदान संकल्पाला तरी रंग्याला आण."

कुशात्त्यानं रंगनाथाला बाहेर आणलंन्. आज तिनं त्याला मारे रेशीमकांठी धोतर नेसवलं होतंन्. पण तें धरून ठेवावं लागलं तिलाच्च. सगळ्यांकडे पाहून रंग्या हीही हसायला लागला. जोशीबुवांनीं संकल्प सांगितलीं. रंग्याच्या हातांत पाणी दिलीं. त्यानं आपली तें खालीं सोडण्याऐवजीं चूळ भरलीन्!

मामंजी म्हणाले,

"जाऊं दे—असूं दे. झाला, सोडला संकल्प. चला म्हणा—व्यंतु नदयो...."

"नि काका तुम्ही?"

"अरे, व्यंकू नाहीं आला ना? तो येस्तोंवेरी थांबलं पाह्यजे. तुम्ही बसा."

पार्वतीपते होऊन मंडळी बसली. मी दारांत बसल्यें होत्यें. सगळी पंगत मला दिसत होती. मामंजी पंगतींत हिंडून हवं नको बघत होते. पोरांना टाकू

नका म्हणून दम देत होते. मंडळींना आग्रह करीत होते. वाढणारणींना वाढायला लावीत होते. कुशात्त्या डोळे वारंवार पुसत होती. जेवणारी मंडळी अगदीं घरच्यासारखं जेवत होती.

ती पंगत माझ्या द्रिष्टीसमोर अजून घोटाळतेय्. पुनः कधीं दिसेल तसलं घरगुती द्रिश्य?

शेवटीं दुपारीं चार वाजतां स्वतः मामंजी गेले, नि व्यंकूभावजींना बोलावून घेऊन आले. दोघं नवराबायको फोडणीचे कोरडे पोहे खात बसलीं होतीं!

ᘯ ᘯ ᘯ

मामंजी गेल्यावर त्याच वर्षी झालं दुर्गावन्संचं लग्न. मामंजींनींच ठरवलं होतं. पण ते अचानक गेले. त्यांच्या आजारीपणांत मी सासरीं आल्यें, ती मग फारशी माहेरीं गेल्येंच नाहीं. त्या लग्नांत सगळं मलाच करावं लागलं.

मामंजी गेले, त्याचं दुःख सगळ्यांनाच झालं होतं. पण कुणी गेलं, तर त्याच्या मागं जगराहाटी का बंद होत्ये? आतेसासूबाई म्हणाल्या,

"महादेवा, आतां किती दिवस वाढवायची पोरीला? पुढं तीन वर्सं करायचं नाहीं—"

"मग म्हणत्येस काय?"

"कांऽहीं नाहीं. तो ठरवून गेलाय्. उरकून टाका एकदांचं."

"उरकून टाका म्हणालीस आते. पण काय काय करायचं—"

"काय करायचं? कांहीं करायचं नाहीं. तूं पत्र टाक बिवलीला. म्हणावं, बोलणीं करायला केव्हां येऊं?"

"मी एकटाच?"

"एकटाच कशानीं? सगळा गांव आहे तुझ्या मागं उभा. गणू, जा रे दत्तूअण्णाला हांक मार. आते बोलावत्येय् म्हणावं. नाहीं तर हें बघ, अगोदर जा डोणीवर. परसूकाकाला बोलाव. मग येतांना दत्तूला हांक घाल. नि तसाच वर धाव मारून अंबूनानाला म्हणावं, आतेनं बोलवलंय् उभ्या उभ्या."

गणूभावजी लंगडी घालीत कुत्र्याला घेऊन पळाले. अर्ध्या तासानं परतले ते. दारांत उभं राहून त्यांनीं परवाचा म्हटला,

"परसूकाका येताय्. अंबूनाना येताय्. दत्तूअण्णा उजगांवला गेले. दामूअण्णा येताय्."

ते दोघे येऊन बसले. पोह्यांच्या ताटल्या घेऊन आतेसासूबाईंनीं दुर्गावन्संना बाहेर दवडलीं, नि मागोमाग त्याहि दारांत जाऊन बसल्या.

"कशाला केलेस पोहे जिऊ?"

"परसूकाका, एवढेसे चिमटीभर पोहे! केले होते घरांत, ते आणलेत पाणी प्यायला."

दोन फक्यांत पोह्यांची ताटली रिकामी केली, नि पाणी पिऊन मिशा पुशीत परसूकाका म्हणाले,

"कशाला बोलावलाएस?"

आतेसासूबाई डोळे पुशीत म्हणाल्या,

"दुसरं कशाला? गेलं माणूस तें गेलं. आतां दुर्गीला किती दिवस घरांत ठेवायची?"

"हां! तें तर आहेच. तूं कांहीं काळजी करूं नकोस जिऊ. तूं नुसतं सांग अमुकेक करायचांय् म्हणून. काय अंबूनाना?"

"तर काय! तुझ्या तोंडून शब्द निघूं दे. सगळा गांव हालेल. काय समजलीस?"

कसंबसं आपल्याला सावरीत आतेसासूबाई म्हणाल्या,

"अरे, तुमचा भरंवसा होता, म्हणून तर बोलावलं तुम्हांला."

"रडत्येस कशाला जिऊ? म्हादेव कुठाय्? म्हादेवा—"

हे मागं होते. ते आल्यावर परसूकाका म्हणाले,

"बिवलीकरांना पत्र टाक. काय समजलास? म्हणावं, केव्हां येऊं बोलणीं करायला तें सांगा. येत्या वैशाखांत उरकून टाकूं. हा शिमगा, चैत्र नि वैशाख. जिऊ, दोन महिने आहेत. तयारीला पुरेत ना?"

"होऽ! पन्नास जणींच्या लग्नाची तयारी होईल दोन महिन्यांत."

झालं. घरांतलं उदास वातावरण बदललं. संध्याकाळीं चिंगल्या दूध काढायला आला, त्याला आतेसासूबाई म्हणाल्या,

"चिंगल्या, म्हाताऱ्याला देस हो धाडून!"

"रातीं?"

"हो. काम आहे म्हणावं."

चिंगल्या आडविलकराचा बाप येसा आडविलकर. सत्तरी उलटून पंधरा वर्सं झाल्तीं. तरी म्हातारा ताठ होता अजून. अशा झापासारख्या पापण्या

लोंबल्या होत्या डोळ्यांवर. तरी द्रिष्टी सतेज. दंडांत चांदीचं पीळदार कडं. कमरेला मळकी लंगोटी. उघडाबंब. जल्मभर अंगांत कांहीं घातलं नाहीं.

येसा होता आमचं मुख्य कूळ. त्याचे चार पोरगे. चिंगल्या, बाल्या, काल्या नि सांवल्या. चौघेहि अजून त्याला भ्यायचे. कुणी अधिकउणं वागला, तर कानपटायला कमी करायचा नाहीं.

अंधारांत काठी आपटीत आला म्हातारा. आम्ही बसलों होतों जेवणं उरकून ओटीवर.

"आत्याबाय्—"

"ये रे येसदा."

"आलांय्. रातचां बलावलीस कशाला?"

"काम आहे म्हणून बोलावलं. तुला नाहीं बोलवायचं त कुणाला?"

"होऽहो! मनांच बलवायचां. सूनबाय बरी हाय् ना?"

"बरी आहे रे."

"हाय कुटं ती?"

"ही हितंच आहे."

"मंग बोलत कां नाय्? सूनबाय—"

"ओ."

"बरी हायस ना?"

"हो. बरी आहें."

"सुकानी नांदा."

"हिकडे ये असा येसदा ओटीवर."

"तकरं कशाला? हंयसरच बसतांय्"

"नाहीं. हिकडेच ये असा."

म्हातारा आला, नि डोळ्यांवर हात देऊन माझ्याकडे बघत झोपाळ्यावर बसला.

"येसदा—"

"वो."

"लगीन केव्हां करतायूस?"

"कुनाचां—माजां? उंद्या!"

"तुझं लग्न लागायचं गोवऱ्यांशीं."

"यवऱ्या लौकर?"

"वय किती तुझं?"

"तां मना न्हाई ठावां. असल पन्नास–साट."

"बारावं लागलंय् नाहीं म्हणालास."

"हो हो हो हो हो!"

"हसतायस काय आभाळ गडगडल्यासारखा?"

"हसूं नग त काय करूं? आतां ऱ्हायले तितके दीस हसून कारायचे. खोत ग्येला मना मांगं ठेवून. करायचां काय?"

"तें झालं रे! मी म्हणत होत्यें दुर्गीच्या लग्नाचं."

"हो हो, करायाच होवां!"

"मग केव्हां करणाराएस?"

"हाय खुटं दुर्गी?"

"आहे हितंच."

"घाय झाली काय घरांतून पलायची?"

"तिला नाहीं झाली. पण आतां किती दिवस ठेवायची?"

"तां खरा. म्हनतीस काय?"

"मी म्हणत्यें, वैशाखांत उरकायचं."

"ब्येस. करून सोडा."

"कुणी करायचं?"

"खरां बोललीस आत्याबाय. आमींच करायचां. खोत ग्येला. म्हादूनाना न्हान. तवां आमींच करायचां."

"मग त्रिवलीला जाताएस ना?"

"हो ऽ! जातांय्."

"तूं, परसूकाका नि म्हादेव."

"तिगांनीं नको."

"बरं—अंबूनाना यील."

"ब्येस हाय. कवा निंगायचां?"

"तें पत्र आल्यावर समजेल."

"समजूं द्ये. इकरची तयारी कशी कशी?"

"करूं रे!"

"करूं न्हाय. उंद्यापासून सुरू करा. बिवलीकरांनीं असां नाय म्हनलां पायजे, का खोत गेला, तवां येवस्ता झाली न्हाय्. उंद्यापासून सुनांना धारून घेतांय्."

"उद्यां नको धाडूंस."

"मंग?"

"पाडव्याला करायची सुरुवात."

चौघे जण बिवलीहून परतले. गुजाभावजी यांच्यावर रागावले होते. मी कांहींसं करीत होत्यें. तशीं आले दाणदाण काठी नि पाय हापटीत, अन् बसले झोपाळ्यावर.

"भावजी, आज अगदीं तापल्यै स्वारी!"

"त्या म्हाद्याला म्हणावं, मला थोबाडहि पहायचं नाहीं तुझं!'

"कां हो?"

"नाहीं पहायचं!"

"पण कां?"

"कां म्हंजे? गधडा बिवलीला जातांना मला घेऊन गेला नाहीं!"

"अहो पण—"

"बोलूं नको. तूं तरी त्याचीच बायको! मी का त्याच्या खांदल्यावर का बसून गेलों असतों?"

"मी काय करूं हो भावजी!"

"नाय ग—तुझ्यावर नाहीं मी रागावलों. त्याच्यावर रागावलोंय्."

"अहो, पण परसूकाका गेल्ते—"

"बापूचं म्हाईत आहे मला."

"काय माहीत आहे?"

"कुणीहि त्यांना चढवलं घोड्याघर कीं मग काय वाटेल तें कबूल करतील."

"अन् तुम्ही?"

"मीं? मीं साफ सांगितलं असतं. मुलीचा बापूस कांहीं नाहीं. तुमचे मानपान कांहीं व्हायचे नाहींत. आपले या, मुलगी नि नारळ घ्या, मीठभात जेवा नि चालायला लागा."

तेवढ्यांत हे आले आंतून. त्यांच्यावर सुरू झाला भडिमार.

"म्हादेवा, तूं जा पाहूं हितून! तोंड दाखवूं नकोस मला!"

"अरे गुजा—"

"गुजा खपला तिकडे! काय काय कबूल करून आलांत?"

"काय करायचं? काका बोलले होते तें—"

"म्हंजे हज्जार रुपै ओतणार ना बिवलीकरांच्या नरड्यांत?"

"मी तरी काय करूं?"

"क्याँ? म्हणे, मी तरी काय करूं!"

"गुजा, येसदा होता बरोबर. म्हणे कसा बिवलीकरांना, बिवलीकरांनो— त म्हणाले ओ. त म्हणाला, खोत ग्येला द्येवाच्या घरीं—पन त्याच्या बोलन्यांत तमाखूच्या चिमटीइतका फरक यायचा न्हाय. तुमी सगलां गांव यायाक् होवां!"

"मरा रांडेच्यांनो! घाला काय हवा तो गोंधळ!"

"अरे—"

"नाहीं! तुम्हांला आल्यैय् मस्ती—"

तेवढ्यांत येसदा म्हातारा आला काठी ठोकीत.

"आत्याबाय्! काय सूनबाय्, बरी हायस ना?"

"हो."

"सुकानी नांदा. आत्याबाय् खंय् हाय?"

"बोलावत्यें, बसा."

"येसदा, हा गुजा रागावलाय् हो तुझ्यावर."

"नाय बा! मी कशाला रागावूं? तुमचे तुम्ही काय हवा तो बाजार मांडून बसा!"

"गुजाप्पा, अरे झालां तरी काय?"

"व्हायचांय् काय? कांहीं झालं नाहीं."

"न्हाई कसां? म्हन्नां तरी काय हाय तुजां?"

"तिथं सगळ्या बिवलीला कशाला निमंत्रण देऊन आलास?"

थोडा वेळ म्हातारा गुजाभावजींच्या तोंडाकडे पहात राह्यला. नि खळकन् आपलं त्याच्या डोळ्यांत पाणी उभं राह्यलं! फडाफडा थोबाडींत मारून घेत येसदा बोलला,

"गान्द्यानां घातलां होतां रे सातमायला, खोताला न्ह्ये म्हनून! चंडाला— तो बघत आसल सर्गांतून! त्याला अंगारखांद्यावर वागवला, नि तो माज्या तोंडांत श्यान घालून गेलां निंगून! तो काय म्हनल? म्हनल—का माजी येकली पोर! मी असतां तर सगला दाभोलपट्टा गोला क्येला असता! नि यांनीं

ताकापुरतां रामायेन घालून माजी पोर उजवली!"

मी नि आतेसासूबाई दारांत येऊन उभ्या राह्यलों होतों.

"म्हादूनाना—"

"काय येसदा?"

"ऱ्हाऊं दे तुजां सामान तुज्यापाशीं! सगला कुलवाडवाडा इकून मी माज्या पोरीचां लगीन करीन. मी सबूद दिलाय् बिवलीकरांना."

पटकन् उठला म्हातारा. तशीं आतेसासूबाई पुढं झाल्या, नि काकुळतीनं म्हणाल्या,

"येसदा—"

"आत्याबाय, सांबाल तुजां सामान—"

"येसदा, शप्पत आहे तुला माझी! तूं गेलास त डोसकं हापटीन हितं ओट्यावर!"

गुजाभावजींना काय झालं कोण जाणे, पटदिशीं उठले, नि म्हाताऱ्याचे पाय धरले. त्यांना उठवून त्यांचे डोळे आपल्या लंगोटीनं पुशीत येसदा म्हणाला,

"गुजाप्पा, अरे रडताएस काय असा? तुजां म्हन्नां बरोबर हाय. पर अरे, खोताचा सबूद—"

"चुकलं माझं. तूं झोपाळ्यावर बस."

परत म्हातारा येऊन झोपाळ्यावर बसला. आतेसासूबाई पटकन् आंत गेल्या, नि वाटींत इवला गूळ घेऊन आल्या.

"घे येसदा."

"अदुगर गुजाप्पाला घे."

"देत्यें हो त्याला. तूं वडील. तूं अगोदर खायचास."

गूळ खाल्ला सगळ्यांनीं नि संपलं जौळ. भांडणं मिटवायचीं कशीं, तें आतेसासूबाईंपासून शिकावं.

"मग आतां कसं येसदा?"

"कसां काय? लगीन मांडलां. फाटीं नकोत?"

"हवींत तर. पण तीन मण भात घालायचं म्हणतें भिजत पोह्यांना."

"चार मन घाल."

"बरं, चार मण घालत्यें."

"सुना उंद्या सकालीं येतील कामाला. सगलां त्यांच्याकून करून घे!"

"सगळं कशाला? आहेत कीं—मी, वहिनी, आक्की, सूनबाई, दुर्गी—"

"दुर्गातायचां लगीन. तिला काम नको सांगूं. नि माज्या सूनबायला बी नको सांगूं!'

"कां हो मामंजी?"

"नाजुक नार माजी गौरीसारकी सूनबाय! कामाच्या रामरट्ट्यानं तिचा चिपार करूं नको!"

"अरे, पण काल्याची बायको गर्भारशी आहे ना?"

"असूं द्ये. कुलवाडी कामानी मरत न्हाय्. ती कुलवाड्याची सून हाय."

"मग फाट्यांचं कसं करतोस येसदा?"

"सड्यावर दोन रायवल आंब्याचीं झारां वठलींत. तीं तोरतों."

"तोड."

"समजलां काय म्हादूनाना—आतां मांगं सरूं नका."

"नाहीं."

"गुजाप्पा, समजलां काय?"

"हो."

येसदा गेला. हे गुजाभावजींना म्हणाले,

"गुजा, उद्यां चलताहेस चिपळुणास?"

"कशाला?"

"जाऊं मचवा घेऊन. सामान आणायला नको? साखर, गूळ, गहूं, मीठ—आते, गहूं आहेत ना गो?"

"आहेत थोडकेसे गव्हल्याबिव्हल्यांपुरते."

"ठीक आहे. मग केव्हां निघताहेस गुजा?"

"केव्हांहि. आत्तां कां चलेनास!"

आतेसासूबाईंनीं हांकारलीं,

"गुजा!"

"काय आते?"

"अरे, तूं लाडू केव्हां घालणारैस?"

"केव्हांहि. उद्यां. सैंपाक वहिनीला करावा लागेल!"

"तसले लाडू नको आहेत साधे."

"मग कसले हवेत? लोखंडाच्या चण्यांचे?"

"बरेच दिवसांपासून विचारीन म्हणत्यें गुजा—परसूकाका परवां मला सांगूनसुद्धां गेले. लग्न केव्हां करणारैस?"

"माझं लग्न झालंय् आते." गुजाभावजींनीं क्षणभर थांबून म्हटलीं.

"रांडेच्च्या! तें रे कुणाशीं?"

"व्यायामाशीं."

"गुजा, असं रे काय बोलतोएस? अरे, तो परसूकाका झाला म्हातारा. मेल्यांनो, किती दिवस त्याला चूल फुंकायला लावणार आहांत?"

"अलीकडे सैंपाक आम्हीच करतों. मी नि त्र्यंबक."

"मग सून आणायचाच का नाहींस?"

"यील कीं. त्र्यंबकचं लग्न करायचं म्हणतों पुढल्या वर्षी."

"अरे, पण तूं कां नाहींस करीत? तुला रे काय झालांय्?"

गुजाभावजी गंभीर झाले. ते म्हणाले,

"आते, तुला सांगून टाकायला हवं. एकदाचं नि शेवटचं. आईनं बापूंना नि आम्हांला जें छळलंन् तें मला स्वच्छ आठवतंय्. हाल हाल केले आमचे तिनं. आम्ही होतों खमक्ये, म्हणूनच वाचलों."

"मग?"

"नाहीं. मला बायकांची भीती वाटत्ये."

"माझी नाहीं वाटत का गुजाभावजी?"

"तुझी नाहीं वाटत वहिनी!" गुजाभावजी लाजून म्हणाले.

"कां?" मीं पुनः डिंवचलं.

"कां? तें नाहीं मला माहीत. पण तुझी नाहीं वाटत."

"अन् आमची रे गुजा?"

"तुमची आते? तुमचीहि नाहीं वाटत. आते, तूं फार चांगली आहेस. वहिनी मला फार आवडत्ये. पण मी लग्न नाहीं करायचा."

"कां तें नाहीं सांगितलंस!"

"मला वाटतं, माझी बायको बापूंना छळील."

"कशावरून?"

"कशावरून? ऐक आते. आमची आजी गर्गशा होती. तिनं पंजोबांना छळलं. आई कशी होती तुला माहीत आहे. इजा बिजा नि तिजा—माझीहि बायको बापूंना छळील."

"हें कांहींतरीच हो गुजा तुझं! माझी भाची आहे बघ. अगदीं नक्षत्रा-सारखी मुलगी आहे."

"बाहेर नक्षत्र असली, तरी आमच्या घरांत आल्यावर निखारा होईल. तें काय नाय. तुम्ही मला नसत्या भरीस पाडूं नका."

"नि मग त्र्यंबकची बायको नाहीं वाटतं छळायची? त्याचं लग्न करायला निघालाएस तो!"

"तो आहे—आतां तुझ्याजवळ सांगायला हरकत नाहीं आते—डोणीवरल्या डुरीवर पाणी भरायला येतात कुळवाडणी. त्यांच्याकडे बघत बसतो तो. तेव्हां त्याचं लग्न करून द्यायला हवं."

"मग त्याची बायको नाहीं वाटतं छळायची परसूकाकांना?"

"माझ्याजवळ एक रामबाण आहे कीं!"

"कसला?"

"त्याचं लग्न करून दीन, नि लगेच त्याचा वेगळा प्रपंच मांडून दीन."

"नि परसूकाका?"

"आम्ही बापबेटे वेगळे राहूं!"

"धन्य हो तुझी गुजा! अरे, पण तूं लग्न करणार नाहींस, तर लोक नांवं नाहीं का ठेवायचे?"

"ठेवीनात कां रांडेच्चे! माझं काय बिघडतंय्?"

"अपवाद लावतील!"

"दांत पाडीन अपवाद लावणाऱ्याचे."

"पाडशील बाबा."

"त हें तुला सांगितलांय्. बापूंजवळहि बोललोंय्. आतां मला विचारूं नका. मी सांगायचा नाय् इथून पुढं."

"बरं बाबा!"

"म्हाद्या, केव्हां चलताहेस मग चिपळुणीं? मला हांकार रे. चलतों मी."

"बस कीं. पोहे खाऊन जा घासभर."

"नकोत पोहे आतां. त्र्यंब्या गेलाय् पाण्याकडे. जाऊन सैंपाक करायला हवा."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं येसदाच्या सुना आल्या. त्यांनीं भात काढलीं, तें सपेलीं नि पातेल्यांत भिजूं घालायला लागल्या. हे म्हणाले,

"ऐकलंस का, कसलं कसलं भात दिलांएस भिजवायला?"

"आतेसासूबाईनीं बारकाचं सांगितलांय् चार मण—"

"अगो, सगळं कशाला बारकाचं? मणभर दे बारकाचं. नि तीन मण भडसाचं. गड्याबिड्यांना चालेल भडसाचं. घरांत खायला बारकाचं. पण एवढं चार मण तरी कशाला घालत्यैयु आते कोण जाणे."

"कशाला म्हंजे? सगळी पंचक्रोश येणार लग्नाला. मूठ मूठ पोहे नि गुळाचा खडा नको द्यायला?"

"करा काय तें. आते त्यांतलीच नि तूं त्यांतलीच. मी जातांय् चिपळुणास."

"येणार केव्हां?"

"काम झालं कीं यीन. येवढा बाजार कराचा!"

दुसरे दिवशीं दुपारीं बाया जमल्या गवले वळायला. बनीची आई, शारदा, दत्तूअण्णाची बायको, आई, दामूकाकी, कुशात्त्या, जोशीण, ठोसरीण, अगदीं व्यंकूभावजींची बायकोसुद्धां आली. बरोबर त्यांचीं पोरंसुद्धां. सगळ्या जणी अंगणांतच बसल्या.

"सगळं भिजवणी आणूं का?" मी विचारलं.

"होईल का एवढं सगळं आजच?"

"होईल त काय झालं? एवढ्या जणी आहेत—"

"बरं आण."

भराभर बायांचे हात चालायला लागले. नि तोंडहि.

"आते, नुसत्या मालत्याच का कराच्च्या?"

"नाहीं हो! पांची परी कराच्च्या. गवले, मालत्या, शेवया, नखुल्या, फणुल्या—"

"शेवयांचं पीठ मळायचं ना?"

"होऽओ! दूध आण गो दुर्गे इवलं वहिनीकडून. नि हें बघ, हिकडे ये. कान कर हिकडे—"

"काय सांगतांय् एवढं कानांत आते?"

"कांहीं नाई हो!"

"दुर्गीला वरीस कितवं हो जिऊवहिनी?"

"तिला ना? आतां आषाढांत एकादशीला बारावं लागेल. अशीं आम्ही सगळीं भजनाला बसलों होतों नि ती झाली."

"भाग्यवान् आहे हो बाई !"

"होऽओ! तेवढे वडील असते—"

"त काय—"

"नसतं भाग्यांत एकेकाच्या."

"काय तरी बाई, अचानक गेले हो!"

"मी अशी भाताचं तपेलं चुलीवर चढवीत होत्यें, तेवढ्यांत कळलं—"

"तो असता, त त्यानं सगळं नीट केलं असतं हो!"

"तुम्ही तरी काय कमी करतांय् जिऊवन्सं !"

"पण दिसत नाहीं, नाई दुर्गी बारा वर्सांची?"

"एकेकाचं हाडपेर जाड असतं, एकेकाचं बारीक."

"फोजदाराची—! तो पाप्याचं पितर नि ही ढोलीमावशी—"

"तिचंच कशाला? अगदीं आमच्या सासूबाईच्या भाचेसुनेचं घ्या. लगीन झालं तेव्हां होती दहा वर्सांची. पण दिसायची अशी पंचविशीची—"

"हें तुमचं कांहीं तरीच आहे हो!"

"ई!"

"एवढं तोंड वेंगाडायला नकोय् कांहीं! पंचविशीची नसली तरी विशीची दिसायचीच हो!"

"काय सांगतांय बाई! मींहि पाह्यलीय् तिला."

"अशी पंधरावीस वर्सांची नव्हती दिसत?"

"वीस वर्सांची कांहीं नव्हे. बारा वर्सांची दिसायची."

"नाहीं तरी बाईना पिसाचा कावळा कराची सवेच आहे."

"रांडेच्च्यांनों! नि तुला गो?"

"भांडतांय कशाला द्वारक्ये? ओव्या तरी म्हणा."

"होऽओऽ गप्प बसा रे कार्ट्यांनो! मेल्यांनीं उच्छाद आणलाय् जसा!"

"आईऽ ही बघ किशी!"

"बघितल्यै! काय करत्ये?"

"मला पाठीवर बसूं देत नाई!"

"बाळांनो, तुम्ही मागल्या अंगणांत खेळा जा बरं. दुर्गे, यांना खाऊ देगो—"

"हां द्वारकावहिनी, करा सुरुवात."

"मी कशाला—"

"अहो म्हणा कीं. नाहीं तर मारे बसतां दळण घालून्!"

"बरं बाई! म्हणत्यें."

हात भराभर काम करीत होते. तोंडानं ओव्या सुरू झाल्या. सुरवात केली द्वारकीकाकूंनीं, नि मग जें चक्र सुरू झालं, तें मी पोहे आणीस्तोवेरीं चाललं होतं.

**आधीं मूळ धाडा। चिपळूण गांव।**
**पर्शराम देव। आमंत्रण।**
**आधीं मूळ धाडा। दुरीचिये दुरी।**
**बाई जोगेश्वरी। कुळींचिये॥**

**आधीं मूळ धाडा। कोंकणची राखणी।**
**देवी दुर्गाराणी। मुरुडासी॥**
**आधीं मूळ धाडा। भाळीं कुंकवाची चिरी।**
**दाभोळबंदरीं। अंबाबाई॥**

"मूळ कशाला धाडायला हवं अंबाबाईला?"

"हो ओ! येऊन बसल्यैच घरांत."

"आहेच मुळीं माझी सून अंबाबाई!"

"आहे हो जिऊवैनी!"

**आधीं मूळ धाडा। घुंगराची गाडी।**
**शालजोडीचा वराडी। गणराज॥**

"गणपतीहि आहेच कीं घरांत."

"हें बरं बाई! आपलीं देवादिकांचीं नांवं ठेवणं."

"बरंहि नि वाईटहि."

"तुमचं आपलं कांहीं तरीच हो! वाईट कसं?"

"आतां बघा हं! गणपतीला खरूज झाल्यै—"

"ई!"

"पर्शराम परसाकडे गेलाय—"

"पुरे झालं हो बाई! तुम्ही म्हणा हो दामूवैनी!"

**खांद्यावरी ग कुऱ्हाडी। कुठं जातां हो वऱ्हाडी।**
**मांडवाला मेढी। चंदनाच्या॥**

"अहो, जिचं लगीन आहे तिचं म्हणा कीं कांहीं !"

"हो ऽ ओ ! दुर्गे, ये बाई हिकडे."

"यील ती. तुम्ही करा सुरू."

**भिंती सारवोनी । वर काढील्या जिवत्या ।**
**तुझ्या लग्नाच्या मालत्या । दुर्गाबाई ॥**
**भिंती सारवोनी । वरी काढियेलीं फुलें ।**
**तुझ्या लग्नाचे गव्हले । दुर्गाबाई ॥**
**भिंती सारवोनी । वरी काढिलें ताम्हन ।**
**तुझ्या लग्नाचें सामान । दुर्गाबाई ॥**

पोहेखाणीं झाल्यावरहि संध्याकाळवेरीं गव्हल्यांचा घाणा चालला होता. दुसऱ्या दिवशीं हे नि गुजाभावजी परतले. गड्यांनीं सामानाचीं ओझीं आणून टाकलीं. गुजाभावजी पांच मिंटं टेकले, नि म्हणाले,

"येतों रे म्हादेवा !"

आतेसासूबाई म्हणाल्या,

"गुजा, जाताहेस कुठं? हितंच खा दोन घास."

"अगो आते, आंघोळ व्हायच्यैय अजून."

"जा पटकन् पऱ्ह्यावर पंचे घेऊन, नि आंघोळी उरकून या. तूं नि म्हादेव."

"अगो, पण—"

"पण राह्यला महाभारतांत. तूं जा पाहूं आंघोळीला. गणू याला पंचा देस."

आंघोळी उरकून आले, नि दोघे जेवायला बसले. गुजाभावजी म्हणाले,

"आते, म्हादेवाला काऽऽई कळत नाहीं."

"कां रे?"

"अगो, लुच्चा तो रांडेचा दुकानदार ! नासके बटाटे याच्या गळयांत बांधीत होता."

"गुजा, मी हिशेब नव्हतों का करीत?"

"कर्माचा हिशेब करीत होतास ! शेट शेट म्हणून तुला चढवलिनीं, तूं चढून बसलास गप्फा हांकीत. सामान तोलतोय् माणूस तिकडे लक्ष कुणीं ठेवाच्चं?"

"बरं हो गुजा ! तूं होतास ना? असेच सगळे मिळून एकदांचं कार्य होऊं

च्या म्हंजे घोडे न्हाले."

दुपारीं व्यंकूभावजीसुद्धां आले. झोपाळयावर बसत ते म्हणाले,

"म्हादेवा, कुठवर आलं लग्न?"

आतेसासूबाई दारांतून म्हणाल्या,

"व्यंकू, येईल त्याच्या पावलांनीं. तूं दुर्लक्ष केलंस, म्हणून कांहीं लग्न रहात नाहीं."

"छा छा! दुर्लक्ष कसं करीन आते? अगो, मी मोठा, म्हादेव धाकटा. तूं मला सांगाच्चंस, नि मीं कराच्चं."

"मग एवढे दिवस कुठं दिसला नाहींस तो रे?"

"मला कळ्ळं नाहीं आते!"

"होक्का! तुझी बायको आल्ती काल गव्हले कराला—"

"अगो, तिनं रांडचीनं सांगितलींन आज!"

"काय सांगताएस व्यंकू तूं? अरे, सगळ्या गांवभर झालं, नि तुला आत्तां कळलं होय?"

"अगो आते—"

"कां खोटं बोलताहेस व्यंकू? कोणी बंदरावर फुसकन् पादलं, त तें तुला कळतं! नि—"

"बरं आते ऽ! चुकलं माझं ऽ! आतां सांग काय तें!"

"सांगाच्चं काय? घरीं यायचं नि दिसेल तें कराच्चं."

"बरं. म्हादेवा, सांग बाबा कांहीं काम."

"आज कांहीं नाई. उद्यां मात्र परसूकाका येणारेत. ते, तूं नि मी मिळून परगांवीं निमंत्रणं धाडायची यादी करूं."

"येतों उद्यां. दुपारीं ना?"

"हो. दुपारीं."

दुसऱ्या दिवशीं परसूकाका नी गुजाभावजी आले. व्यंकूभावजींनीं कांहीं तोंड दाखवलीं नाहीं!

अंबूनाना, परसूकाका, जोशी, दत्तूअण्णा, यादोनाना, भिकूनाना, फोजदार, सगळे येऊन हवं नको पाहून जायचे. येसदा त जसा आंदणच आला होता आमच्या घरीं.

"आत्याबाय! फाव्यांचे भारे खंय टाकूं?"

"मागं टाक सर्पणाच्या मांडवाशेजारीं."

परसूकाका घाम पुशीत यायचे.

"म्हादेवा, केळीचीं पानं दे. द्रोण लावायला बसतों."

"एकटे कशाला?"

"एकटा कशांनीं? दामूअण्णा येताय्. हांकारलाय त्याला."

गुजाभावजी साळ्याला घेऊन आले. त्याला म्हणाले,

"ए साळीदादा, जर का खण विटका निघाला तर—हां!"

"विटका निघाला, तर परत आणा माझ्याकडे!"

"तुला शोधीत कुठं बसायचं? तें काय नाय—"

"सगळे जरीकांठी काढूं ना?"

"इथं का बाच्छाचं लगीन आहे काय! चार साधे दे, चार बऱ्यापैकीं—पण ए वहिनी, ये बघूं हिकडे! हीं तुमचीं कामं. आतां मी का बसूं लुगडं नेसून खण-लुगडीं घ्यायला? आते!"

तेवढयांत अंबूनाना येत.

"अरे म्हादेवा, रांडेचं दाभोळेस विठ्ठलशेटला निमंत्रण द्यायचं राह्यलं! मी तरी कसा तो पहा—अज्जीच विसरलों!"

दुर्गावन्संना घरोघर केळवणाचं बोलावणं. एकहि घर कांहीं सुटलं नाहीं. एक्या दिवशीं काल्याची बायको डोसकीवर पाटी घेऊन आली. मी रांगोळीच्या रेघा ओढीत होत्यें.

"सजण्ये, काय गो हें?"

"मामंजींनीं धारलांय्."

"पण काय तें नाहीं सांगितलीस?"

"केलवनाचां सामान. आज मामंजींनीं सांगलांय्, आमचां केलवन दुर्गातायला."

तेवढयांत येसदा आला.

"सूनबाय, बरी हायस ना?"

"हो! हें काय—"

"सुकानी नांदा. दुर्गाताय खंय हाय? आज आमचा गरीबाचां केलवान! नाय म्हनून चालायचां नाय! सूनबाय, तांदूल, दाल, गूल, वाइच तूप, भाजी, सगलां सामान हाय. सैंपाक करा. दुर्गातायला रांगोली घालून पाटावर बसवा

नि पोटभर ज्येऊं द्या!"

आतेसासूबाई दारांत आल्या. त्यांनीं ऐकलं. त्या म्हणाल्या,

"येसदा, बरं हो! पण मग आज तूं जेवायला ये!"

"माजां काय? कवांबी यीन!"

"कवांबी कसं? तुझं केळवण नि तूं नकोस जेवायला? सजण्ये, तूं नि तुझ्या जावा सगळ्या जणी आज हितंच्च जेवायच्यात हो!"

"आत्याबाय, तुज्या म्होरं का जातां येतांय?"

तीथ जवळ येत चालली. पाव्हणीं जमायला लागलीं घरीं. घर भरलेलं दिसायला लागलं. आक्कीला दिवसभर सैंपाक पुरायचा. दुपारीं चूल विझवून सारवत्ये न सारवत्ये तों संध्याकाळचं पेटवण घालायचं. दिवसभर कुंड धडकतंय्.

मुहूर्तमेढ रोवली, तेव्हां सगळीं कुळं मांडव घालायला धांवलीं. हां हां म्हणतां मांडव तयार झाला. त्यांना वाटण्याकरतां किती नारळ फुटला असेल तें देव जाणे. फटा फटा फटा, चाललंय् दिवसभर.

उद्यां व्याही मंडळी बिवलीहून दाभोळेस यायची, नि तिथून मचव्यांतून पडघवलीला यायची.

आज संध्याकाळीं आपलं वळवाचं आभाळ भरून आलं! नि एक पावसाचा शिडकावा असा पडला कीं सगळं भिजून गेलं!

गुजाभावजी सकाळीं आले, नि झोंपाळ्यावर टेकत म्हणाले,

"म्हादेव गेला का दाभोळला? वहिनी, ए वहिनी—"

"हो. गेले."

"नि पाऊस काय करणाराय्? झोडणार का काय व्याह्यांना?"

"देव जाणे बाबा! गुजा, फार झाकोळलंय् का रे?"

"तर! भिजूं देत व्याही! हज्जार रुपै घेणारैत—कळूं दे सुख!"

"नको रे बाबा!"

तेवढ्यांत पाऊस पुनः एक सटकारा शिंपून गेला. आतेसासूबाई बाहेर आल्या, नि मांडवाकडे डोकावून म्हणाल्या,

"रामा रामा! मांडवहि ओला झालाय् रे!"

तों ज्या टपाटपा गारा कोसळायला लागल्या! एकेक गार ही एवढी! बाहेरचीं सगळीं माणसं घाबरून आंत पळालीं. सासूबाई म्हणाल्या,

"वन्सं, आतां कसं हो?"

"मचवे उघडे आहेत. व्याही म्हणणार, पहिल्याच दिवशीं पावसानं झोडलंय्! रामा, तुलाच दया रे बाबा! पोर नांदायच्चैय् जन्मभर."

तेवढ्यांत आक्की सोवळं नेसली होती, तशीच आतेसासूबाईंच्या मागं येऊन हळूच म्हणाली,

"आते—"

"काय गो?"

"नव्हे—मी म्हणत्यें, गिऱ्होबाला—"

"अग हो! व्हयनी, गिऱ्होबाचा नैवेद्य काढला होता का?"

"नाहीं."

घाईघाईनं आतेसासूबाई आंत आल्या. मूठभर पोहे नि गुळाचा खडा घेऊन त्यांनीं अंगणांत ठेवला, नि हात जोडून म्हणाल्या,

"गिऱ्होबा, चुकल्यें रे बाबा! तूं गांवचा राखणकर्ता! तुला उपाशीं ठेवून लग्न मांडलं. आम्ही तुझीं लेकरं—क्षमा कर बाबा! पोर आमची नाहीं—तुझी आहे! तिला नांदूं देणं न देणं तुझ्या आधीन!"

आतेसासूबाई डोळे पुशीत आंत आल्या, नि पांच मिनिटांत आकाश निवळलं!

व्याही मंडळींचं सामान घेऊन गडी आले, त्यांना विचारलीं आतेसासूबाईंनीं,

"येश्या, मंडळी भिजली का रे?"

"नाय बा!"

"भिजतील कशानी? वलव असा हिकरं बरसून ग्येला! तकरं काय नाय!"

आतेसासूबाईंनीं गिऱ्होबाला पुन्हा एकदां हात जोडले.

व्याही मंडळीं मारुतीच्या देवळांत उतरली. आतेसासूबाईंनीं गुजाभावजी नि अंबूनानांना बोलावलीं, नि म्हणाल्या,

"हें पहा अंबूनाना, तुम्ही दोघं व्याह्यांचं लागलंसवरलं पहाल ना? गुजा आपला तरणाताठा मारुतिराया, म्हणून त्याला मदतीला घ्या तुम्ही."

"पाहीन त काय! काय रे गुजा? लागायचांय् काय कर्म? सगळी वेवस्था करून ठेवल्यै. एकदां दाखवून दिलं सगळं कीं कांहीं नाहीं हो लागायचं पहायला. त्रिवलीकर मंडळी चांगली समजाची आहे."

"गुजा, करशील ना अंबूनानांना मदत?"

"हें पहा, आते. मी कांहीं तीनतीनदां व्याह्यांपुढं नाक घासून जेवायला चला हो, नि हगायला चला हो, नि मुतायला चला हो करायचा नाय्! मला तूं

तिकडं काय वाटेल तें सांग. पण—"

"असं रे काय करताएस गुजा? अरे, आपली पोर नांदायची जल्मभर त्यांच्या हितं. मुलीकरतां तरी जरा नरमाईनं नको घ्यायला? तूं कुणासाटीं अडून बसायचा नाहींस, म्हणून तुला तिकडे बघ म्हणत्यें!"

"म्हादेवाला कां सांगत नाईस हें काम?"

"नि मग घरांतलं रे कोण करायचा?"

"गुजा, नुसतं जाडंजुडं शरीर घेऊन जल्मलाहेस! देवक कोण ठेवील?"

"मला तरी काय म्हाईत अंबूनाना?"

"तर! देवक, अहेर, अक्षत, तेलफळ, सीमान्तपूजन, मग मुलगा वाजवत आणायचा, मधुपर्क, मुहूर्तावर लग्न, लाजाहोम, सप्तपदी, ऐरणीदान, वरात—सोळा सोपस्कार व्हायचे असतात बाबा! अरे, लग्न म्हंजे का तोंडाच्या का गोष्टी आहेत? तूं लगीन करायचं नाहीं म्हणतोस—"

"आते!"

"बरं बाबा! ही चुप राह्यलें!"

"कां गो जिऊ, लग्नाचं नांव निघतांच वासरासारखा उंडारलासा गुजा?"

"त्यानं सांगून ठेवलं आहेन्. त्याच्या लग्नाचं नांव म्हणून काढायचं नाहीं. तर गुजा, म्हादेव पाह्यजे घरांत. मग करशील ना अंबूनानांना मदत?"

"करीन बापडा! दगडाखालीं सांपडलाय खरा हात!"

नि मग दणा-दणा-दणा लग्न गाजायला लागलं. सगळा गांव धावायला होता. उणं कांहीं कोणीं पडूं दिलं नाहीं. आतेसासूबाई नि सासूबाई डोळयांतून पाणी काढायला लागल्या. तशीं अंबूनाना म्हणाले,

"जिऊ, आतां डोळयांतून पाणी गाळायचं नाहीं!"

"पण ज्याचा तो असता अंबूनाना—"

"अगो हो! असता तो, तर काय कोणाला हौस का होती पुढं येऊन हें सगळं करायची? ज्याचा तोच करता. पण देवाच्या मनांत नव्हतं, त्याला तूं काय करणार नि मी काय करणार?"

"पण रहावत नाहीं! कित्ती म्हणाल्यें तरी डोळे ऐकताहेत का? त्यांचं काम ते करतातच."

"ऐकवायला लावायचं त्यांना. आलं का लक्षांत? सगळं नीट होतंय् ना? उणं कांहीं पडतंय् का?"

"उणं कसं पडेल? एवढे तुम्ही होतांत—"

कांहीं तरी काम निघालं नि आतेसासूबाई उठल्या.

त्या कार्यांत दोन गोष्टी मात्र लक्षांत राह्यल्या. माणसाचं मोठेपण कांहीं त्याच्या जल्मावर अवलंबून नाहीं हो! अगदीं साध्या कुळींचा माणूस कधीं कधीं असं कांहीं करून जातो; नि नावाजला गुरव, देवळांत हगायलासुद्धां कमी करीत नाहीं.

पहिली गोष्ट आमच्या येसदाची. अगदीं साधा कुळवाडी. काय म्हणतात ना, त्यांतला. लिहिणं नाहीं, वाचणं नाहीं. दोनदोन चारचार दिवसांनीं अंगाला पाणी लागायचं. टोपी तर बिचाऱ्यानं कधीं लहानपणीं घेतली होती म्हणे. अगदीं शेणकाला झाला होता तिचा. तीच जल्मभर घातलीन्. मळक्या लंगोटीपलीकडे कापड कसलं तें कांहीं त्याच्या कमरेला लागलं नाहीं.

पण त्यानं सगळ्यांना अगदीं चकित करून टाकलंन्!

आधल्या दिवशीं सीमानपूजन झालं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं अहेराची धामधूम सुरू झाली. बहुधा सगळ्यांनीं अहेर आणले. ज्यानं त्यानं आपापल्या कुवतीप्रमाणं. येसदाहि काखोटीस गठुळी गुंडाळून हिकडे तिकडे मिरवीत होता. आम्हांला वाटलं, असेल कांहीं तरी.

पण सगळ्यांचे अहेर उरकले नि मग गुजाभावजी म्हणाले,

"येसदा, आणलांएस तरी काय? चल ना आतां."

"येतांय्!"

व्यंकूभावजी शेजारीं बसले होते. त्यांनीं एक विटकं उपरणं नि जुनाटसा खण आणला होता अहेर म्हणून. ते खोंचून म्हणाले,

"येश्या, मघांपासून गठुळी घेऊन मिरवताहेस! बघूं दे तरी एकदां काय आणलांएस तें!"

येसदा निघाला होता आमच्याकडे—तो उभा राहिला, अन् म्हणाला,

"यंकूदादा, आमी गरीब मानसां! असलां उपरनां नि असला खन खंइसून मिलल आमाला? तो तुमच्यासारक्या तालेवारालाच मिलायचा! म्हादूनाना, तो यंकूदादाचा उपरनां नि खन बाजूला उचला—आमच्या कुलवाड्याच्या अहेराचा इटाल होईल त्याला!"

अंबूनाना म्हणाले,

"पुरे रे व्यंकू! तुला किनई भारी वाईट संवय आहे. चल ये तूं येसदा."

"खरां हाय यंकूदादाचां! पैक्याचा जोर हाय—" असं म्हणत येसदा आमच्याजवळ आला. त्यानं मला नि दुर्गावन्संना कुंकू लावलंन्. आम्ही त्याला नमस्कार केला.

"सुकानी नांदा दुर्गाताय!"

अगोदर गटुळ्यांतून दोन नारळ काढलेन् त्यानं. एक दिला यांच्या हातीं नि दुसरा मला दिला. मग दुर्गावन्संच्या हनुवटीला हात लावून मुका घेत म्हणतो कसा,

"दुर्गाताय, ही गरिबाघरची चिंदुटी हाय! पर हाय पिरमाची हो!"

त्यानं गटुळ्याची आंतली गांठ सोडलीन् नि आपलं सुरेख गर्भरेशमी लुगडं काढून दुर्गावन्संच्या अंगावर पांघुरलंन्!

सगळीं टकाटका बघायला लागलीं! व्यंकूभावजींचं तोंड झालं खेटर मारल्यासारखं!

आतेसासूबाई डोळे पुशीत म्हणाल्या,

"येसदा, अरे, कशाला केलंस एवढं—"

"जिऊआते! कुनी बोलूं नका! दुर्गाताय माजी येकलीच पोर!"

"अरे, पण सुना—"

"त्यांचे घो हाएत समरत! असल अंगांत इशीम, त आनतील त्यांना पैठन्या!"

"तरी पण भारीच केलंस हो!"

"भारीच कसां जिऊआते? लगीन ठरिवलां मिनी! बिवलीकर मना म्हंतील काय! त्यांच्या मांडीला मांडी देऊन बसायचां, तर आपली मान ईतभर वर राह्या होवी! काय अंबूनाना, कसां हाय माझां म्हन्नां?"

"खरं आहे रे बाबा! पिळाचा म्हातारा तूं! तुझी मान वरच राह्यची!"

"जिऊआते, हां लुगरां न्येसून दुर्गातायला लग्नाला हुबी करा!"

"करीन हो करीन, येसदा! एवढं तूं कौतुकानी केलंस, त्याचं मोल त्याच वेळीं करायचं! तुझं लुगडं नेसूनच राहील दुर्गी लग्नाला उभी!"

हें झालं येसदाचं. नि आतां सांगायला हवं वाणल्या गुरवाचं.

मधुपर्क झाला. सगळा मांडव गच्च भरला होता. बायका, मुलं, पाव्हणीं, रावणीं—ही गर्दी. मुहूर्ताची घटका भरायला आली. भटजी म्हणाले,

"चला मंडळी, नवरदेवाला आणा."

पण नवरदेव कांहीं उठेना! पुनः भटजींनीं हांक मारली. तरी वरपक्ष आपला घुम्यासारखा बसलेला! अंबूनाना धावत पुढं आले. व्याह्यांजवळ जाऊन ते म्हणाले,

"अहो, घटका भरायला आली!"

मला वाटतं, तो कुणी तरी मुलाचा लांबलांबचा चुलता होता. असं चाचरत चाचरत बोलायचा. तो म्हणाला,

"ठरवायला आलते, ते कुठायत?"

"मी—मीच आलतों ठरवायला!"

"एकटेच?"

"नाहीं. आम्ही तिघे होतों!"

"कोण कोण ते समोर या."

परसूकाका, येसदा, असे दोघे धावले. येसदा हातापायां पडत म्हणायला लागला,

"असां नका करूं बिवलीकरांनो! लगीन होऊं द्या! मंग काय म्हनाल त्ये—"

"तें आम्हांला कांहीं माहीत नाहीं. हुंडा किती बोलले होतेत?"

"हजार—"

"तर मग हजाराचा तोडा आणून मोजा अगोदर! पारखून रुपै पदरांत घेऊं, नि मग मुलाला उभा करूं! काय समजलेत?"

गुजाभावजींनीं हें ऐकलीं, नि जें कांहीं तारांगण घातलंय् म्हणून सांगूं! सोडगं घेऊन उठले, नि म्हणाले,

"पाहतों कसा मुलगा उभा रहात नाहीं लग्नाला तो! रांडेच्च्यांनो, सगळ्यांना अंगावर हळद नि कातबोळ घालायला लावीन!"

शेवटीं आतेसासूबाईनीं त्यांना कव घालून घरांत नेलं, नि खोलींत बशिवलं! बाहेरून कडी!

रुपै मोजून घेतले व्याह्यांनीं, तेव्हां मुलगा लग्नाला उभा राह्यला. लगीन लागलं, नि मग मंडळी पानसुपारीला बसली, तेव्हां झांकली मूठ उघडली! मुलाचा काका म्हणाला,

"अहो, आम्ही कांहीं कद्रू नाहीं! पण तुमच्याच गांवांत आहेत ना बिभीषण?"

"कोण ?"

"तें नका सांगायला लावूं! आम्हांला कळलं, कीं मुलीला नाहीं बाप. तेव्हां तुम्ही हो म्हणलेत खरे—पण द्याल हा काय भरंवसा नाय. म्हणून आम्हीं आपले अगोदर दाम पदरांत पाडून घेतले."

"पण नांव सांगायला काय बिघडतंय तुमचं?"

"तें पाप कशाला करायला लावतां?"

"पाप कसलं आलंय् त्यांत? आमच्यांतला नासका आंबा ओळखायला नको?"

"पहा कोण असेल तो तुमचा तुम्ही सोधून!"

पानसुपारीला आपले व्यंकूभावजी कुठं दिसेनात! चौकशी केली त कळलं कीं मघां वादंग झालं, तेव्हांच परसाकडचं निमित्य सांगून ते दिसेनासे झाले!

पटकन् त्यांचा संशय आला. नि मग मुलाचा तो तोतरा चुलता त्यांची चौकशी करायला लागला, तेव्हां तर अगदीं पक्काच झाला.

शेवटीं मंडळीं जेव्हां बिवलीला निघाली, तेव्हां त्यानं चक्क नांवच सांगितलंन्!

गुजाभावजींना हें कळलं, तेव्हां ते दांत खात निघाले व्यंकूभावजींची तंगडी तोडायला! आतेसासूबाईंनीं अगदीं आपली शप्पत घालून त्यांच्यापुढं पदर पसरला, तेव्हां कुठं ते थोपले. पण राग कांहीं निवाऴा नाहीं. ओंठ चावीत म्हणाले,

"व्यंक्याला म्हणावं, आतां तूं आहेस नि मी आहें!"

कधीं कधीं माणसाच्या तोंडांत उभं राहून प्रालब्धच्च बोलतं म्हणे. प्रालब्ध कांहीं कुणीं पाह्यलं नाहीं कसं असतं तें. पण या पाळीला मात्र गुजाभावजींच्या तोंडांतून अगदीं भविष्यवाणी निघाली. पुढं पडघवलींत जें काय घडलं, त्याचं चित्रच काढलं म्हणानात गुजाभावजींनीं!



# ३

---

एवढा वेळ सगळं बरं काय घडलं तें सांगत गेल्यें. कांहीं सांगोवांगीचं, कांहीं मीं पाह्यलेलं. गांवांत एवढा वेळपावेतों वाईट कांहीं घडलंच नाहीं असं नव्हे. घडलंहि असेल. पण चांगलीं माणसंहि होतीं गांवांत. त्यांनीं हें वाईट वर उमळूं दिलं नाहीं. सगळं झाकीत गेलीं.

पण हें सगळं रहाटगाडग्यासारखं असतं. एकदां खालीं, एकदां वर. भरला लोटा आपला वर येऊन रिता व्हायचा, नि मग पालथा होऊन खालीं जायचा.

एवढे दिवस पडघवली सुखानं नांदली. आतां तिला अवदसा आठवली. यादवांना आठवली होती तशी. एवढं छप्पन कोटी यादवकुळ. कृष्णासारखा राजा. पण झालंच ना वाटोळं? मग पडघवली कुण्या परसांतली भाजी?

पडघवलीचं तसंच झालं. नि सुरवात कशावरून झाली? जेवणावरून हो!

पण थोडं अगोदरचं सांगायला हवं.

आबा माझा असा सहा महिन्यांचा होता, तेव्हांची गोष्ट. अलीकडे व्यंकूभावजींकडे सुपारी व्हायचीहि बरीच. नाहीं तरी दीड खंडीपर्यंत माप जायचं. अन् त्यांत त्यांनीं एक नवीन उद्योग सुरू केलता. सगळ्यांच्या बागांतलं पीक उभं असतांनाच विकत घ्यायचे. सुपारी पाडायची, वाळवायची बागऱ्यानंच. पण लोण्याचें धनी व्यंकूभावजी.

नि मग दाभोळेस हरजीभाई होता, त्याला एकदम सुपारी विकायचे व्यंकूभावजी. त्यामुळं सगळ्यांच्या वर त्यांचा दाब. अगदीं आमची बागसुद्धां ते घ्यायचे. बाग नाहीं मिळायची एका गुजाभावजींची. परसूकाका होते तोंवेरीच त्र्यंबक नि गुजाभावजी वेगळे झाले होते. त्र्यंबक बायकोला घेऊन पलीकडे, नि गुजाभावजी परसूकाकांना घेऊन अलीकडे.

परसूकाका होते, तोंवेरी गुजाभावजी नीट धड सैंपाक करून जेवत तरी. परसूकाकांच्या मागं काय, आनंदच! घरासमोरच त्यांनीं बांधला कुस्तीचा हौदा.

सकाळ-संध्याकाळ कुळवाडयांच्या पोरांना घेऊन लोळताहेत तांबडया मातींत !

म्हैस होती, तिचं दूध निघे. गुजाभावजींचं सगळंच अघोचर. दोनदोन चारचार शेर दूध निघायचं, तें तोंडाला चरवी लावून घटाघटा पिऊन जायचे. घरीं खुंटीला झोळणा अडकवलेला. त्यांत खारका, खोबरं, बदाम. मूठभर त्यांतलं तोंडांत टाकायचं नि वर गळागळा दूध घटाळायचं. मग कशाला लागतंय् जेवायला !

सकाळ-संध्याकाळ आपले पांच-पांचशें जोर नि हजार हजार बैठका ! घरीं तर नुसताच लंगोट लावून असायचे. बाहेर निघालेच तर मग ढुंगणाला धोतर गुंडाळायचं ! त्यांत आणखी कुठून मसणांतून भांग पिणं शिकून आले ! म्हणे, व्यायामाची कडकी भांगेनं मरत्ये. मरा रांडेच्यांनो ! काय हवं तें करा !

येऊं नये राग, पण येतो. गुजाभावजी जर असे जगावेगळे न वागतां धडपणीं सगळं करते, तर कांहीं गांवाला ही कळा आली नसती. पण म्हणतात ना? त्यांतलं. सगळ्यांनाच जर दुर्बुद्धि आठवली, तर गुजाभावजींनींच काय पत्कर घेतला जगासारखं वागण्याचा ?

जाऊं द्या झालं. त काय सांगत होत्यें—हो ! ते तेवढे कांहीं व्यंकूभावजींना बाग द्यायचे नाहींत. एकदां ह्यांनीं विचारलीं,

"गुजा, सगळ्या गांवाची एक परी, नि तुझी तिसरीच परी !"

"तीच वाटत्ये मला बरी ! काय झालंय् काय ?"

"व्हायचांय् काय ? बाग का देत नाहींस व्यंकूला ?"

"तुला त्यानं दलाल नेमलंय् वाटतं ?"

"दलाल नव्हे रे ! पण एका मुठीनं सगळी सुपारी जात्येय्—"

"मी देणार नाय् त्याला."

"कां ?"

"कां ? म्हाद्या, तूं विचारताहेस हें ? शुद्धीवर आहेस ना ?"

"मी कांहीं भांग का मातीमसणं म्हणतात तें नाहीं प्यायलेला !"

"मलाच का पुनः खोचून बोलताहेस ? काय कुणाच्या घरची पितों होय ?"

"नव्हे रे ! रागावूं नकोस. मीं विचारलं काय नि तूं वादताहेस काय !"

"मी व्यंक्याला बाग द्यायचा नाहीं."

"नको देऊं ऽस !"

"अरे, सगळ्या गांवाचा उतारा तो व्यंक्या ! मी तर म्हणतों, तूंहि देऊं नकोस त्याला. दुर्गीच्या लग्नांत—आठवतंय् का ?"

"हो ऽ हो! पण त्याचं असं आहे, गुजा, एकानं शेण खाल्लंन् म्हणून आपणहि का तेंच करीत बसायचं?"

"नाहीं. त्याच्यापुढं चांगल्या ताज्या शेणाची पाटी सारायची. खा म्हणावं किती खाताहेस तें."

"तुझं आपलं कांहीं तरीच हो गुजा!"

"कांहीं तरीच? परवां धर्मीची भानगड ऐकलीस ना? हग्या मार खाता व्यंक्या! काय समजलास? धर्मीचा नवरा शेपूट घालून बसला, म्हणून!"

"बरं बरं! आपल्या माणसाचं झाकायचं का उघडं करायचं?"

"नुसतं उघडं नाहीं करायचं, वर चांगला घाशीरामी मार द्यायचा! रांडेच्यांनो! हें कुठवर वाढत जाईल माहीत आहे का?"

"कांहीं वाढत नाहीं. मला थोडा वचकून असतो व्यंकू."

"गाजरं खाताहेस म्हाद्या! अमरपट्टा का घेऊन आलाहेस? तुझ्या मागं रे? नि व्यंक्या तुला वचकून असतो?"

"हो ना! परवां तोच म्हणाला—"

"भ्रमांत आहेस तूं म्हाद्या! लेको, तूं गांवचा खोत. तुला थोडंसं घोड्यावर चढवलं, कीं मग हवं तसं रिंगण घालायला व्यंक्या मोकळा!"

"तुला किनई गुजा, एखाद्याला खालीं पाडायची सवेच आहे."

"खालीं पाडायची? ती कां रे बाबा? वर चढून का बसेनास! अगदीं सुरमाडाच्या शेंड्यावर बस. माझं काय जातांय्?"

"बस कीं रे."

"नको. जाऊं दे. वहिनीचा ताप कसा काय आहे?"

गुजाभावजी आंत आले. मी आबाला पाजीत चौघडीवर बसल्यें होत्यें.

"किती दिवसांनीं आलांत भावजी?"

"भारी का दिवस झाले?"

"मला नाहीं माहीत."

"काम असतं ग वहिनी!"

"तांबड्या मातींत लोळायचंच ना?"

"कर, तूंहि कर च्येष्टा! पण ताप कसा आहे?"

"बरा आहे."

"सांगितलं होतं औषध तें करीत नाहींस. तुला हवा गोड काढा. जायचा

कसा ताप? चांगला काडेचिराइताचा काढा नि निकाढा घेत जा, आत्तां बरी होशील! छोकरा काय म्हणताय्?"

"काय म्हणायचा! अगदीं मामंजींचे डोळेबिळे घेऊन आलाय्."

"देस पाहूं हिकडं!"

"घ्या ना. सांभाळून हां! हें दुपटं खालीं असूं दे. हां, अस्सा."

"काय रे, एँ! ओ-ळो-ळो-ळो-ळो—कुस्ती खेळायला येशील कीं नाहीं? अरे, रडूं नको! रडूं नको! हाट रे! हुर्र्रर्र! छे, वहिनी, घे बुवा तुझा तूं! आपल्याला नाहीं जमायचं!"

"हौसच भारी! द्या हिकडं. कसली वादावादी चालली होती बाहेर?"

"कर्माची! बागेवरून चाललं होतं. म्हणे, व्यंक्याला कां देत नाहींस बाग?"

"त्याचं असं आहे भावजी, नको हा बायांचा जल्म असं होतं कधीं कधीं!"

"कां गो?"

"नाहीं त काय? आमची बाग दिली, तेव्हां मी नको म्हणाल्यें. म्हणतात कसे—बायांना कांहीं समजत नाहीं याच्यांत! आतां काय आहे हो न समजण्याजोगं त्यांत?"

"बोलूं दे! व्यंक्या शिकलाय् बंगाली विद्या. सगळा गांव वेडा केलाएन् त्यानं. पण नखं काढील बाहेर, तेव्हां कळेल."

"आतां कसलीं आणखी नखं बाहेर काढाचीं?"

"करूं दे काय वाटेल तें. भोगतील लेकाचे! आते कुठाय् गो?"

"त्या गेल्यात दत्तूअण्णांकडे."

"सांग तिला येऊन गेला म्हणून. नाहीं तर रागवाची!"

ꣽ ꣽ ꣽ

पण व्यंकूभावजींचीं नखं एवढ्या लवकर बाहेर निघतीलसा कुण्णींसुद्धां अंदाज केला नव्हता.

ज्येष्ठांत आंबे आले कीं घरोघर पानं व्हायचीं. कोंकणांत तेवढंच एक पक्वान्न अवीट गोडीचं. तर त्या पानांना म्हणायचं आंबरसाचे ब्राह्मण. आज ह्याच्याकडे, उद्यां त्याच्याकडे. कुशाच्याकडेसुद्धां पानं व्हायचीं दहावीस.

त्या सालीं गिन्होबाचा लोणचांबा खूप आला होता. झाड नुसतं लवलं होतं कैऱ्यांनीं. अगदीं भुईसपाट कैऱ्या लागल्या होत्या.

गिऱ्होबाचं झाड तें. कुणीं तें उतरायचं नाहीं. पडला पाड कुळवाडयांच्या पोरासोरांनीं उचलायचा, नि जिभल्या चाटीत खायचा. भारी मधुर होतं तें फळ.

एका दिवशीं आपला येसदाचा नातू गहिऱ्या धावत आला. धापा टाकीत म्हणे कसा,

"म्हादूनाना—"

मीं घरांतूनच विचारलं,

"काय रे गहिऱ्या? हिकडे ये असा. हे घरीं नाहींत."

गहिऱ्या आंत आला. आतेसासूबाई बसल्या होत्या पूजा करीत. त्या म्हणाल्या,

"काय रे गहिऱ्या? भारीसा धांवत आलास?"

"गिरोबाचा आंबा—इसूफ—येंकूदादा—"

"अरे, धड नीटपणीं सांग तरी!"

"गिरोबाचा आंबा—पार सगला उतरला! येक बी कैरी न्हाई!"

"रांडेच्च्या! म्हणताहेस काय?"

"मिंनी पायला अगुदर—अगुदर मिंनी पायला! बायजीला खेलवीत होतां तवां मिंनी पायला!"

"अरे, पण कुणीं उतरला?"

"इसूफनी. ओनीचा इसूफ."

"इसूफ? नि त्याला कोणीं सांगितलं?"

"येंकूदादा. ते हुबे हाएत झाराखालीं."

"कर्म ग ऽ बाई! हा व्यंकू गांवामागं साडेसाती आणणार!"

भरकन् आम्ही सगळ्या जणी गोळा झालों.

"अंबे, म्हादेव कुठं आहे ग?"

"खालीं गेलेत बागेंत."

"गण्या, हितून हांक घाल त्याला. जा पळ! मेल्यांनो! अरे, तो आंबा गिऱ्होबाचा! कुणी चोरसुद्धां हात लावीत नाहीं त्याला—नि ह्यानं उभं राहून सगळा आंबा उतरवून घेतला! अन् तोसुद्धां इसुफाकडून!"

हे आले. आतेसासूबाई म्हणाल्या,

"म्हादेवा, जा बाबा—लोणच्यांब्याशीं जा, नि पाहून ये काय काय झालंय् तें. व्यंकूला म्हणावं, तुला बोलावलंय् आतेनं."

हे नि गणूभावजी गेले, नि थोडक्या वेळानं डोसक्यावर आंब्यांची पाटी घेतलेला इसूफ, व्यंकूभावजी, येसदा, आणखी चारदहा कुळवाडी, असा कोल्हाळच्या कोल्हाळ अंगणांत येऊन ठाकला. कुळवाडी सगळे भोरड्यांसारखा कलकलाट करीत होते. कोण काय बोलत होता, तेंहि कळेना झालं. आम्ही सगळ्या ओटीवर आलों. अगदीं आक्कीसुद्धां दाराशीं येऊन उभी राह्यली.

व्यंकूभावजी आल्याबरोबर झोपाळ्यावर टेकले. एवढा कलकलाट चालला होता, पण त्यांच्या तोंडावर ढीमसुद्धां नव्हतं. जसे कांहीं एऱ्हवींच येऊन बसलेत गप्पा मारायला. धन्य त्यांची! येसदा थकला होता आतां. तरी त्याचा आवाज कांहीं कमी झाला नव्हता. तो कडकडला,

"सांग यंकूबामना—खोताच्या झोपाल्यावर बसला हायेस! खरां खरां सांग! कां झोरलास आंबा? ए इसूफ, सांग. न्हाई तर कारतांय् तुजा सालना भाएर! सांग—"

"मना न्हाई म्हाईत. येंकू खोत सकारीं माज्या घरीं इले. तवां मी नमाज पऱ्हून इला होता. म्हंतात कसे, रे इसूफ! तवां म्हनलां काय? त म्हंतात, आंबा कारायचा हाय. त मीं म्हनलां, कुलवारी कां न्हाईत कारीत? त म्हनाले, साल्या तुला काय करायचां? दोन रुपै दीन. मीं हो म्हनलां. गफूरची माला बोललां, आत्तां हंईसरून येताय्. आला नि कारला आंबा. तो काय तो तुमचां भांडान तां तुमी भांडून घ्या. येंकूखोत, रुपै आत्तां देनार का संध्याकालीं?"

व्यंकूभावजींच्या तोंडावर घामसुद्धां नाहीं! यांना म्हणाले,

"म्हादेवा, सुपारी दे रे एखादी. माझ्या चंचींतली किडकी निघाली."

आतेसासूबाई पुढं झाल्या, नि म्हणाल्या,

"व्यंकू, कां केलास बाबा हा अघोचरपणा?"

"कसला अघोचरपणा?"

"गिरोबाचा आंबा कां झोडलास?"

"बरं मग?"

"हा मेल्यांनो! बरं मगच का?"

"मग काय? चांगला खूप लवला होता, त म्हटलं उतरून टाकावा."

"अरे, पण तूं लहान का आहेस आतां? तो आंबा झोडायचा नाहीं, माहीत नाहीं का तुला? का आजच आलाएस गांवांत? कुळवाड्यांनीं खायचे त्याचे पाड."

"आजपर्यंत कुणीं झोडला नाहीं, म्हणून हितून पुढंहि का सोन्यासारखीं फळं मातींत घालायचीं?"

"मातींत का जात होतीं फळं?"

"नाहीं तर काय! चोरापोरीं—"

"सांबाळून बोल येंकूदादा! खोत असलास म्हनून ऐकून घेनार नाय! आमी सगले चोरपोर काय?"

"येंक्या, अरे तुज्या तोंडाला झालंयू तरी काय? न्हान होतास तवां हज्जारदा तुला खांद्यावर न्हेला-आनला—न् आता चोरपोर म्हनायला तुझां तोंड आंबत कसां न्हाय?"

"येसदा, उगीच आरडा कांहीं करूं नका. काय समजलेत? मीं आंबा कांहीं माझ्यासाठीं उतरला नाहीं."

"मग?"

"चार ब्राह्मणांच्या मुखीं पडावा म्हणून—"

"मेल्यांनो! या आंब्यावर तूं ब्राह्मण का घालणारेस?"

"सगळ्या नाहीं. चिक्कार उतार झालाय. निम्मा रस करणार. नि निम्मा फौजदार, मामलेदार, दापोलीस ओक वकील—"

"आयजीच्या जिवावर बायजी उदार होनार! आमच्या तोंडांतला आंबा कारून—"

"मग? एवढीं वर्षं नाहीं खाल्लात तुम्हीं?"

"अरे पण व्यंकू, गिऱ्होबाचा आंबा—तो उतरायचा नाहीं असं वाडवडील बोलले—"

"हें बघ, आते, वाडवडिलांचा पंचा लहान, म्हणून बसतांना त्यांची काष्टी फिटायची. म्हणून आम्हीहि का आतां काष्टी फेडून बसाच्चं?"

"अरे, पण गिरोबा—"

"गिरोबा नाहीं नि कांहीं नाहीं. गांव लागवडीस येऊन शेंदोनशें वर्सं झालीं. अजून का गिऱ्होबा झाड धरून बसलायू?"

माझ्याच्यानं रहावेना. मीं पुढं होऊन म्हटलं,

"भावजी, गांवांत एकूण कलम किती?"

"असेल शें-पांचशें!"

"त्या शें-पांचशें कलमांत वडिलांनीं नेम केला म्हणून सोडलं एखादं

गिऱ्होबाच्या नांवानं, त काय झालं?"

"पण मी म्हणतों, कां सोडायचं?"

"मी सांगतों कां सोडायचं तें—समजलास? चांभाराचा देव तूं! तुला पूजाहि तसलीच हवी!" गुजाभावजी लांबून हांकारले, नि दाणदाण येऊन हातांतला सोटा पेलीत नेमके व्यंकूभावजींकडे धावले.

"गुजा—"

"नाहीं आते, पुष्कळदां ऐकलं तुझं! हा साला गिऱ्होबाला नाहीं नाहीं तें बोलतो! आंबा उतरतांना म्हणाला, असला गिऱ्होबा तर धरील मला! गिऱ्होबा धरील तेव्हां धरील. अगोदर मीच धरतों रांडेच्याचं नरडं—"

"हां, गुजा, मागं हो तूं."

"नाहीं आते, सोड मला."

"मागं हो म्हणत्यें ना!"

"मागं व्हा भावजी!"

"तूं नको मध्यें पडूं वहिनी! या साऽल्याला—"

मीं दांडकं धरलं म्हणून बरं झालं, नाहीं तर व्यंकूभावजींचं डोस्कंच फुटायचं. आम्हीं दोघांनीं गुजाभावजींना मागं ओढलं. नि मग सुरू झालं व्यंकूभावजींचं तोंड—

"गुजा, कायद्यानं बोल!"

"अरे जा कायदेवाल्या!"

"तुम्ही एवढे साक्षी अहांत! हा मला मारायला धावला—"

"आमीं नाय बा पायला!"

"आमाला न्हाई म्हाईत!"

इसूफनं हें प्रकरण पाहिलंन्, तशी त्यानं रुपयांची आशा सोडलीन्, नि हळूच सटकला. व्यंकूभावजींना हें माहीत नव्हतं. ते म्हणाले,

"इसूफ!"

"हाय खुटं इसूफ? तो पलाला!"

"ठीक आहे. मी काढतों आते नि वहिनींची साक्ष—बोलूं दे त्यांना खोटं!"

"साल्या! तूं या दोघींना साक्षीच्या कठड्यांत उभं करणार?"

"उभं राह्यचं का नाहीं हें त्यांचं त्यांना माहीत!"

"बऽरं! मी करतों तुझ्यावर फिर्याद चोरीची! गांवचा आंबा, चोरून

झोडला—"

"गुजाप्पा, आमच्या साक्षी कारा. सगले हुबे ऱ्हाऊं सायबाफुरं."

हें प्रकरण कुठवर वाढणार तें कळेना झालं. आतेसासूबाई कावऱ्याबावऱ्या होऊन म्हणाल्या,

"गुजा, व्यंकू, अरे आतां कोर्टदरबार का करणार अहांत?"

"हें बघ आते, मला कांहीं हौस नाहीं. हा गुजाच माझं टाळकं फोडीत होता—"

"अरे, वहिनीच्या पायां पड! तिनं वांचवलान् तुला!"

"आते, मीं माझ्यासाठीं का तोडलेत आंबे? चार ब्राह्मणांच्या मुखीं लागतील! झालंच तर मामलेदाराचं मत्त गांवाविषयीं बरं होईल—"

"पण हा चोंबडतरेपणा तुला कुणीं सांगितला? म्हाद्या नव्हता?"

"म्हाद्या काय नि मी काय!"

"असं ना? मग ठेव हितं पाव्या म्हादेवाच्या अंगणांत. सगळा गांव जेवूं दे. काय येसदा, हाय् काय कबूल?"

"कबूल! कबूल!"

"हितं बऱ्या ठेवीन! इसूफला मीं बोलावला. तो रुपै माझ्यापासून घील. त सगळं माझ्या घरीं होऊं दे कीं! माझ्या घरीं आला गांव जेवायला त काय गांवाला बाट पडणार आहे?"

"अस्सं? तर गांवची चोरी करून तूं मोर होणार काय? म्हंजे मामलेदाराकडे डाल्या धाडल्या, का मामलेदार मुठींत! मग वाटेल तो गोंधळ घालायला मोकळा! आज धर्मी तर उद्यां कुणी कर्मी!"

"गुजा, तोंड सांभाळून बोल!"

"अरे जा! सगळ्या गांवाला माहीत आहे."

"बरं बरं! पाहून घीन! त आते, माझ्याच घरीं होऊं दे बेत. येशील ना देखरेखीला?"

"तुझ्या घरीं? कुत्रा तरी यील का तुझ्या घरीं चोरीचा आंबा खायला? तंगडी मोडीन एकेकाची!"

"मर्जी गांवाची! म्हादू, गडी धाडून देतों रे...त्याच्या हातीं पाटी धाडून देस एवढी."

"दर्यावर जाऊन तोंड धुवून ये!"

"म्हंजे? मीं उतरवलेला आंबा—"

"फौजदारी कर माझ्यावर. म्हणावं, आंबा नेऊं दिला नाहीं."

"पण गुजाभावजी, तुम्ही तरी कशाला मधें पडतांय्? गिरोबाचा आंबा. व्यंकूभावजी जाणोत नि गिरोबा जाणो!"

"वहिनी! गिऱ्होबा त पाहून घीलच व्यंक्याला. तो सामक्षा दाखवीलच. पण त्यानं केलेलं हें पाप गावाला भोगायला नको, म्हणून मी करतोंय् प्रायश्चित्त. तालमींतलीं पोरं धाडतों, नि दरेक कुळवाडयाच्या घरीं पांच पांच दहा दहा कैऱ्या वांटतों. नाहीं तरी तेच खायचे होते ना? तसे खायचे, त असे खातील!"

व्यंकूभावजी तणतणत उठले, तसा एकेक जण पांगला. आतेसासूबाई म्हणाल्या,

"काय वाटेल तें कां असेना गुजा, हें कांहीं चांगलं नाहीं घडलं!"

खरोखरीच चांगलं नाहीं घडलं. त्याच दिशीं संध्याकाळीं गिऱ्होबाची सामक्षा पटली. व्यंकूभावजींच्या बायकोला जी फीट आली, ती दोन तास कांहीं उतरली नाहीं! नि उतरली ती मुळीं लुळीखुळी झाली!



पण सहाच महिन्यांनीं एक प्रकरण घडलं, नि तेव्हांपासून आमच्या ह्यांच्यावर जी कांहीं व्यंकूभावजींची छाप बसल्ये! जशी बिब्याची फुली!

छाप तरी कशानी बसली? म्हणतात ना, धर्म करतां कर्म उभं रहातं, त्यांतली परी!

आमच्या पडघवलींत सुईण अशी भागिर्ती कोळीण. पण तिचा हात जरा जडच. आयाबाया सांगत कीं, नुसती धसमुसळी! अंगानं केवढं थोरलं धूड होतं. अन् ही एवढी थोरली बाई बाळंतिणीच्या कळा सुरू झाल्या, कीं दोन्ही हातांचा रेटा देऊन सगळा भार बाळंतिणीच्या पोटावर टाकायची. एखादी नाजुक नवती असली, तर तेवढ्या भारानं तिचा जीवच जायचा!

अन् एखादी बिचारी माउली जर का अडली, तर मग मरणच तिचं! धसाधसा हात घालून पोर ओढून काढायची. भारीच बाई आरडायला लागली तर म्हणायची,

"लई वराडलीस, तर तोंडांत दीन ठेवून!"

तोंड तर असं होतं! बाई ग्बाई! जशी निवडुंगांची फणी. बोलायची नुसती, तरी कांटे टुपायचे अंगाला. बाळंतपणाला यायची, अन् तोंडानं गोष्टी कसल्या, तर हा असा मेला, तो तसा मेला!

तेंच आमच्या आतेसासूबाईंचं पहा कसं तें!

त्यांना पहातांच मुळीं अडलीनडलीला असा धीर यायचा, कीं अर्धं बाळंतपण झालं! त्यामुळं पहिलटकरणी तर महिना महिना दोन दोन महिने आधीं घरीं येऊन सांगून जायच्या—

"आते, तुम्हीं आलं पाहिजे बरं का! सुईण बोलावल्यै दाभोळेहून. तरी पण—"

"अगो, मग मी कशाला?"

"नाहीं आते! तुम्हीं यायला हवं."

"बरं बायो. पण सगळं सुईण करायची हो! मी नुसती उभी राहीन शेजारीं."

"चालेल. तेवढंच पुरेल मला."

कुळवाड्यांच्या लेकीसुना तर आतेसासूबाईंकरतां जीवप्राण टाकायच्या! म्हातारा येसदा डोळे मिचकावीत एक गोष्ट सांगायचा.

"झालां काय, का यास म्हाराजाचा मुलगा सुखदेव—"

"सुखदेव नव्हे येसदा, शुकदेव." मी त्याला अडवायची.

"न्हाय सूनबाय, सुखदेवच. खोतीन झालीस तर मना म्हाताऱ्याला शिकिवतीस काय?"

"नाहीं शिकवीत. तूं सांग."

"सांगतांय्. त झालां कसां, का सुखदेव बसला आयच्या पोटांत लपून बारा वर्सां. तो काय भाएर निंगना. यास म्हाराजान् इनवला, का बाला, भाएर ये. त म्हंताय् कसा—"

"कसा?"

"म्हंताय का आत्याबायला घेऊन या, तर मी भाएर निंगनार!"

अन् मग गदागदा आपला आपणच हसायचा.

त्याचंहि खरंच होतं. आतेसासूबाईंचा हात अगदीं प्राजक्तीच्या फुलासारखा हलका. बाईचं पोट दुखायला लागलं, कीं त्या तिच्या पाठीवर हात फिरवून असं कांहीं गमतीदार बोलायच्या, कीं बाईला कळा जाणवायच्यासुद्धां नाहींत. आढ्याला एक दोरी बांधून त्या बाईला म्हणायच्या,

"कळ आली कीं, दोरीला लोंबकळल्यासारखं करावं. म्हणजे कळ सोपी होत्ये."

अन् ऐन वेळेवर पाठीकडून दोन्ही हातांचा आधार द्यायच्या. लेकरूं बाहेर आलेलं बाईला कळायचंदिखील नाहीं.

त्यांची एक पिशवी असे बरोबर. तींत एक चाकू, जानव्याचा दोरा, सुंठ, जायफळ, वेखंड, हेमगर्भाची मात्रा, असा बराच सरंजाम असायचा. पोराची नाळ बांधून, कापून, त्याला आंघोळ घालून, बाळंतिणीचं नीटनेटकं झालं, कीं तिला मात्राबित्रा देऊन मग त्या परत्या सरायच्या. म्हणायच्या,

"जात्यें ग घरीं. देस कुणाला तरी धाडून."

कशाला तें सांगत्यें. नाहीं म्हटला तरी अर्धापाऊण मण आहाळीव नि तेवढाच डिंक आमच्या घरीं दरवर्षी दाभोळेहून यायचा. कुळवाडणी कुणी बाळंत झाल्या, कीं त्यांना आहाळिवाचे, डिंकाचे लाडू आमच्या इथून जायचे.

गुजाभावजी कधीं कधीं थट्टा करीत,

"आते, डिंकाचे लाडू देस तर!"

"कशाला रे? तुझ्या घरीं कोण व्हायचंय् बाळंत?"

"म्हैस बाळंत झाल्यै. तिच्यासाठीं—"

अन् मग गडागडा आभाळ गडगडल्यागत हसायचे, नि म्हणायचे,

"म्हैसच कशाला, एखादी खेकडीण व्याली, तरीसुद्धां आते तिथं लाडू धाडील."

आतेसासूबाईनीं उत्तर द्यावं,

"धाडीन रे धाडीन! मारे मला प्रपादतो आहेस तो! गुजा, अरे, गरिबांच्या बायकांना कोण करतंय् सोळा सोपस्कार? आपल्याकडून होईल तेवढं करावं."

"करायचे काय सोपस्कार त्यांना? कांहीं जरूर नाहीं. तीं कौतुकं तुमच्या बायकांचीं बरं! थंड पाण्यांत पाय बुडवूं नकोस, गरम पाण्यानं हात धुवूं नकोस. वेलदोडा खाऊं नकोस, लवंग चघळूं नकोस. महारापोरांच्या बायका पहा! शेतांत कवळ तोडीत असतात. पोट दुखायला लागतं. तिथंच एका कडेला बाळंत होतात. पोर तसंच पाल्यापाचोळ्यांत गुंडाळून ठेवतात, नि परत कामाला लागतात. धूप नाहीं नि धुपाटणं नाहीं!"

आतेसासूबाईच्या डोळ्यांत टचकन् पाणी यायचं. तें पुशीत त्या म्हणायच्या,

"खरं रे बाबा, म्हणतोस त्यांत कांहीं खोटं नाहीं. पण गुजा, तुला वाटतं

तितकं सोपं नाहीं बरं बाळंतपण! एका लेकराला जन्म द्यायचा! ज्याला जगांतलं कांहींसुद्धां माहीत नाहीं, असा गर्भगोळा नऊ महिने नऊ दिवस उरींपोटीं वागवायचा, नि मग त्याला या तुमच्याआमच्या जगांत आणून सोडायचं. तुला काय मेल्या! पुरुष तूं. तुमची बरी मजा. करायचं नि बाजूला सरायचं. पुढं भोगताहेत बिचाऱ्या बायका! म्हणे लाडू काय करायचे नि गडू काय करायचे? मी म्हणत्यें, त्या वेळीं हिऱ्यामोत्यांचे लाडू घातले त्यांना, तरी कमीच पडतील. नि एवढा नाक वर करून बोलताएस, ते तुझ्या वेळीं नव्हते वाटतं तुझ्या आईनं डिंकाचे लाडू खाल्ले?"

गुजाभावजी मोहोरा चुकवीत म्हणायचे,

"दे हो आते लाडू! सगळ्या गांवाला दे."

"दीन हो! आणून द्या आहाळीव, सगळ्या गांवाला करून घालीन. तेवढी हिंमत आहे माझ्यांत. तुम्हीं आणून दिल्यावर मग करायला रे काय खर्च होतंय् माझं?"

मला किती दिवस वाटे, आतेसासूबाईच्या बरोबर आपणहि जावं. आपणहि उपयोगीं पडावं कुण्या अडलीनडलीच्या. नाहीं तरी तेंच बरोबर यायचं. खाल्लंप्यायलं यायचं नाहीं, कीं ल्यायलंघातलं यायचं नाहीं.

एकदां त्यांचा पाय मुरगळला होता. सांबरशिंग नि सुंठीचा ओढा घालीत होत्यें मी त्याच्यावर. तेवढ्यांत परबत्या म्हांगिऱ्याची बाईल आली धांवत धांवत. म्हणाली,

"चला चला आत्याबाय्! लई वराडती माजी सून."

तशाच आतेसासूबाई उठल्या. तिला म्हणाल्या,

"धांव तूं पुढं. आल्यें मी."

पण पाय भारीच दुखावला होता. लंगडायला लागल्या. तशीं मीं विचारलं,

"मी येऊं का बरोबर?"

"येत्येस?"

"होऽ! मला भारी हौस आहे—"

"चल पोरी. बरं झालं. तुला शिकवत्यें सगळं."

पिशवी घेतली, नि त्यांच्याबरोबर निघाल्यें. म्हांगिऱ्याच्या घराजवळ जाऊन पाहिलं, तों हा थोरला बायांचा घोळका जमला होता तिथं. म्हांगिरणीच्या किंकाळ्या अगदीं दरीभर गाजत होत्या. बाहेर परबत्याचा लेक रडत बसला

होता. आतेसासूबाईंना पाहिलंन्, तशीं धांवत त्याच्या पायांवर कोसळला, नि म्हणतो कसा,

"आत्याबाय्, आमचां घर वांचवा! पुन्ना कंदी न्हाय करनार असलां खराब काम!"

त्याचं बोलणं ऐकून मीं बाजूला तोंड करून हंसायला लागल्यें. आतेसासूबाईंनीं त्याला समजावलं, नि पुढं होऊन गोळा झालेल्या बायांना म्हणाल्या,

"सुकड्ये, धर्म्ये, जा बघूं आतां कामाला! उद्यां या पोराच्या तोंडांत साखर घालायला हो!"

आतेसासूबाईंना पहातांच सगळ्या पांगल्या. आम्ही आंत गेलों. नुसता घाणीचा बाजार होता तिथं. चुलीजवळ माशांचे खवले, त्यांवर घों घों करणाऱ्या मुलुखभर माशा, घरटा, उखळीं, मुसळ, तिथंच शेजारीं एक बारकी कणगुली, आंतबाहेर ये-जा करणारी एक कोंबडी, तिचीं पिलं, एक ना दोन—सत्राशें साठ.

त्यांतच दोन्ही पाय पसरून म्हांगिऱ्याची लेक बसली होती. दोघींतिघींनीं तिला धरलं होतं नि ती ठणाठणा दोन्ही हातांनीं शंख करीत होती.

कौतुकाची सून नि त्यांत पहिलटकरीण. जशी कांहीं सगळ्या वेटाळाला नाचवीत होती. आम्हांला पाह्यलंन् तशीं आरडली,

"सासूबाय्, आता मी मरत्यें! बोलल्याचालल्याची मापी द्या! नि तेवढी माजी पुतल्याची माल सोनारदादाकरं कराया टाकली, ती माज्या बरुबर जाला!"

आतेसासूबाईंनीं तिला हो-हो करीत अगोदर पटापटा घर मोकळं करायला लावलं. सगळं कांहीं उघड्यावरच होणार होतं. तर त्यांनीं दारावर एक घोंगडी टांगली. पण कोंबडीची ये-जा कांहीं थांबेना. मीं तिला तिसऱ्यांदां बाहेर हाकललं, तर परबत्याचा लेक तिच्या अंगावर धांवत म्हणाला,

"तुला आलां मरान! होलींत कापायची ती आतांच कापून टाकीन."

मग आतेसासूबाई बसल्या सुनेजवळ. तिच्या पाठीवरून खालीं असं चेपीत त्या म्हणाल्या,

"सुने, आरडूं नये असं. थोडं सोसावं हो!"

"काय करूं हो सासूबाय्? पुन्ना त्या मेल्याला अंगाला हात पर लाऊं द्यायची न्हाय!"

"बरं हो बरं! ही एवढी धडपणं सुटलीस, कीं आपण जोग घेऊन काशीलाच जाऊं कशा! तूं नि मी. येशील ना?"

"न्याल तिकरं यीन हो ऽ सासूबाय्! पर आता मना वाचवा."

मीं आढ्याला दोर बांधला, नि जायफळतुपाचं चाटण केलं. तें तिला चाटवलं, तशी थोड्या वेळानं जऽरा गुंगल्यासारखी झाली. आतेसासूबाई म्हणाल्या,

"सुने, वेण आली म्हंजे कुथावं हो जोरानं!"

त्यांनीं गर्भगोळ हातानं चाचपून पाहिला, नि परबत्याच्या बायकोला म्हणाल्या,

"पाणी तापतंय् ना? कांहीं काळजी करूं नकोस. सगळं धडपणीं होतंय."

थोड्या वेळानं वेणांवर वेणा यायला लागल्या, पाणी जायला लागलं, अन् मग एक तांबडं तांबडं सुरेख इवलंसं कौतुक बाहेर आलं!

मूल जलमूतांना असं मीं हें पहिल्यांदा पाह्यलं! किती देवाच्या करणीचं कौतुक वाटलं म्हणून सांगूं!

लगेच आतेसासूबाईनीं तें माझ्या हातांत दिलं. सगळं लिडबिडलेलं होतं. सुटसुट हातांतून सरकत होतं. पाहिलं त पोरगा होता. आतेसासूबाई दाखवीत गेल्या, मी करीत गेल्यें. तोंडांत बोट घालून घसा साफ केला. डोळे पुसले. अंगाला तेल लावलं. मग जानव्याच्या दोऱ्याची गांठ देऊन पोटाच्या वर चार बोटं अशी नाळ कापली, नि दोन्ही पायांवर आंघोळीला घेतलं!

एवढासा जीव टुकटुकु कुणीकडे तरी बघत होता. धड मान सांवरत नव्हती. किती छान दिसत होता! हाच आतां मोठा होईल, नि आयशीला गोष्टी शिकवील!

नंतर आतेसासूबाईनीं बाळंतिणीचं सगळं केलं. पोटबीट नीट बांधून त्यांनीं पोराला तिच्याजवळ ठेवलं, नि म्हणाल्या,

"काय गो सुने, मघां घोला शिव्या देत होतीस ना? आतां हें तुझ्या घोचं पोर नेऊं का आमच्या घरीं?"

हंसली, नि पोरावर हात टाकलंन्. तिची सासू म्हणाली,

"हा लोकाचा पोर काय करायचा आत्याबाय्? आता सवताचा होईल माज्या खोतनीला!"

"होईल हो!"



आठदहा खेपांना आतेसासूबाईंच्या बरोबर गेल्यें. नि मग त्या बाजूला बसत, मीच सगळं करीं. हे तर म्हणतसुद्धां,

"अगो आते, तुझी शिष्या म्हणे तयार झाली आतां!"

"झाली हो, झाली."

"अगदीं तुझ्यासारखं सगळं करत्ये ना?"

"हो ऽ! माझ्याहून सरस."

"काय काय करावं लागतं गो आते?"

"तुला काय करायचांय्? पुरुषांनीं असल्या चांभारचौकश्या करूं नयेत."

हें झालं धर्माचं. नि आतां कर्माचं सांगितलं पाहिजे.

आमच्या बागेच्या खालीं सख्या बावल्याचं घर होतं. सख्या बावला एका म्हांगिरीवर खलाशी म्हणून खालीं कुणीकडे कोचीन आहे म्हणे, तिकडे गेला. तिकडेच तो दगावला. घरीं चार पोरं नि बाईल. अशी पातळशी नाजुक बांध्याची होती. सख्या दगावला तेव्हांपासून खूप खपायची. बावल्याचं तें तेवढं एकटंच घर पडघवलींत. दुसरं कुणी सखंसोयरं नाहीं. त्यामुळं चार पोरांचा भार एकटीच्या खांद्यावर. ती कुठं कांडायला जाईल, कुठं भात भरडायला, कुठं पोफळं पष्टाळायला, असा कसाबसा प्रपंच धकवीत होती.

आतेसासूबाई नेहमीं तिला कामाला बोलवायच्या, नि अधिकउणं कांहींबाहीं द्यायच्या. म्हणायच्या,

"खाऊं दे बिचारीला. तिचीं पोरं मोठीं होतील, तर पांग तरी फेडतील."

पण कुणीकडून दुर्बुद्धि सुचली मेलीला! एक दिवशीं पहाटे घरीं आली, नि आतेसासूबाईच्या पायांवर घालून घेऊन मुसमुसत म्हणाली,

"आत्याबाय, मला ईख द्या!"

नि मग सगळं ध्यानांत आलं. नांव विचारलं, तर बराच वेळ सांगेना. शेवटीं एकदांचं सांगितलंन्. तो मेला तोंड घेऊन मुंबईला निघून गेला होता!

बराच वेळ आतेसासूबाई कपाळावर हात देऊन बसल्या होत्या. मग ताडकन् उठल्या, नि माझ्याकडे आल्या. मी आबाला पाजीत बसल्यें होत्यें.

मला म्हणाल्या,

"काय करायचं ग आतां?"

"काय करायचं? ही जीव दील तर पोरं काय करतील?"

"मग?"

"मग काय! होऊं द्यायचं. करूं या सगळं तिचं."

मग आतेसासूबाई नि मी, दोघी किती वेळ तरी तिला समजावीत होतों.

शेवटीं आतेसासूबाईनीं सांगितलं,

"हें बघ, देवानीं जिणं दिलं आहेन् तें नासून टाकायचं नाहीं. तुझ्या पोरां-साठीं तरी तूं जग."

"त्ये खरां! पर जगाला तोंड कसा दाकवूं?"

"घराबाहेर पडायचं नाहीं. पहाटच्या आंत सगळं बाहेरचं उरकून घ्यायचं, नि दिवसभर घरींच काम करायचं. मी दीन तुला काम."

"नि मग पोटांतल्याचां काय करायचां?"

मीं म्हटलं,

"काय करत्येस पोटांतल्याचं? चुकलं आपल्याकडून. आतां वेडंवांकडं कांहीं करायचं नाहीं."

बावलीण बाकी शर्थीची बाई हो! सांगितलं आतेसासूबाईनीं अगदीं तश्शी वागली. कधीं कधीं संध्याकाळची कुणाला न कळतां मी जायची तिच्या खोपटांत. तर आपली धीरानं एकेक दिवस रेटीत असायची. अगोदरच नाजुक बांधा. त्यांत तिनं भारीच लावून घेतलं होतंन् मनाला.

चांगलं पसरायला वेळ लागतो, वाईट पटकन् पसरतं. पाण्यांत टाकलेल्या तेलाच्या थेंबासारखं. गांवकींत चर्चा व्हायला लागली. एकदां तर व्यंकूभावजी ओटीवर म्हणालेदिखील.

"म्हादू, ऐकलं तें खरं का रे?"

"काय?"

"नव्हे—बावल्याच्या घरीं म्हणे पोट वाढतंय्."

हे कान झाडून मोकळे झाले—

"मला नाय बा माहीत!"

"माहीत नाहीं कसं? तूं गांवचा खोत! उद्यां सरकारदरबारीं चौकशी झाली, त काय सांगशील?"

आतेसासूबाई सगळं ऐकत होत्या. त्या बाहेर येऊन म्हणाल्या,

"कांहीं सांगावं लागायचं नाहीं हो व्यंकू!"

"नाहीं कसं आते? पाप का लपतंय्—"

"ज्याच्या अंगांत रग आहे, त्याचं लपतं. गरिबाचं लगेच उघडकीला येतं."

"अगो पण आते, शेण खाल्लीन् कशाला?"

आतेसासूबाई पहात राह्यल्या थोडा वेळ. नि मग म्हणाल्या,

"व्यंकू, चार पोरांची आईस व्हायचं असतंस, म्हणजे समजलं असतं! त्या पोरांच्या खळग्या भरायला हव्यात, म्हणून खाल्लंन् हो शेण!"

"पण आतां गांवकी—"

"गांवकीला म्हणावं, मीं पाठीशीं घातल्यै तिला!"

"मग बोलणंच खुंटलं!"

हें वादलेलं चहूंकडे झालं, नि उबळ तशीच जिरली. कुणी कांहीं बोललं नाहीं.

दिवस भरले तिचे. एका संध्याकाळीं पोर धांवत रडत आलं. म्हणे,

"आय कसं कसं करती!"

चतुर्थी होती त्या दिवशीं. आतेसासूबाई गेल्या होत्या देवाला. मीं आबाला दिलं सासूबाईजवळ. पिशवी उचलली, नि म्हणाल्यें,

"चल, मी येत्यें."

गेल्यें. कमाल बाईची! तोंडांतून शब्द कांहीं काढला नाहीं बापडीनं. पोर झालं, नि लगेच गेलं. मी तिची उस्तावर करत्यें, तोंच गणूभावजी नि आतेसासूबाई आल्या. आतेसासूबाईनीं भावजींना पलीकडे एक खड्डा खणायला सांगितला, नि सगळं दृष्टीआड करून टाकलं. उरकून आम्ही घरीं आलों. गणूभावजी तिला खिरीची बुरकुली घेऊन गेले. रात्रीं जेवणं उरकलीं, तों व्यंकूभावजींनीं येऊन यांना हांकारलीं.

बराच वेळपर्यंत दोघे बाहेर बोलत होते. मग हे धास्तावल्यासारखे आंत आले, नि म्हणाले,

"तरी आते, मी हज्जारदां तुला सांगितलं—"

"काय रे?"

"फारसं लोकांचं अंगावर घेत जाऊं नका बरं!"

"पण झालं काय?"

"बावलीचा निपटारा कुणीं केलंन्?"

मीं पुढं होऊन म्हटलं,

"मीं केला. कां?"

"आतां बसा बेड्या अडकवून! तुम्ही नि मी!"

"अरे, पण झालं काय?"

"काय झालं? हवालदारापर्यंत पोंचली बातमी. तो म्हणतो, पोराचा गळा दाबून निकाल लावला!"

बेड्यांचं नांव निघतांक्षणीं थोडासा धसका बसला होता मला. पण हें खोटंनाटं ऐकलं, तेव्हां मात्र मला सहन झालं नाहीं. मी म्हणाल्यें,

"असं कसं होईल? पोर मुळीं झालं तेंच पंथाला लागलं होतं!"

"पुरावा काय?"

"पुरावा कशाला? मी सांगत्यें कीं!"

"शहाणी आहेस! हवालदार म्हणतोय्, बावलीला बेड्या घालतों. घरा-शेजारीं उकरतों तिच्या. तुम्हांला अन् मला बोलावणं येणार."

"येऊं दे हो! म्हादू, आम्ही खरं तें सांगूं."

"अगो, तुम्ही ढीग सांगाल. साहेबानं ऐकलं पाहिजे ना?"

"साहेबाला नाहींत वाटतं कुणी आयाबहिणी?" मीं न राहवून म्हटलं.

"ती अक्कल हितं गांवांत पाजळा! पण साहेबापुढं उभं राहिल्यावर मग कळेल!"

सासूबाई शेजारीं ऐकत उभ्या होत्या. त्या म्हणाल्या,

"म्हादू, आतां कसं करायचं रे?"

"काय करायचं? नांवाला काळिमा लागला! बेचाळीस पिढ्यांत कुणी घरची बाई साहेबापुढं उभी राह्यली नव्हती. तें या पिढींत नशिबाला आलं—"

"अरे, पण आतां यांतून उतारा काढशील कीं नाहीं?"

"गेलाय् व्यंकू! त्याच्या हातीं आहे आतां प्राक्तनाची दोरी—"

तोंच व्यंकूभावजींची हांक आली. हे पुनः बाहेर गेले. पाटाच्या कडेला जाऊन थोडा वेळ दोघेहि बोलले. घरांत येऊन यांनीं पेटी उघडली.

सुपारी घातली हरकूशेटला, त्यांतले पांचशें रुपये शिल्लक होते. पैकीं अडीचशेंची पिशवी घेऊन बाहेर गेले. व्यंकूभावजींना थोडं दूर पोंचवून परत आले. म्हणाले,

"आज बोलणार बांका व्यंकू होता, म्हणून निभलं! नाहीं तर आल्ती खडी फोडायची पाळी!"



गुजाभावजी पंढरपुरला गेल्ते. गांवच्या भंडारी मंडळीचं भजन होतं. ती मंडळी बुवा म्हणून गुजाभावजींना घेऊन गेल्ती.

दत्तूअण्णाच्या सुनेचं पांचवं वरीस. तिची मंगळागौर उजवायची होती. ती

दुपारीं घरीं आली, नि म्हणाली,

"जिऊआते, तुम्हींहि यायचं बरं का रात्रीं! म्हादूभावजींच्या आई, तुम्हींहि."

"आम्हीं गो कशाला? आमचं काय काम आहे तिथं?"

"तें कांहीं नाहीं. तुम्हीं यायला हवं!"

"बरं बायो, यीन हो."

घरांत जिन्नस आणायचे होते. यांना चारसहा दिवसांपासून सांगत होत्यें. त्या दिवशीं दुपारीं हे म्हणाले,

"सांग पाहूं काय काय आणायचांय् तें!"

"हें काय? सांगितलं नाहीं का? यादीसुद्धां दिल्यै."

"हो कीं! ही कनवटीलाच आहे!"

"इश्श! चोळामोळा झाला असेल कागदाचा!"

"अगो, हात घाणेरडा होता, म्हणून कनवटीला लावली. म्हटलं, हात धुवीन नि वाचीन. बारं. काय काय—हें गो काय, गूळ संपला कीं काय? दोन ढेपा आणल्या होत्या ना?"

"एक दिली नाहीं का अंबूनानाकडे?"

"बरं—नि शेंगदाणे एवढे काय कराच्चे?"

"उपासांचे दिवस आले पुढं. तेवढे नकोत?"

"आज भिकूनानाची होडी जात्यै दाभोळेस. तिच्यांतनं जातों मी नि गणू. परतायला होईल रात्र."

"होऊं द्या. कंद्या घेऊन जा म्हंजे झालं. पावसापाण्याची फार रात्र मात्तर करूं नका."

"नाहीं कराच्चा."

हे गेले. माझीं पांच वर्सं केव्हांचीं उजवून झाल्तीं. तरी गांवची मंगळागौर. जायला हवं. आबाचं अंग जरा कणकणत होतं. किरकिर करीत होता सकाळपासून. आतेसासूबाई जायच्या, सासूबाई जायच्या, मी जायची. आक्कीला म्हणाल्यें मी,

"आक्क्ये, काय म्हणत्यें मी—"

"काय?"

"रात्रीं आम्ही जायच्या मंगळागौरीला. आबाचं अंग जरा गरम आहे. घरीं ठेवला तर सांभाळशील?"

"होऽ!"

"एकदां दूध पाजून झोंपवला कीं कांहीं उठाच्चा नाहीं तो. नि मधूनच पुनः यीन मी."

"तुम्ही कशाला येतांय् वहिनी? मी पाजीन कीं उठला तर!"

"बरं."

संध्याकाळीं मुली जाऊन लोणचांब्यापासून हाराभर सीतेचीं आंसवं घेऊन आल्या. त्यांनीं आग्रह करून शारदेला—आंधळ्या भिऊआबाच्या बायकोला—नेल्तीं बरोबर. आधींच ती दिसायला देखणी. नि त्यांत डोईवर जांभळ्या लाल फुलांचा हारा. मग जशी काय गौरच वाटली. या सगळ्या वरून उतरत होत्या, तेवढयांत बंदरावरून व्यंकूभावजी परतत होते, ते आमच्या अंगणांत शिरले.

"पाणी दे गो आते—"

"देत्यें हो. टेक जरासा. बंदरावर का गेल्तास?"

"हो ना. ही डोईवर फुलांचा भारा घेऊन गो कोण उतरत्ये? शारदावहिनी काय?"

"शारदा ओळखेना तुला?"

"न ओळखायला काय झालं? भिऊआबा भाग्यवान हां बाकी!"

"जळलं तें भाग्य! एवढी सुरेख बायको असून कांहीं उपेग आहे का? म्हणतात ना, नागव्यांच्या गांवीं पीतांबराची पेठ! दैव बिचारीचं!"

"नि या सगळ्या चालल्याएत कुठं?"

"दत्तूअण्णाच्या सुनेची मंगळागौर नाहीं का आज?"

"हो. हरी सांगत होता खरा सकाळीं. मग वहिनी जायची असेल?"

"अरे, आम्हीसुद्धां जायचों."

"तुम्ही कोण? तूं नि काकू?"

"हो ऽ ओ! पोर कांहीं केल्या ऐकेना. तर म्हटलं, यीन हो. अरे, घरांत दुर्गीचीसुद्धां मंगळागौर व्हायची! पण सासरचीं माणसं धाडतील तर ना? लग्न झाल्यावर एकदां मुलगी आली माहेरपणासाठीं. त्यावर जी गेली ती परत धाडीनासे झाले! नवरा आहे चमत्कारिक. बरं का वाटतंय् दुसऱ्याकडे जाणं! पण आपलं जायचं."

"नि घरांत कोण? म्हादेवाची होडी तर मघांच गेली."

"आहे कीं आक्की."

“बारं बारं!”

दत्तूअण्णांच्या घरीं भारीच बेत केल्ता. मारे लाफबीफ आणले होतेन्. संध्याकाळीं फराळ उरकले नि आम्ही बसलों होतों, तेवढयांत दत्तूअण्णाची सून पुनः एकदां येऊन बोलावून गेली. दूध तापलं होतं, तें थारोळ्यांत ठेवलं, नि आतेसासूबाई म्हणाल्या,

“चल गो वहिनी, येत्येस ना?”

“आत्तां [illegible]?”

“चल. एवढं दोनदोनदां बोलावून गेली. हितं बसल्या काय नि तिथं बसल्या काय—”

“सूनबाई येत्येय् ना?”

“मी जरा मागून येत्यें, आबाला दूधबीध पाजून.”

“बरं.”

त्या दोघी गेल्या. आबाचं अंग आतां निवालं होतं. त्याला दूध पाजलं, नि मांडीवर घेऊन झोंपवला. आक्की आंतलं उरकून आली, नि म्हणाली,

“झोंपला तो. ठेवा आतां, नि जा तुम्ही वहिनी.”

“तूं ये कीं गो पाहून आक्क्ये—भारी छान आरास मांडल्यै हो!”

“नको!”

“कां गो?”

एक उसासा टाकून आक्की म्हणाली,

“नाहीं लिहिलं कर्मांत, त्या वाटेला कशाला जायचं वहिनी?”

“असं ग काय बोलत्येस आक्क्ये?”

“खोटं का बोलत्यें वहिनी? आम्ही म्हणजे देवादारच्या दिवल्या हो! जळायच्या जळायच्या, नि शेवटीं केव्हां तरी विझून जायच्या. कुणी उसासासुद्धां टाकायचं नाहीं आमच्यासाठीं.”

आक्की जणुं काय पुढचं भविष्यच बोलत होती! तिची दिवली—आपोआप का विझली ती? नाहीं. विझवली! झडप घालून विझवली!

आबाला हंतरुणावर ठेवलं. नीट पांघरूण घातलं. नि मग मी ओचापदर नीट करीत आक्कीला म्हणाल्यें,

“जाऊं ना गो?”

“या हो! आतां तो उठला, तर बघेन मी.”

दत्तूअण्णांकडे गेल्यें, तोंवेरी मुली बहुधा जमल्या होत्या सगळ्या. त्यांचीं खाणींपिणीं झालीं, नि मग सुरू झाले खेळ. बनीची आई, दत्तूअण्णाची बायको, दामूअण्णाची बायको, आतेसासूबाई, सासूबाई या सगळ्या म्हाताऱ्या फरंमरं नि समुद्रकोंड काढून बसल्या खेळत. चौसर होताच आणखी.

नि आमचा धुमाकूळ काय विचारतां! फुगड्या, झिम्मे, हें तर सगळं झालंच. नि त्याशिवाय दंडफुगडी, कोंबडा, बसफुगडी, टिपऱ्या, आगीनपासोडा —नाना परी!

आणखी—एका तपेलीला दोरी बांधायची. जी पोर झोपली, तिच्या वेणीला त्या दोरीचं दुसरं टोक बांधायचं. नि मग तिच्याभोंवतीं पकवा घालीत म्हणायचं,

**'तपेलीची लांब दोरी। तपेली सांभाळ पोरी!'**

ती धडपडत जागी व्हायची. हें काय गो, हें काय गो, करीत उठायची, तों तपेली आदळायची पाठीवर! मग काय हंशा म्हणून विचारतां!

असा अकरा सवा अकराचा सुमार असेल. त सासूबाई म्हणाल्या,

"एकदां पोराला बघून येस हो पोरी!"

जात्यें जात्यें म्हणत्यें, पण पोरी सोडतील तर ना!

त्यांनीं सोडलं असतं तर?

पुढलं महाभारत कशाला घडलं असतं?

शेवटीं टिपऱ्यांचा फेर संपला, नि मग निघलयें. सासूबाई म्हणाल्या,

"कंद्या घेऊन जा गो!"

"करायचा काय? आत्तां येत्यें!"

घाईघाईनं निघाल्यें, नी अशी यादोनानांच्या कुपाटीजवळ जात्यें, तों घरीं कुणाची तरी हिसकाहिसकी नि एक बारीकशी किंकाळी ऐकूं आली! एकदम छातींत धस्स झालं!

एकदम समोर उभी राह्यली चोरांची कल्पना—चोरांनीं माझ्या आबाला मारलीं असेल!

तश्शी मोठ्यानं किंकाळी फोडली, नी घराकडे धावल्यें. अगोदर पोराला जवळ घेऊं दे. मग न्या म्हणावं रांडेच्यांनो काय नेतां तें!

माझी किंकाळी ऐकली, तशीं जागरणाच्या घरचा गलगा थांबला. सासूबाई नि आतेसासूबाई कंद्या घेऊन धांवल्या. त्यांच्या मागोमाग दत्तूअण्णा, दामू-

अण्णा काठ्या घेऊन.

मी ओटीवर शिरल्यें तों सगळा अंधार! सरळ अंथरुणापाशीं गेल्यें, नि आबाला पाह्यलं. तो शांत झोंपलेला होता. तेवढ्यांत कंद्या घेऊन मंडळी आली.

बघतात तों काय—

व्यंकूभावजी अंगणांत उभे होते!

मंडळी पहातांच त्यांनीं जी बडबडायला सुरवात केली—

"हडळ रांडेची! माझ्या आईएवढी! काळुंद्री! बंदरावर निघालों नि पाणी प्यावं म्हणून घरांत शिरलों. त पाणी आणून दिलंन्, नि भांडं उचलून तोंडाला लावलं, तों अवदसेनं चिमणी विझवून आपला हात धरलंन् माझा! कवटाळीण रांडेची!"

दत्तूअण्णा म्हणाले,

"कोण?"

"दुसरं कोण? आक्की का बोक्की कोण ती!"

आतेसासूबाई कंद्या घेऊन घरांत शिरल्या. सगळीकडे पाह्यलं नि न्हाणी-घराकडे वळल्या. त दार बंद!

"आक्के—दार उघड!"

कित्ती हांका मारल्या! पण हूं का चूं नाहीं. मग दत्तूअण्णांनीं उखळींतून दाराची फळी वर उचलली नि कंद्ये घेऊन आंत शिरली मंडळी. तों आक्की आंघोळीच्या दगडावर कोसळलेली! कपाळाला खोक पडलेली, नि तिनं डोळे घट्ट मिटून घेतलेले!

"आक्के—"

एकदम विजेसारखी उठली ती नि आतेसासूबाईच्या पायावर कोसळत आक्रंदत म्हणाली,

"खोटं आहे हो आत्याबाई—सगळं खोटं आहे! मावशी, तूं तरी सांग ग यांना! सगळं खोटं आहे हें!"

"तूं अगोदर बाहेर चल बघूं!"

त्यांनीं आक्कीचा हात धरून तिला बाहेर आणली. सासूबाईंना सांगून हळद मागवली. ती तिच्या खोकेंत भरायला लागल्या, तशीं त्यांचा हात लोटून ती म्हणाली,

"आते, अगोदर मी निर्दोषी आहें असं म्हणा!"

"काय झालं? सांग बघूं?"

"आबा उठला. त्याला दूध पाजून मीं झोंपवलं नि थोपटीत बसल्यें. तों अंगणांत पावलं वाजलीं. मी म्हणाल्यें, 'कोण आहे?' तशीं ते म्हणाले, 'मी आहें. पाणी प्यायला दे.' मी पाण्याचा तांब्या घेऊन आल्यें, त मला म्हणाले—"

पुढं तिच्याच्यानं सांगवेना! थोडा वेळ थांबून म्हणाली,

"मला म्हणाले, तुला गुलाली घेऊन दीन! मी बावरल्यें. हातापायांना कांप सुटला. तशीं उठून माझा हात धरलीं—"

खालीं कोसळून ती ओक्साबोक्शीं रडायला लागली. आतेसासूबाई म्हणाल्या,

"रडूं नकोस आक्कये! सगळं सांग."

"सांगत्यें हो सांगत्यें! मग मला काय वाटेल तें करा! फांशीं द्या! पण दोषी म्हणून देऊं नका. निर्दोषी म्हणून द्या!"

"तें पाहूं मग. तूं सांग अगोदर."

"मला काय होतंय् तेंच कळेना. अंधारी आली. पण कशी कोण जाणे, किंकाळी निघाली माझ्या तोंडून. तेवढ्यांत वहिनी ओरडल्या. तशीं पटदिशीं मला सोडलीं, नि ठाणवईवरली चिमणी विझवली फुंकर घालून. मला काय करावं तें कळेना! एकदम तुम्ही सगळीं आलांत, तशीं मी न्हाणींत शिरल्यें! काय वाटेल तें करायला सांग मला मावशी! देवावरची तुळस उचलायला सांग, नाहीं तर निखारा दे हातावर! निर्दोषी आहें ग मी!"

एवढ्यांत त्या गलग्यांतून हे शिरले आंत. संतापानं म्हणाले,

"कुठं आहे आक्की?"

"तूं केव्हां आलास?"

"आत्तांच येतांय्. आक्की कुठाय्?"

आक्की उठली, नी यांच्याकडे धावत म्हणाली,

"ही हितं आहें रे म्हादूनाना—निर्दोषी आहें रे मी!"

"दूर हो रांडेच्ये! व्यंकू का खोटं सांगेल?"

"म्हादूनाना!"

आक्की किंचाळली, नि खालीं कोसळून बेशुद्ध झाली!

आतेसासूबाई तिच्याकडे धावल्या, नी जरबेनं म्हणाल्या,

"म्हादेवा!"

"माझ्यावर कां आरडत्येस आते? व्यंकू काय खोटं बोलेल? एवढा मोटा

माणूस तो—साहेबाला मुठींत वागवणारा. मोठीं मोठीं माणसं येतात त्याच्या घरीं. दापोलीचे ओक वकीलसुद्धां त्याच्या घरीं उतरतात. तो काय खोटं बोलेल? हिनंच रांडेचीनं—"

माझ्या अंगांत काय संचरलं कोण जाणे! झडझडून उभी राहिल्यें, नि म्हणाल्यें,

"हें पहा, रांडेची रांडेची म्हणूं नका! तुम्हांला काय म्हणायचांय्? व्यंकूभावजी खरे, नि आक्की खोटी—हेंच ना?"

"हेंच, हेंच! माझ्या घरांत नको हें पाप! दुसरा एखादा कुळवाडी असता, तर खापलून काढता—"

"तुम्हांला धीर होत नाहीं ना? ठीक आहे. तुमची बायको मी—तुम्ही बोललां तें मला खरं केलं पाहिजे!"

तरातरा बाहेर गेल्यें, नि वळचणीची कोयती घेऊन आल्यें. जाऊन आक्कीचा हात धरला. ती शुद्धीवर आल्ती. माझ्याकडे केविलवाणी पहात पुटपुटली,

"वहिनी!"

"बोलूं नकोस आक्क्ये! मला माहीत आहे—तूं गंगाजळासारखी आहेस! पण यांच्या घरांत आहेस तूं. नि मी यांची बायको. तेव्हां बाहेर चल. तुझं डोस्कं तोडत्यें! यांना बळ नाहीं, पण इच्छा मात्र आहे. ती मला पुरी करायला हवी!"

आक्की उठली, नि माझ्या मागं चालली. आतेसासूबाई किंचाळल्या,

"सूनबाई!—आक्क्ये!"

पडत झडत त्या उठल्या नि माझ्याजवळ येऊन माझ्या हातांतली कोयती त्यांनीं हिसकून घेतली. तशीं मी आपल्याच थोबाडींत मारून घेत म्हणाल्यें,

"आक्के, कां आलीस बाई बायकांच्या जल्माला?—येतां क्षणींच मेली कां नाहींस?"

हे भिंतीशीं बसत आरडले,

"करा! करा! तमाशा करा! सगळ्या गांवकऱ्यांना बोलवा!"

मी पदर खोंचून वाघिणीसारखी यांच्यापुढं उभी राह्यल्यें, नि म्हणाल्यें,

"तमाशा? आम्हीं केला कीं तुम्हीं? एवढीं वर्सं आज आक्की आहे घरांत. कधीं वाकडं पाऊल दिसलं का तिचं? येवढीं माणसं येतात–जातात. कधीं

कुणाच्या आपणहून द्रिष्टीस तरी पडली का ? कधीं कुणाकडं पाहून हसली का? कशावरून तुम्ही तिला पापी म्हणालांत? पुरुष आहांत म्हणून? पुरुषांनीं शेण खाल्लं तरी खपतं! अन् तेंसुद्धां व्यंकूभावजींच्या बोलावर विश्वासून? पान उचलतील का देवावरलं व्यंकूभावजी? होऊं दे. उचलूं दे त्यांना पान. मग खरंच तोडत्यें मी आक्कीला! समजलांत? तिळभर मागं नाहीं सरायची!"

"घाला काय हवा तो गोंधळ! शिव हरे! शिव हरे!"

मी तशीच बाहेर आल्यें. तिथं ही गर्दी जमली होती. म्हणाल्यें,

"जा आपापल्या घरीं. घरोघर मातीच्याच चुली आहेत! जा!"

घर मोकळं झालं. आतेसासूबाई म्हणाल्या,

"ऊठ आक्क्ये! चल माझ्याजवळ झोंपायला."

"आते—"

"ऊठ पोरी. सकाळीं पाहूं काय तें!"

आक्की उठली, नि माझ्याजवळ आली. माझे बाव्हटे धरून ती थरथरत म्हणाली,

"वहिनी, तुम्हांला देवाची शप्पत आहे. खरं सांगा. मी दोषी आहें असं वाटतं का तुम्हांला?"

आतां मी कशी गळून गेल्यें देवाला माहीत. तिच्या खांद्यावर डोकं टेकवून रडत म्हणाल्यें,

"देवाची शप्पत आक्क्ये! तूं धुतल्या तांदळासारखी आहेस ग!"

आक्कीनं माझ्या पायांना हात लावला, नि म्हणाली,

"चला वहिनी झोंपायला. आतां रडायचं नाहीं."

मला तिनं हंतरुणावर झोंपवलंन्. आपली चौघडी घेऊन सैंपाकघरांत आतेसासूबाईच्या पायथ्याशीं पडली.

रात्रभर कुणी कुणाशीं बोललं नाहीं, झोंपहि नाहीं. पहाटे पहाटे डोळा लागला. उठल्यें, ती आतेसासूबाईच्या हांकेनं.

"सूनबाई—"

"ओ!"

"आक्की कुठाय्?"

"म्हंजे?"

"अगो, म्हंजे काय? केव्हां उठून गेली न कळे!"

आतेसासूबाईंना शंका आली. त्यांनीं गणूभावजींना खालीं बांधावर दवडलीं. त्यांचीच शंका खरी होती. त्या छातीभर पाण्यांत जीव जायचा नाहीं, म्हणून आक्कीनं छातीशीं धोंडे बांधले होतेन्! वर काढली, तेव्हां कशी शांत दिसत होती!

आतेसासूबाईनीं ऐकलीं, तशीं धांवत गेल्या, नि त्या प्रेताच्या गळयांत पडून त्यांनीं हंबरडा फोडला,

"आक्क्ये ग!"

ꙮ ꙮ ꙮ

पडघवली उतरतीला लागली. आक्कीच्या धसक्यानं आतेसासूबाईनीं अंथरूण धरलीं. कांहीं दुखणं नाहीं, बहाणं नाहीं. पण अन्न जाईना झालं. म्हणायच्या,

"मींच मारली पोरीला. अगोदरच म्हाद्याला चूप करत्यें तर?"

आम्हीं खूप समजवावं. पण ज्याचं नांव तें. एकदां मीं आबाला ठेवला त्यांच्या हंतरुणावर. आतां चांगला दोन अडीच वर्सांचा झाला होता तो. त्याच्याकडे पाहिलीं आतेसासूबाईनीं, तशा आपल्या पाठ करून झोपल्या! मीं म्हटलं,

"आतेसासूबाई, असं कां हो करतां? एकदां पहा तरी कसा हसतोय् तो!"

"उचल पोरी त्याला. नको मायेंत गुंतवूं आतां. पुष्कळ झालं!"

झालं. शेवटीं सगळं हंतरुणावरच व्हायला लागलं. पाणी तेवढं प्यायच्या घोटभर. अन् सगळं माझ्याकडून करून घ्यायच्या. यांना हातसुद्धां लावूं द्यायच्या नाहींत.

एकदां म्हणाल्या,

"माझा गुजा—मारुतिराया नाहीं का ग आला अजून?"

"नाहीं."

"कुठं गेलाय्?"

"पंढरपूरला गेल्ते. तिथून म्हणे कुठं अक्कलकोटला गेलेत."

"भेट होत्ये का नाहीं कोण जाणे!"

शेवटीं एक दिवस आपल्या आपणच उठून बसल्या. म्हणाल्या,

"अंबे, मला तुळशीला पाणी घालायच्यांय् ग—"

"मग हितं आणत्यें कुंडी."

"नको. मला तिथं घेऊन चल."

कुशाच्या आल्ती. ती, मी, सासूबाई, गणूभावजी, चौघांनीं मिळून धरून

तुळशीपाशीं नेलं. म्हणाल्यासुद्धां हसून,

"चौघं रे कां धरतांय्? धरा धरा—आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां!"

तुळशीला पाणी घातलीं, नमस्कार केलीं, कायसं पुटपुटल्या. मग पुनः आणून हंतरुणावर निजवल्या. म्हणाल्या,

"अंबे, मला पांघरूण घाल."

"घालत्यें."

"गणूराया, वहिनीचं ऐकत जावं बरं का!"

"ऐकीन."

"कुशे, आतां पडत्यें ग!"

"पड हो! इवलं खाल्लं असतंस—"

"नको. आतां मला स्वस्थ पडूं दे. तुम्ही सगळ्या जा."

नीट पांघरूण घातलं, नि आम्ही बाजूला झालों. कुशात्त्या म्हणाली,

"अंबे, आज हुशार दिसत्ये जिऊ. संध्याकाळीं इवली पेज कर. मी ईन हो! मग पाजीन जबरदस्तीनं."

कुशात्त्या गेली. आम्ही सगळीं कामाला लागलों. बराच वेळ झाला. सासूबाई एकदां सहज खोलींत डोकावल्या. आतेसासूबाई शांत झोपल्या होत्या. सासूबाई येऊन मला म्हणाल्या.

"सूनबाई, आज शांत झोपल्या हो!"

"श्रम झाले ना? तुळशीला जाऊन आल्या. तेवढंसुद्धां जाणवतं आजारी माणसाला."

पण तास झाला. दोन तास झाले. हूं का चूं नाहीं! सासूबाई खोलींत गेल्या, नि हांक मारलीं. ओ नाहीं! मग हात लावून पाहिलीं—तर लाकूड! तशीं मोठ्यानं ओरडल्या,

"सूनबाई—"

मी धावल्यें. पाह्यलं. प्राण जाऊन तास दोन तास झाले होते! अगदीं कुणालासुद्धां कळूं दिलं नाहीं. शांत झोपल्याच आहेत जशा कांहीं. आंकडी नाहीं, वेठ नाहीं, यातना नाहींत!

सासूबाईनीं हंबरडा फोडला.

"वन्सं हो—मला कां नाहीं घेऊन गेलांत! कशाला ठेवलीत मागं?"

गेल्या आतेसासूबाई! फार फार केलं त्यांनीं माझं. माहेरीं आईचं सुख

लाभलं नाहीं. तें सासरीं मिळालं. त्या एकट्या असल्या, तरी घर भरलं दिसायचं. हात नेहमीं देण्यासाठीं वर! कुणाला कश्शाला नाहीं म्हणाल्या नाहींत. गंगेसारखा स्वभाव. आतां असलं माणूस दिसायचं नाहीं. आतेसासूबाई गेल्या नव्हे, गांवाची कळा गेली!

मगचं कांहीं सांगत बसत नाहीं. सगळा गांव गोळा झाला. त्यानंतर कधीं गांव एकत्र झालेला मीं पाह्यला नाहीं. कुळवाडी, भंडारी, कोळी, महार, चांभार—झाडून सगळे.

कुशाव्या आंघोळ घालतांना म्हणाली,

"जिऊ, अगो तूं मी बरोबरीच्या! मी मागं कशी ग राह्यल्यें!"

अग्नि गणूभावजींनीं दिला. यांनीं हात लावला नाहीं. यांनाहि जाणवलं. डोळे पुशीत म्हणाले,

"गण्यालाच करूं दे सगळं. त्याच्यावर जीव होता तिचा."

व्यंकूभावजी आल्ते. ते बोलले,

"असं काय करताएस म्हाद्या? रीतीचं करायला नको?"

"नाहीं. त्यालाच करूं दे!"

तेरावा झाला. नि चौदाव्याला गुजाभावजी आले. आले ते मुळीं सोंगासारखे कफनी घालून! गळ्यांत रुद्राक्षाची माळ! कपाळावर शेंदूर! चार महिन्यांत दाढीबिढीहि वाढवली होती!

आले, नी झोपाळ्यावर बसले. मीं त्यांना पाहिलं, नी रडायला लागल्यें. तेहि बराच वेळ मुखस्तंभासारखे तोंडाखालीं हात देऊन बसले, नि मग हुंदके देऊन रडायला लागले. म्हणाले,

"गेली ना! माझी आते—"

बराच वेळ कोणी कांहीं बोललं नाहीं. मग मला म्हणाले,

"वहिनी, माझी आठवण—"

"हो. काढली होती!"

"काय म्हणाली?"

"म्हणाल्या, अजून नाहीं का आला माझा मारुतिराया?"

"आते गो—मला न भेटतां कशी गेलीस?"

मग जें कांहीं तारांगण घातलीं त्यांनीं—समजावतां समजावतां पुरेवाट झाली. त्या कां गेल्या हें कांहीं त्यांना ठाऊक नव्हतं. तें दुपारीं जेवतांना कळलं.

"आक्की कुठं दिसत नाहीं ती ?"

कुणी कांहीं बोललं नाहीं.

"वहिनी, आक्की कुटाय् ग ?"

"तिचं झालं सोनं."

"रांडेच्च्यांनो ! मांडलाय् काय एकेकांनीं ? तिला काय झालं ?"

"कांहीं नाहीं."

त्या वेळीं सांगितलं नाहीं. पण संध्याकाळीं असा पावसाचा सपका येऊन गेला, नि मग उघडलं. मी आबाला घेऊन बसल्यें तुळशीपाशीं. गुजाभावजी आले. आबा त्यांना पाहून भ्यायला. जाईना त्यांच्याकडे. म्हणाले,

"पोरा भिताहेस काय ? मी काका तुझा—तुझ्या बापुसाचा भाऊ !"

"हें काय भावजी ? दाढी काय, नि माळा काय, नि शेंदूर काय—सोंगासारखं !"

"निंदा करूं नकोस वहिनी. मीं गुरू केलाय्."

"कोण ?"

"मोडनिंबचे नित्यानंदमहाराज. साक्षात्कारी आहेत."

"कोण जाणे ! पण त्यांच्या बुवापणाचा साक्षात्कार झालाय् मला."

"कसा ?"

"तुमच्या या सोंगावरून !"

"वहिनी, मी बोलायचा नाहीं हो तुझ्याशीं !"

"बाई माझी ! एवढा राग ?"

"छे ! सद्गुरूंनीं शपथ घातल्यै."

"कशाबद्दल ?"

"राग करायचा नाहीं कुणाचा."

"कां घातल्यै ?"

"मीं त्यांच्या एका शिष्याला जरा नीट केला !"

"म्हंजे ? मारलींत का काय ?"

"फारसं नाहीं—नुसता हात मोडला."

"धन्य झाली तुमची !"

"गांजा पिऊन गुरुमहाराजांना नाहीं नाहीं तें बोलायला लागला !"

"मग ?"

"गुरुमहाराजांनीं शपथ घातली, कीं कुणावर हात उचलायचा नाहीं."

थोडा वेळ गप्प बसल्यें. चीड आली गुजाभावजींची. मला आशा होती, हे तरी व्यंकूभावजींना धडा शिकवतील. पण हे आले गंडा बांधून!

बोलत नाहींशी पाहिलं, तेव्हां म्हणाले,

"कां गो वहिनी, बोलत नाहींसशी?"

"उगीच."

"आक्कीला काय झालं?"

"समजून घेऊन काय करायचांय् तुम्हांला?"

"कां?"

"करणार आहांत का कांहीं?"

"काय करायचं?"

"अपराध केला त्याला शिक्षा?"

"कुणीं केला अपराध?"

मग सगळं सांगितलं त्यांना. गणूभावजी येऊन बसले. त्यांनींहि सांगितलं. गुजाभावजी ओठ दांतांनीं दाबून ऐकत होते. आम्हांला वाटलं, आतां हे लाकूड उचलून धावणार!

पण आमचं सांगणं संपल्यावर गुजाभावजींनीं श्वास सोडलीं, नि म्हणाले,

"श्रीगुरू, मला शक्ति द्या! हें सहन केलं पाहिजे मला! तुमची शपथ घेतल्यै मीं!"

मीं चिडून म्हटलं,

"म्हंजे फुकटच्च गेलं ना हें?"

"काय?"

"आक्कीचं मरण?"

"सद्‌गुरुनाथ! सद्‌गुरुनाथ!"

जळ्ळा तो सद्‌गुरुनाथ!

पण नुसतं एवढ्यानंच झालं नाहीं. मी म्हणत्यें, पडघवली नासली, ती दोघांमुळं. व्यंकूभावजी, नि गुजाभावजी. एकाच्या गुणांनीं नि दुसऱ्याच्या गुरुबाजीनं! याच वेळीं चांगलं कांडात काढते गुजाभावजी तर!

पण होण्यमाण कसं टळायचं?

व्यंकूभावजींच्या कानीं गुजाभावजींची गुरुबाजी गेली, नि ते निर्धास्त झाले!

केलीं काय काय?

सांगत्येंच. सांगायला बसल्यें आहें ना?

एक्या दिवशीं आतेसासूबाई गेल्यावर महिन्या दीड महिन्यानं दुपारीं पुरुषांचीं जेवणं उरकलीं, नि आम्ही दोघी बसलों जेवायला. नुकता भात उकरून पानांत घेतला, नि डाळिंब्यांची केल्ती आमटी, ती वाढून घ्यायला लागल्यें. तेवढ्यांत हाक आली—

"व्हयनीबाय—"

"कोणाय् रे?"

"मी—सुभान्या."

"काय रे?"

"कुसात्त्यांनीं बलिवलांय्."

"हो का? यीन म्हणावं दुपारची."

"न्हाई. लगोलग बलिवलांय्."

"लगोलग? कशासाटीं रे?"

"तां मना न्हाई ठावां."

"जेवून येत्यें म्हणून सांग."

जेवण झालं, नि सासूबाई म्हणाल्या,

"मी आवरत्यें. तूं ये जाऊन."

हात धुतले. इवली आवळ्याची वडी तोंडांत टाकली, नि निघाल्यें. कुशात्त्याच्या अंगणांत गडी म्हशीला खत पडलं होतं तें धूत उभा होता. मला पाहून तो म्हणाला,

"तकरं हायेत, कोठीच्या खोलींत."

घरांत शिरल्यें त येडा रंग्या हसत उंबरठ्यावर बसला होता. माझ्याकडे पाहून त्यानं दांत विचकलेन्.

"काय रंगूनाना, बराय् ना?"

"होऽऽ! मला मोदक आवडतात—"

"आवडतात का? मग छान आहे."

कोठीच्या खोलींत गेल्यें, तिथं अंधारांत कुशात्त्या चौघडी हंतरून झोपली होती. मला पाहून म्हणाली,

"ये अंबे. हितं बस अशी."

"कां? ताप का आलाय्?"

"नाहीं ग! मला कसा यील ताप दगडीला? उगीच छातींत दुखतांय्."

"केव्हांपासून?"

"झाला महिना."

"भारी का दुखतंय्?"

"नाऽय्—पण कधीं कधीं कळ येत्ये. वाताचितानं असेल."

"मेथीचा काढा तरी घ्यायचा."

"घेत्येंय् मी वातहारक चूर्ण. यांच्याकरतां आणली होती बाटली, त्यांतली होती पुडी."

"जेवण झालं कीं नाहीं?"

"न करून कसं चालेल? रंग्या माझा जेवायचा! हें बघ, अशी जवळ सरक."

कुशात्त्यानं माझ्या मांडीवर हात ठेवला, नि म्हणाली,

"अंबे, माझ्या मागं माझ्या रंग्याचं करशील का ग?"

"पण मागच्या नी पुढच्या गोष्टी हव्यात कशाला आत्तांपासून?"

"अगोदर करशील का नाहीं तें सांग."

"करीन हो, करीन."

एवढी काळ्या कातळासारखी खणखणीत कुशात्त्या, मातीच्या ढेकळासारखी ढेपाळली. ढसाढसा रडायला लागली. मला असं विचित्र झालं! एवढ्या थोरल्या त्या बाईनं आपलं माझ्या मांडींत डोस्कं खुपसलंन्. पण मग थोड्या वेळानं जरा कड सांवरून म्हणाली,

"अंबे, कोणी नाहीं ग माझ्या पोराला! माझ्या मागं कुत्रासुद्धां त्याचे हाल खायचा नाहीं! एवढे दिवस वाट पाह्यली—पोर माझा सुधारेल; पण नाहीं देवाच्या मनांत! जें काय राखलं तें सगळं त्याच्यासाठीं. माझ्यामागं भाऊबंद या पोराचे हालहाल करतील—पण तूं त्याचं करीन म्हणालीस, नि माझ्या उरावरचा डोंगर उतरला!"

"कुशात्त्या, तुम्ही कांहीं काळजी करूं नका. माझा आबा, गणूभावजी, तसे रंगूभावजी."

"करशील हो पोरी! तूंच एक करशील त्याचं, असा भरंवसा होता. म्हणून तर हांक घातली तुला!"

थोडा वेळ इकडल्यातिकडल्या गोष्टी सांगून कुशात्त्याचं मन हलकं केलं. मी निघाल्यें, तशीं तिनं बजावलंन्,

"अंबे—"

"काय ?"

"माझ्या मागं सगळं रंग्याचं हो ! नि तूं पहायचंस. म्हादेवाला सांग."

"सांगत्यें."

उठल्यें नि घरीं आल्यें. सासूबाईना सगळं सांगितलं. त्याहि जाऊन आल्या. संध्याकाळीं गुजाभावजींचा फेरा आल्ता. त्यांना म्हटलं,

"गुजाभावजी, वेळ आहे का थोडासा ?"

"कां ? मला काय कुठं हपिसांत सह्या करायच्यैत !"

"नाहीं—तुमची गुरुपूजा—"

"करा—थट्टा करा ! सगळा गांव खी खी खी हसतांय्. तूंहि हस. मागं राहूं नका कुणी !"

"रागावूं नका भावजी. काम आहे म्हणून विच्यारलं."

"रागवायला सवडच कुठं ठेवली आहे सद्‌गुरुरायांनीं ! पण फोजदार म्हणे कसा माहीत आहे ?"

"कसा ?"

"म्हणे, नमस्कार गुजामहाराज ! त म्हटलं, कां रे बाबा ? त म्हणे, काइ नाइ—धुनी कुठं पेटवल्यै, हिकडं घरीं कीं म्हादूनानाकडे ? असं वाटलं कीं सांगावं, रांडेच्च्या, तुझं घर पेटवून धुनी केल्यै ! पण रागवायचं नाहीं !"

"तें असूं द्या हो ! करावं तसं भरावं ! कशाला सोंगासारखी दाढी वाढवल्यै ? लोक चेष्टा करणार नाहींत त काय ? मी काय म्हणत होत्यें—"

"काय ?"

"एकदां कुशात्त्याकडे जाऊन या कीं."

"कां ?"

"भारी थकल्यै."

"असं का ?"

"नाहीं—तशी हुशार आहे अजून. पण आपलं जाऊन यावं."

"उद्यां गेलों त चालेल ना ? का आजच्च जायला हवं ?"

"चालेल कीं !"

रात्रीं ह्यांना सांगेन म्हटलं. पण बंदरावर होता सत्यनारायण. भजनबिजन आणलीं होतीं दाभोळेहून. तिकडे गेले होते. रात्रीं केव्हां येऊन झोंपले कांहीं कळलं नाहीं. म्हणून मग तें तसंच राह्यलं. सकाळीं गणूभावजी म्हणाले,

"वहिनी, घड बघ कोणते झालेत ते, नाहीं तर कापल्यावर म्हणशील, का कोवळाच्च कापला."

"बघायचं काय भावोजी? तुम्हीच्च पहा नि कापा."

"नाय रे बा! मला नाय त्यांतलं कांहीं उमजत."

केळीं कोणतीं तयार झालीं तें दाखवायला बागेंत गेल्यें. माझ्या मागं आबा धावला, नि पाटांत पाय घसरून पडला. भोकांड पसरलन्. त्याला उचलून कडेवर घेतला, नि अशी गणूभावजींकडे वळत्यें, तेवढ्यांत व्यंकूभावजींकडली कांडपीण आली हाका मारीत—

"व्हयनीबाय्—ओ व्हयनीबाय्—"

"कां गो पुतल्ये?"

"हाव् खंय्?"

"ही बागेंत आहें गो!"

"भावजी खुटं हायेत?"

"ते सुंभ वळताहेत अंगणांत."

"च्चला."

"कुठं?"

"येंकूदादांनीं बलीवलांय्."

"येंकूदादांनीं? तें गो कशाला?"

"कुसात्त्या गेली!"

"हा रांडेच्च्ये! म्हणत्येस काय?"

"हाय त्यें म्हनत्यें!"

तशी निघाल्यें, नि यांना म्हटलं,

"हिकडे याल का?"

"कां गो?"

"कुशात्त्या गेली हो!"

"केव्हां?"

"आत्तांच्च. पुतली आल्यै सांगायला. हें पहा, कालच्च मला बोलावलं होतं

तिनं. नि सांगितलंन्, कीं माझ्यामागं हें सगळं रंग्याचं—"

"उघडच्च आहे—"

"नाहीं, पण वेवस्था आपण पाह्यच्यैय्."

"तुला तरी सवेच आहे श्राद्धं विकत घ्यायची! तो व्यंकू तिचा चुलत पुतण्या. तो जवळचा का आम्ही जवळचे?"

"अहो, पण ती बोलल्यै!"

"करा काय हवं तें! पण तें मग पहातां यील. अगोदर तिची गत लावाला हवी. तूं नको जाऊंस. आईला जाऊं दे."

"नको म्हणून कसं चालेल? काल मुद्दाम जर त्यांनीं बोलावलं होतं—"

"काय वाटेल तें करा!"

सासूबाईहि जा म्हणाल्या. मग आबाला ठेवलं त्यांच्याजवळ नि निघाल्यें.

तोंवेरीं जोशी, ठोसर, दत्तूअण्णाचा हरी, फौजदार, शंकर—सताठ जण गोळा झाल्ते. कुशात्त्याच्या कांडपिणी रडत होत्या. गडी म्हणत होता,

"अशी बाय् दिसायची न्हाय! लय माया क्येली माज्यावर!"

पण रंग्या?

तो आपला अंगणांत उकिडवा बसून टकाटका सगळ्यांकडे बघत होता! आई गेली, हें त्याला कळायचं कसं?

गुजाभावजी आले, नि सरळ रंग्याजवळ गेले. त्याच्या पाठीवर हात फिरवून म्हणाले,

"रडायचं नाहीं हां रंग्या!"

"नाहीं."

"आम्ही आहोंत सगळे."

"हो. मला मोदक फार आवडतात!"

फोजदार दांत काढीत म्हणाला,

"आयशीच्या सरणावर मोदकच शिजवाचेत आतां अहो किल्लेदार!"

दोघेचौघे हसले. त्यांचं पाहून रंग्याहि हसला!

व्यंकूभावजी म्हणाले,

"अगदीं अचानक गेली हो! काल संध्याकाळीं विच्यारलं, झोपायला येऊं का, तरीं नको म्हणाली. नि गडी येऊन सांगायला लागला रात्रीं छातींत भारी दुखतांय् म्हणून! कुठं येऊन शेकण्यासाठीं विटेचा टोला तापत घालतों तों

आपली थंड ! आरडली नाहींऽ—ओरडली नाहीं !"

"भाग्यवान् होती बिचारी !"

तिला उचललीं, तेव्हां मात्र रंग्या बावचळला. तो उठला धडपडत, नि ओरडायला लागला.

"आईऽ ! आयो गऽ ! अगो खालीं उतऽर ! वर काय निजल्यैस ! हे तुला घेऊन चाललेत मुंबैला ! अगो उडी मार !"

गुजाभावजींनीं पटकन् धरलीं रंग्याला. हे म्हणाले,

"गुजा, तूं थांब त्याला धरून. तो कांहीं तिथं यायला नको."

जोशानं मध्यें तोंड घालीत म्हटलंन्,

"नको कसा ? हवा. अग्नी कोण देणार ?"

"दील कुणीतरी. हा येडा का द्यायचाय अग्नी ?"

"नको नको ! मी धरून ठेवतों याला. तुम्ही व्हा पुढं."

ते निघाले नि जें कांहीं रंग्यानं तारांगण घातलं आहेन् ! आरडला काय, ओरडला काय, गुजाभावजींच्या तोंडावर थुंकला काय ! बरं झालं, त्यांना त्यांच्या गुरुमहाराजांनीं शपथ घातली होती. नाहीं तर ते कांडातच काढायचे त्याचं.

मी सारवून नि दिवा ठेवून बाहेर आल्यें. गुजाभावजी रंग्याला धरून बसले होते. त्यांना म्हणाल्यें,

"भावजी, बाकी कठीण आहे हो ! आतां तुम्हांला मदत करायला हवी आम्हांला !"

"कशासाठीं ?"

"रंगूभावजींना सांभाळायला—कुशात्त्यांनीं मला काल्च सांगितलं, हें सगळं आम्हीं करायचं म्हणून."

"खरं ?"

"मी खोटं का सांगेन ?"

"नाहीं. तेवढी धास्ती नाहीं. गांवांत विश्वास ठेवण्याजोगी एक तूंच आहेस वहिनी. म्हणून तुझ्यावर टाकलान् भार कुशात्त्यानं."

"मग कराल ना मदत ?"

"हो, करीन बापडा !"

मग उठून काय काय आहे घरांत तें उगीच पहायला लागल्यें. सगळं कांहीं होतं. कुशात्त्या मोठी टापटिपीची बाई हेंच खरं.

मंडळी परतली. दिव्याचं दर्शन घेतलं, नि क्षणभर टेकले. व्यंकूभावजी म्हणाले,

"गुजा, त्याला तेवढा माझ्या ओसरीवर पोंचवताहेस का?"

"कशाला?"

"हें घ्या!—कशाला म्हणे! डोसक्यावर बादलीभर पाणी ओतून त्याच्या पोटांत दोन घास घालायला नकोत?"

"तूं कांहीं काळजी करूं नकोस."

"छान! मी नाहीं तर कोण करायचा? गांवचा म्हार?"

"म्हार नको सध्यांच. आहेत माणसं. कुशात्त्यानं जिच्याकडे सोंपवलं आहेन् सगळं, ती करील!"

"कुणाकडे सोंपवलं आहेन्?"

"अंबावहिनीकडे. तिची ती समर्थ आहे!"

"ऐकलंस गोप्या! तूं होतास ना काल संध्याकाळीं?"

"होतों तर!" जोशी विडी पेटवीत बोलला. तो व्यंकूभावजींची बायको लुळी झाल्यापासनं रोज त्यांच्या घरीं पुजेला जायचा. "मींच ना सही केल्यै?"

"कशावर?"

"कागदावर."

"कसला कागद?"

"इष्टेटीचा."

"कुणीं करून दिला?"

"कुशात्त्यानं. काल संध्याकाळीं केलान्. गोप्याची सही आहे. शिरपत्या करंबेल्याचा आंगठा आहे. फोजदाराला बोललोंय् मी काल रात्रीं. अहो फोजदार, बोला कीं!" व्यंकूभावजी हेल काढीत बोलले.

"होऽ हो! बोललाएस."

कागद? कुशात्त्यानं? माझा विश्वासच बसेना. मीं विचारलं,

"काय लिहिलंय् भावजी कागदांत?"

"पुष्कळ लिहिलंय् वहिनी. तुला नाय कळायचं तें. म्हादेवाला कळेल."

गुजाभावजी बोलले,

"कुठाय् तो कागद? तिला न कळलं, तरी मला कळेल. पाहूं?"

व्यंकूभावजींनीं खिशांतून पाकीट काढीत म्हटलीं,

"मला वाटलंच होतं हें असं होणार म्हणून. तेव्हां म्हटलं कागद जवळ ठेवावा!"

"दे हिकडं!"

"तुझ्या हातीं नाहीं द्यायचा मी. म्हादेवा, ये बाबा. पहा. यांत म्हटलांय्, घरादाराची नि शेतीची वेवस्था व्यंकटनं पहावी. रंग्या आहे तोंवेरीं त्याला सांभाळावं. त्याच्यामागं व्यंकट मालक."

"केव्हां केलंन् हा कागद?"

"सांगतांय् ना? काल संध्याकाळीं. शिरपत्या करंबेला—त्याच्या नि गोप्या जोश्याच्या समक्ष."

मी उसळून म्हणाल्यें,

"खोटं आहे हें!"

"खोटं कसं वहिनी? आंगठा उटवलं आहेन् कुशात्त्यानं!"

"पाहूं!"

मीं कागद पाहिला. त्याच्यावर एक होती सही, नि दोन होते आंगठे! झालं. नि मग मला कशाला सांगितलं होतंन्?

हे उठत म्हणाले,

"झालंय्च सगळं. आंगठाच दिलाएन् तिनं. दोघे साक्षीदार आहेत. तिनं तरी बरोबरच केलंन्. व्यंकू तिच्या जवळचा. हिला कांहीं तरी भ्रमांत बोलली असेल. बराय् व्यंकू, सांभाळ हो रंग्याला!"

"सांभाळ म्हंजे? अरे, माझा चुलत चुलत भाऊच नव्हे का तो? मी हाल कसे करीन? तुम्ही आहांत ना चारचौघे अजून गांवांत? एवढा कांहीं निःस्संग झालों नाय मी!"

"सांभाळशील हो! व्यंकू, नि तूंच सांभाळायचास त्याला. रंग्यामागं संपलं एक घर. उठलं म्हणायचं!"

"हरीची इच्छा!" व्यंकूभावजी उठत म्हणाले. त्यांनीं रंग्याला धरलं, नि घराकडे चालवलं.

मी, हे नि गुजाभावजी तिघं घरीं निघालों. अगोदर गुजाभावजी बोलेनात, नि एकदम थांबून म्हणाले,

"म्हादेवा, हा कागद खोटा आहे!"

"तूं तरी असा आहेस गुजा!—त्यावर दोघांच्या साक्षी आहेत त्या?"

"कुणाच्या? गोप्या जोशी नि शिरपत्या ना? दोघेहि रांडेचे हरामखोर आहेत. व्यंक्याचे भागीदार आहेत ते."

"कांहींतरीच बोलताहेस तूं गुजा."

"तूं कांहीं सांगूं नकोस म्हाद्या! लेका, भोटमामा तूं—बनवलंन् तुला व्यंक्यानं."

"मला?"

"हो तुला! खोटा कागद करून रांडेच्या रंग्याची इस्टेट घशांत घालतोय्."

"अरे, पण तिचा आंगठा आहे ना?"

"तेंच त मला कांहीं कळत नाहीं. वहिनी, तुला काय गो बोलली होती?"

"मला म्हणाल्या होत्या, भाऊबंद गिळंकृत करतील, म्हणून तुम्हीं सगळं पाह्यचं."

"फिरली असेल बुद्धि. गुजा, आपल्याला तरी लोभ करून काय करायचाय् नसत्या गोष्टीचा? नि व्यंकू समर्थ आहे—तो सगळं नीट करील."

तेवढ्यावरच थांबली ती गोष्ट. पण माझ्या पोटांतली मळमळ कांहीं केल्या थांबेना. घरीं आल्यें, तर बनूवन्सं माझी वाट पहात बसल्या होत्या.

"केव्हां आल्यात हो? पोंचवायला कोण आल्तं?"

"हेच आल्ते दाभोळेपर्यंत. ही अशी आल्यें नि म्हटलं अगोदर तुम्हांला भेटून यावं."

"मुलगी कुठाय?"

"झोपल्यै. झोपवून आल्यें तिला घरीं."

बनूवन्संचं सासर होतं श्रीवर्धनास. बरेच दिवस यायच्या यायच्या ऐकत होत्यें. मला मोठं बरं वाटलं. कोणी तरी सखीपार्वती पाह्यजे होती अशा वेळीं. नेमक्या त्या वेळेवर आल्या.

घरांतलं आवरलं, नि आम्ही दोघी माडीवर जाऊन बोलत बसलों. आक्की, आतेसासूबाई, कुशात्त्या—सगळं त्यांना सांगितलं. त्याहि म्हणाल्या,

"वहिनी, मला गांवाचं लक्षण कांहीं बरं दिसत नाहीं. लहानपणीं किती मज्जा होती नाहीं?"

त्यांची मुलगी उठली, नि रडायला लागली. तशीं त्या निघाल्या. मीं म्हटलं,

"बनूवन्सं, रात्रीं झोपायला या कीं! पुष्कळ बोलायचंय्."

"यीन. मलाहि खूपसं सागायचंय्."

रात्रीं आम्ही दोघी एकमेकींना चिकटून झोपलों. माझा आबा नि बनूवन्संची पोर, दोघं दुशीकडे निजवलीं. आज पाण्याची रात्रीची पाळी होती. हे नि गणूभावजी दोघेहि बागेंत पाणी फिरवीत होते. पाळी बदलून ते दोघे आले, तरी आमचं कुचूकुचू चाललंच होतं. किती बोलूं नि किती नाहीं, असं झाल्तं आम्हांला.

हे फावडं ठेवीत म्हणाले,

"बन्ये, उद्यांला थोडं शिल्लक ठेव हो!"

"तुझ्या रे कां पोटांत दुखतंय् आम्ही बोलतों म्हणून?"

"नाय बा! माझ्या पोटांत कशाला दुखेल?"

दोघे झोपले, नि थोडक्या वेळांत घोरायला लागले.

असा बाराचा सुमार असेल—अंगणांत कांहीं तरी खसखस झाली. मी म्हणाल्यें,

"कोण तें?"

कुणी तरी फिसफिसलं,

"व्हयनीबाय!"

"कोण गो?"

"मी धर्मी. मोठ्यानं आरडूं नका! हंइसर या—"

धर्मी तिरमख्याची तिसरेपणाची न्हावेराची बाईल. तिरमख्या म्हंजे व्यंकूभावजींचा गडी. तो म्हणे खूप मारायचा तिला.

मी नि बनूवन्सं, दोघी अंधारांत पुढं झालों. समोर पफनसाचा ओटा होता, त्यावर बसून ती म्हणाली,

"या कोन?"

"यादोनानांची बनू मी."

"मीं न्हाय बा वलिकली!"

"काय सांगत्येस?"

ती काचकुचायला लागली. मी म्हणाल्यें,

"काय असेल तें सांग. बनूवन्सं नि मी दोघी एक."

"अशा जवल या!"

आम्ही दोघी तिच्याजवळ सरकलों. तिच्या तोंडाला मासळीची घाण येत होती. नाक दाबून आम्ही ऐकायला लागलों.

"झालं काय, रातीं माजा घो झोपायला होता खोताकरं!"

"म्हंजे व्यंकूभावजींकडे?"

"व्हय्. मी बी व्हयनीजवल झोपली होती. शीक हाय ना! झाराबी इंतरुनांतच होतो. म्हनून खोत म्हनतात कसे—धर्म्ये! त मीं म्हनली वो! त म्हनालऽ, तुजी खोतीन शीक हाय, झोपाया येत जा."

"समजलं ग! पुढं सांग."

"सांगत्यें ना! त असा रातीं बारा वाजतां कुसात्त्याकरला सुभान्या इला बोलवाया. पलत पलत इला. तशीं खोत नि माजा घो, दोघे निंघाले. माजा इच्यार असा, का काय झालं ते इच्यारावा. त म्हंतात कसे, तुला का करायचाय्? पन माज्याच्यानं का ऱ्हावताय्! त्या दोगांच्या मांगून हल्लूच मी निगाली. ते आंत गेले, मी कुपाटींतून आंत गेली, नी खिरकीशीं हुबी ऱ्हायली. त खोत म्हंतात, रे ही त मेली! जा पल, घरून कागुद अन शाई आन! आतां माज असां समजना, का कुसात्त्या मेली, त कागुदशाईचा कसला औशद? घो आला कागुदशाई घेऊन. त खोतांनीं केलां कसा—का कुसात्त्याच्या आंगठ्याला शाई लावली, नि तो कागुदावर उटवला!"

"रांडेच्च्ये! म्हणत्येस काय?"

"व्हयनी, तुमची शिप्पत! मी खोटां कशाला सांगल? मग बराच येल दोघांचां बोलनां चाललां हल्लूहल्लू. ते निंगाले, तशी मी पलाली, नि जाऊन झोपली."

"नि आत्तां कशी आलीस?"

"आज रातीं माजा घो पिऊन इला. नि मला मारून म्हंतो कसा, की मी दुसरां ऱ्हावेर करीन, नि तिच्या गल्यांत सोन्याच्या पुतल्या घालीन! मीं इच्यारलां, तुज्या ढुंगनाला लंगोटी ऱ्हाय, नि पुतल्या खंइसून मिलनार? तो म्हनला, खोत देनार! मला आला राग. त्याला झोपूं दिला, नि मी हकरं धावली. जात्यें आतां!"

"थांब धर्म्ये! हें यांच्याजवळ सांग!"

"खोतांजवल? कर्मा माज्या!"

ती उठली, नि अगो अगो म्हणतां म्हणतां अंधारांत दिसेनाशी झाली!

"अस्सं! असा रचला काय डाव? मेल्यांनो! कुठं भोगाल म्हणावं! बनूवन्सं, आतां काय करायचं?"

"करायचं काय! सकाळीं धर्मीला बोलावून म्हादूदादाच्या तोंडावर सांगायला लावायचं!"

ꕥ ꕥ ꕥ

सकाळीं ही तोबा गर्दी आमच्या अंगणांत. म्हातारे दामूअण्णा, दत्तूअण्णाचा हरी, ओणीचा शंभुशेट, मन्या भंडारी, आमचे गडी, बगाराम ठोसर, येसदाचे तिघे लेक—नि विचारूं नका! सगळे म्हणताहेत,

"आतां कांहीं भरंवसा राहिला नाहीं कुणाचा!"

"हा करना तर आक्रीत झालं!"

गुजाभावजी आले. सगळं ऐकलीं त्यांनीं, नि मांडा टोकून बसले. ओठ चावीत म्हणाले,

"सद्‌गुरुनाथ—सामर्थ्य द्या! येतोय्—येतोय्! त्याच्याशीं लढायची शक्ति द्या!"

डोंबलं सद्‌गुरुनाथाचं!

दामूअण्णा म्हणाले,

"येताय् का नाहीं गणू?"

"यील तर! तो धर्मी नि तिरमख्या, दोघांना आणील खेचाटीत!"

"दोघांचौघांना धाडायचं!"

तेवढ्यांत गणूभावजी आले. हांपत हांपत म्हणाले,

"ये ना रांडेच्ची! तिरमख्यानं बडवलीन् धरून!"

"मग?"

"मीं म्हटलं, येताहेस का कसं काय? पोलिसला बोलावूं? बेड्या घालून नेतील कापाला! त मग तिरमख्या हातापायां पडायला लागला. म्हणे, आत्तां येतांय् खोताकडे जाऊन."

"व्यंक्याकडे? झालं!"

पण तेवढ्यांत तीं दोघं वाटेवर चमकलीं. दामूअण्णा म्हणाले,

"अंबे, तूं नि बनी, दोघींनींहि ऐकलांय् ना गो?"

"हो तर!"

तिरमख्या आला नि खांबल्याशीं बसत घाम पुशीत म्हणाला,

"दोन बैलांच्या टकरींत माजां गरिबाचां मरान!"

धर्मी लांब बसली मातीशीं खेळत. दामूअण्णांनीं हांकारलीं,

"धर्म्ये, हिकडे ये."

"हंइसरच बरी हाय."

"ये रांडेच्च्ये—तुला का खातांय् कुणी हितं?"

"मी नाय येत!"

"बरं. तिथूनच सांग. खरं खरं सांग. काय काय गो झालं?"

हातांतला खडा फेकून देत धर्मी म्हणाली,

"तां मना न्हाय् ठावां!"

"ठावां न्हाय् म्हणून का चालतंय्? रात्रीं तूं या दोघींना काय काय सांगितलंस तेवढं सांग म्हणजे झालं."

"रातीं? कवां?"

शाब्बास! ब्रनूवन्सं पुढं झाल्या, नि म्हणाल्या,

"काल रात्रीं! काल रात्रीं तूं आम्हांला जें सांगितलंस—"

मख्खपणानं केसावरून हात फिरवीत एक काडी मोडून धर्मी म्हणाली, "तां मना वो काय म्हाईत ब्राय? मी तुमाला न्हाय वलखीत."

पदर खोचीत मीं पुढं होऊन म्हटलं,

"मला तर ओळखत्येस ना? रात्रीं तूं नाहीं म्हणालीस, कीं व्यंकूभावजींनीं—"

"नाय ब्रा—रातीं मी इलीच न्हाय हंयसर! मी कशाला यन हो ब्राय? माजा डोस्का दुकत होता रातीं."

"मेल्ये! तूं आली नव्हतीस रात्रीं?"

"नाय वो व्हयनीब्राय्."

संतापाच्या भिरभिरींत तरातरा गेल्यें पुढं, नि तिचा हात हिसडीत म्हटलं,

"खरं सांगत्येस कीं नाहीं?"

मीं तिचा हात धरला, नि ती जी ठो ठो बोंबलायला लागली!

"अगो माझी ब्राय ती! खाल्लान् मला खोतनीनं!" नाना परी!

हे ओरडले,

"अगो सोड तिला! मारत्येस का काय?"

"मारायला माझ्या अंगावर कांहीं मांस नाहीं आलं. पण ही खोटं बोलत्ये—"

"सोड—वेंधळ्या कुठच्या! कुणीं तरी कांहीं तरी सांगितलं! झोपेच्या तारेंत ऐकलं, नि लागल्या उगीच तोंडीं फुटेल तें बोलायला! तो केवढा माणूस!

आज त्याच्याविरुद्ध बोलायचं म्हंजे हात हात दांत पाहिजेत!"

"तिच्यावर कां आरडताहेस म्हादूदादा? मीहि होत्यें रात्रीं."

"तूंहि त्यांतलीच!"

एवढा वेळपावेतों बनीची आई तोंडाला पदर लावून ऐकत उभी होती आपल्या दारांत. ती बनीला हांक मारीत म्हणाली,

"बन्ये, हिकडे हो बघूं तूं! घरचं खायचं, नि लोकांकडून वेंधळी म्हणवून घ्यायचं—"

"अगो पण आई—"

"तूं हिकडे हो अगोदर! ऐकत्यें मी केव्हांची—दुसऱ्याच्या मुलीला वेंधळी म्हणतांना कांहीं वाटलं पाहिजे! आम्ही कांहीं कुणाच्या घरचं खात नाहीं. मरेमरेस्तोंवेरी कष्ट करत्यें, नि घालत्यें तुम्हांला! मेल्यांनो, म्हणावं, बनीच्या लग्नांत तरी यायचे होतेत कुणी मदतीला! तेव्हां कुत्रासुद्धां फिरकला नाहीं, नि आतां—"

हें एक तिसरंच पेटलं! त्यांतच तिरमख्या म्हणाला,

"मी जाऊं काय खोतांनो?"

"जा जा! तूंहि खप तिकडे, नी तुझ्या नवरीलाहि घेऊन जा! काय शिंचा त्रास आहे!"

सगळे एकेक उठून गेले. गुजाभावजी मात्र जे मिटल्या डोळ्यांनीं बसले होते, ते कांहीं डोळे उघडले नाहींत त्यांनीं. हे म्हणाले,

"अहो ध्यानस्थ ऋषी, उठा कीं आतां! बरं झालं बाबा तूं लग्न नाहीं केलंस!"

भावजी उठले, नि ह्यांच्याशीं शब्द न बोलतां आंत माझ्याकडे आले. आबा रडत होता, त्याच्या पाठींत एक धबका घालून मी म्हणाल्यें,

"तुला काय झालंय् रडायला?"

"त्याला कां मारतेस वहिनी? इकडे ये बघूं!"

"मला नाहीं वेळ!"

"रागावूं नकोस वहिनी!"

टचकन् डोळ्यांत पाणी उभं राह्यलं माझ्या. म्हणाल्यें,

"एक शब्द कांहीं कुणी खरा मानायला तयार नाहीं—"

"अगो, मी मानतों ना?"

"उपेग काय? तुम्ही कानांत रुद्राक्ष घालून बसलेत!"

"तूं सांग बघूं काय काय झालंय् तें."

मीं सगळं सांगितलं. सासूबाईहि म्हणाल्या,

"गुजा, कांहीं तरी करायला हवं हो! आमच्या म्हाद्याच्यानं कांहीं व्हायचं नाहीं!"

ताड्दिशीं गुजाभावजी उठले. म्हणाले,

"वहिनी, घरांत खायला आहे का कांहीं?"

"इश्श! नसायला काय झालं? देऊं?"

"बांधून दे."

"निघालांत कुठं?"

"कापास जातों. ओक वकिलाकडे. त्याला सगळं सांगतों. मामलेदार, जड्ज, सगळे त्याच्या मुठींत. त्याच्याकडून लावतों व्यंक्यामागं दट्ट्या!"

"जा बाबा! कल्याण होईल तुझं, रंग्याचं एवढं केलंस तर."

मीं गूळ नि अधलीभर पोह्यांची पुरचुंडी बांधून दिली. व्यंकूभावजी म्हणाले,

"एवढेच्च का? बरं, असूं दे. होतील जातां जातां तोंडांत टाकायला!"

"हा मेल्यांनो! तुझ्या पोटांत का राक्षस आहे काय गुजा!"

गुजाभावजी गेले. दिवसभर यांचं तोंड सुरू होतं. वेंधळ्या, वेंधळ्या, हजारदां म्हणून झालं. त्यांचं ऐकून आबा दिखील मला वेंधळी म्हणाला. गणूभावजी त्याच्यावर कावले,

"आब्या—गुलामा, चापट खाशील हां! वहिनीला वेंधळी म्हणताएस काय?"

"त्याचा काय अपराध आहे भावजी? पोर तें. मोठ्या माणसांनींच सांभाळून बोलायला हवं!"

संध्याकाळीं शारदा नि दत्तूअण्णाची सून आल्त्या. त्यांच्यापाशीं पुनः पाढा वाचला, नि म्हणाल्यें,

"गेलेत गुजाभावजी कापास. ते कांहीं तरी केल्याशिवाय का येणारैत?"

"हो बाई! आमच्या गांवाला किनई—"

"बाई, पण सकाळीं अजिबात कशी हो फिरली धर्मी?"

"देवाला माहीत!"

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं गुजाभावजी परतले. आबा गाणं गर्जत आला,

" दाढीवाले-काका आले!"

" मेल्या! दाढीवाले का म्हणताहेस त्यांना?"

मी नि सासूबाई लगबगीनं बाहेर आलों. गुजाभावजी झोपाळ्यावर घाम पुशीत बसले होते. मला पाहून मलूल आवाजांत म्हणाले,

" पाणी आण वहिनी."

तांब्या हातीं देत मीं विचारलं,

" काय झालं भावजी?"

" सांगतों."

घळाघळा तांब्या रिचवला वरून, नी मग तोंड पुशीत म्हणाले,

" सगळे रांडेच्चे एकास एक सामील! मामलेदार काय, जड्ज काय नि ओक वकील काय—"

" झालं काय तें तरी सांग."

" सांगतांय्. हितून निघालों, तो थेट कापदापोलीस नाक्यावर जाऊन टेकलों. तिथं गोखला राहातो शेजारीं, त्याच्याकडे पाणी प्यायलों, नि ओक वकिलाकडे गेलों."

" भेटले का घरीं?"

" नव्हता. कल्बांत गेला होता पत्ते कुटायला. घरीं आला, त म्हणे कसा, बुवा, आमच्या हितं कांहीं मिळायचं नाहीं, पुढल्या घरीं जा! म्हटलं, रांडेच्या, मला कांहीं नकोय्—"

" रांडेच्च्या का म्हणालास?"

" नाहीं गो! एवढं का मला कळत नाहीं? मी म्हणालों, मी पडघवलीचा गुजा. परसूकाकाचा मुलगा. तशीं मग ओळखलंन्, नि या-बसा केलंन्. मीं सगळं सांगितलं, नि म्हणालों, असा कांहीं तरी पाइण काढा, कीं व्यंक्याचं तोंड फुटलं पाहिजे!"

" हो म्हणावं—चांगलं चेचून काढ! तशीं काय म्हणाला?"

" म्हणाला, कागद् कसला केलाय? बक्षीसपत्र, प्रामीश्वरी कीं गहाणपत्र?— मी म्हटलं, मला नाई बा माहीत. त म्हणे, व्यंक्या कायदेबाज आहे, त्यानं पक्कं काम केलं असेल."

" आंगठ्याचं नाहीं का सांगितलस?"

" सांगितलं तर! त म्हणे पुरावा काय? मी गप्प बसलों. म्हणाला,

पुरावा नसला तर सभ्य गृहस्थाची अब्रू गेली म्हणून अब्रूनुकसानीचा दावा लावायचा तुमच्यावरच!"

"रांडेच्च्यांनो!"

"होऽ! म्हटलं याला उपाय काय? त म्हणे कसा, फिर्यादीच्या भानगडींत कांहीं पडूं नका. पैशाचा पैसा जाईल, नि सिद्ध कांहींसुद्धां व्हायचं नाहीं!"

"मग असंच का गिळूं द्यायचं व्यंक्याला?"

"मींहि त्याला विच्यारलं. त म्हणाला, तुम्ही कुशात्याचे कोण? मी म्हणालों, सताठ चुली आहेत मधें. त म्हणाला, कुशात्याचा जवळचा व्यंकू. तिची इस्टेट त्यालाच जायची. तुम्ही धडपडूं नका!"

"मग?"

"मग उठलों नि मामलेदाराच्या बंगल्यावर गेलों. शिपाई म्हणाला, भेटायचे नाहींत. मी त्याला बाजूस सारला नि आंत शिरलों. मामलेदाराला सांगितलं, मी बुवा नाहीं, पडघवलीचा गुजा. परसूकाकांचा. तशीं हसून म्हणे, काय पाह्यजे? मी सांगायला लागलों. व्यंकूचं नांव निघाल्याबरोबर म्हणे कसा, कायद्यानं काय तें करा. हितं घरीं भेटूं नका. घरीं मी ऐकत नसतों कांहींसुद्धां!"

"मेल्यांनो! मग?"

"तसाच जड्जाकडे गेलों. तो होता तर्र! शब्दसुद्धां ऐकून घेतला नाहींन्— शिपायाकडून बाहेर घालवलंन्!"

"अन् तुम्ही बाहेर निघालांत ना? दोन तोंडांत द्यायच्या!"

"देणार होतों—पण गुरुमहाराजांचं स्मरण झालं नि मुकाट्यानं बाहेर पडलों!"

"छान झालं!"

"मी तरी काय करूं वहिनी? करतां आलं तें केलं मीं!"

त्यांचंहि खरं होतं. दैवच खोटं म्हणायचं नि काय—आमचं नि रंग्याचं!

दुसऱ्या दिवशीं सकाळीं धर्मी टकल्यावरून पाटी घेऊन पदर तोंडाआड घेत दारावरून गेली. तिच्या गळ्यांत पुतळ्यांची माळ चमकत होती!



पऱ्ह्याच्या पलीकडे ओणींत आमच्या बांधाच्या वर मोऱ्यांच्या बागा होत्या. अर्जुना मोऱ्या म्हंजे खातंपितं घर. एका पंक्तीला त्याच्या घरीं साठसत्तर माणूस

जेवायचं, एवढं मोठं कुटुंब. म्हातारा होता तोंवरीं त्यानं बागा कशा तुकतुकीत ठेवल्या होत्या.

मामंजींच्या वेळीं यायचा. म्हणायचा,

"खोता, तुजी माजी होड!"

"कशांत रे?"

"सरशी बाग कुनाची—तुजी का माजी!"

"अर्जुना, तूं जिंकलास हो! पाह्यजे तर लिहून देतों. अरे, तुम्ही हाडाचे कुळवाडी. रात्रंदिवस त्यांत खपायचे. जल्मायचे त्यांत, नि शेवटीं हाडंहि त्याच मातींत मिळायचीं तुमचीं. तुझी नि माझी का बरोबरी व्हायच्यै?"

पण म्हाताऱ्यामागं पोरांनीं आपसांत भांडून बागांची माती केली. केवढाल्या बागा होत्या! पण आतां एकेका पोफळीला अदपाव सुपारी कांहीं पडायची नाहीं.

ओणींतच एक मुसुनमानाचं घर. हैदरचिच्या त्याचं नांव. म्हातारा सत्तरीच्या पलीकडे उभा होता, तरीसुद्धां अजून ओणींतून सकाळीं न्याहारी करून निघायचा, तो सबंध डोंगर हिंडून, पडघवलीचं शिवार पायांखालीं घालून मग घरीं परतायचा. हिंडल्याशिवाय त्याला चैनच पडायचं नाहीं.

लहानपणीं मारामारींत त्याचा एक डोळा फुटला होता. तरी त्या एकाच डोळ्यांत सुरमा घालायचा तो. कपाळाचा मधला भाग नमाजाच्या वेळीं टेकून टेकून काळा झाला होता.

कधीं कधीं तो आमच्या घरीं यायचा. लहानपणीं आम्हांला त्याचं भय वाटे. दाढी नि त्रिढी पाहून गणूभावजी दुर्गावन्संना म्हणायचे,

"दुर्ग्ये, हैदरचिच्याला न्यायला सांगेन बरं का तुला!"

हैदरचिच्याचं नांव निघालं, कीं तेवढ्यापुरता मुलांत समेट व्हायचा. पण मोठेपणींउ मगलं, कीं दिसतो तेवढा कांहीं हैदरचिच्या वाईट नाहीं. आपला आवाजच त्याचा पावटे भरडल्यासारखा आहे, एवढंच काय तें.

त्या हैदरचिच्याचा नबी आफ्रिकेंत गेला, नि तिकडून येतांना दोन बायका नि खूप पैसा घेऊन आला. ऐकोवेकीं असं होतं, कीं त्यानं चोरून मणभर सोनं आणलं पडावांत लपवून. खरंखोटं त्यालाच माहीत. तर त्यानं मोऱ्यांच्या बागा सगळ्या एका लाटांत खरेदी केल्या.

एका दिशीं सकाळीं आमचा गडी बांधांतलं नि पाटांतलं गचपण काढून आला, नि सांगायला लागला,

"गनूखोत, आपल्या बांधाच्या वर आसरांचा खडक हाय्—"

"काय झालं त्याचं?"

"त्याच्यावर मुसुनमान सवताचा बांध घालताय्."

"नवा?"

"हो! त्याच्या बागांना पानी नको?"

"मग ओणीच्या पाटांतून घे कीं म्हणावं!"

"मिनीं इच्यारलं, त म्हंताय् कसा का माजा पेशल बांद!"

"नि मग आमचं पाणी कमी होईल तें?"

"तां बगा तुमचा तुमी. पक्का काम करनार शिमिटचा."

"खरं क्काय? रांडेच्च्या!"

गणूभावजी धावत धावत बांधाकडे गेले, नि पहातात तों खरंच! परतले, नि यांना सांगायला लागले,

"म्हादूनाना, अरे खरंच शिमिटचं काम करतोय्!"

"करीना कां!"

"अरे पण आपलं पाणी?"

"पाणी? पाणी नाय् जात रे कुटं!"

"जात नाय् कसं? जाणार—"

"गणू, तुझ्यापरीस दोन पावसाळे ज्यास्ती गेलेत माझ्यावरून. अरे, आज नाहीं म्हटलं तरी तीनशें साडेतीनशें वर्षे पऱ्ह्या पाणी देतोय् आपल्याला. कधीं थेंबभर कमीज्यास्ती झालं असेल तें माला म्हणायचं नाहीं; पण आपल्या पऱ्ह्याला आपल्या वरच सात बांध आहेत. त्यांत हा आठवा. बांधीना कां बांधताय् तर!"

गणूभावजी माझ्याकडे कुरकुरत आले. म्हणाले,

"वहिनी, आतां आपलं पाणी आटणार!"

नि मग दोघां भावांतली बोलीभाषा सांगून म्हणाले,

"अगो, पक्कं शिमिटचं काम करतोय् तो! बघ एक थेंब आपल्या बांधांत उतरला तर!"

कुसाच्या प्रकर्णापासून आमचं घरांतलं बोलणं जरा कमीच झाल्तं. आपलं जितक्यास तितकं. मलाहि रागच आल्ता यांचा. म्हंजे आम्ही घरच्या त्या वेंधळ्या! नि बाहेरचे व्यंकूभावजी ते तेवढे खरे! कसं माणूस परधार्जिणं होतं! म्हणतात ना, त्यांतलं!

तर मीहि बोलायची नाहीं, तेहि बोलायचे नाहींत. विचारलं, तेवढ्या प्रश्नाचं उत्तर दिलं, बाजूला झालं. म्हणून मींहि गणूभावजींकडे कांहीं फारसं लक्ष दिलं नाहीं. म्हणाल्यें,

"भावजी, ते तुमचे भाऊ नि तुम्ही--काय हवा तो गोंधळ घाला. मला काय? पाणी आलं, त सैंपाक करून वाढीन. न आलं, तर तुम्ही उपाशी, मी उपाशी. आबाला घेऊन देवघराशीं चौघडी अंथरून झोपून राहीन खुश्शाल!"

"बघ हो वहिनी—मागून म्हणशील कीं सांगितलं नाय म्हणून—"

"मुळींच नाहीं म्हणायची!"

पण शेवटीं गणूभावजी म्हणाले तेंच खरं झालं!

नबीनं नेमके आमच्या बांधाचे झिरपे होते, तेच अडवलेन्, नि अगदीं मजबूत धरण घातलंन्. किती दूर? नेमकं आमच्या बांधापासून पंचवीसतीस हात वर. आसरांचा खडक धरून त्यानं जें शिमिट ओतलेंन् धरणांत, तें पार अलीकडेपलीकडे. आमचे लोक बावळे. शिमिट ओततोय् त्याचंच कौतुक! पण बांधाचं पाणी अडवून धरतोय्, तिकडे लक्षच नाहीं कुणाचं.

हैदरचिच्या सडा उतरून काठी टेकीत आला नि अंगणांत ओट्यावर बसला. हे दोघेहि घरांत नव्हते. म्हणे,

"सूनबाय्! पानी आन् प्यायला."

गुळाचा खडा नि पाणी घेऊन आल्यें. मुसुनमानांसाटीं कोनाड्यांत एक तांब्या ठेवला होता. हैदरचिच्यानं तो खालीं काढलान्. त्यांत पाणी ओतून मी म्हणाल्यें,

"चिच्या, आजचा दिवस पाणी प्या. उद्यां कांहीं पाणी मागायला येऊं नका."

गूळ खातां खातां हैदरचिच्या म्हणाला,

"कां गो सूनबाय्?"

"नबी बांध घालतोय् ना?"

"लरका ऐकत नाय् माजां म्हन्नां."

"असा कसा ऐकत नाहीं? तुमच्या बागा तेवढ्या कौतुकाच्या. नि आमच्या तेवढ्या सवतीच्या होय?"

डोक्यावर हात फिरवीत चिच्या म्हणाला, "सूनबाय्, तुजांबी म्हन्नां खरा हाय. पर लरका शिरीमंत झाला. बंदुकीचा लैसन कारला. मना म्हंतो, अब्बाजान, तुमाला समजत न्हाय्. चार टैम खावा नि झोपून ऱ्हावा!"

" नि मग पाण्यावरून भांडणं होतील तेव्हां ?"

" होऊं द्ये ! त्याला बी समजलां पायजे, का निस्ता सोनां असलां, तेवऱ्यानं भागत न्हाय. गांवकऱ्यांना धरून ऱ्हायलां पायजे !"

मीं म्हटलं होतं, त्याचं प्रत्यंतर यायला उशीर लागला नाहीं. खरोखरीच पाणी आटलं ! धडपणीं पाण्याची पाळीहि फिरेना झाली.

मग जमले सगळे आमच्या अंगणांत. जोशी पान घशांत कोंबीत म्हणाला,

" गांवाचं पाणी तोडलंन् साल्यानं !"

" मुसुनमानाची जात. आम्ही करू त्याच्या उलटं करायची."

" पण पाणी तर काय उलटं जात नाय ना त्याच्या पाटांत ?"

" म्हणतोस खरं हरी, पण आतां करायचं कसं तें बोला."

" दुसरं काय करायचं ? म्हादूनाना गांवचा खोत. त्यानं जाऊन सांगावं नबीला."

" मीं एकट्यानं ?"

" एकटा कशानी ? आम्ही आहोंत कीं सगळे !"

" नाय् रे बा ! भुताचा घास म्हणून काढाल बाजूला. नि आपण सगळे साल घरोघर."

" अरे, पण गुजा कुठाय् ? तो मारुती बरा होता. द्यायचा या पिरावर गोडून."

" तो गेलाय् सत्याला."

" सत्याला ? सत्ता कुठला काढलंन् आणखीन् ?"

" गोवळकोटला म्हणे त्याचा कुणी गुरुबंधू आहे. तो करतोय् सत्ता. तिकडे लाय् गुजा."

" म्हादू, असं करीनास—"

" कसं ?"

" व्यंकूला बोलावून त्याचा सल्ला घेईनास ! तो काढील एखादा पेंण."

" नाय रे बा ! एक तर त्याचं पाणी सुरू आहे. नि—नि—"

" समजलं. कुसाल्याप्रकर्णच ना ?"

" नाय. तसं काय नाय म्हणा !—अजून त्यांचं माझं बोलणं सुरू आहे. त्वांच त बंदरावर भेटला होता."

भिऊआबा नुसताच बसला होता. तो कानांत कानकोरणं घालीत म्हणाला,

"पण मी म्हणतों करायचा काय व्यंकू? जो दुसऱ्यावरी विश्वासला त्याचा कार्यभाग बुडाला—"

"पण भिऊआबा, नबीशीं भांडायला हे सगळे पुढं काढताहेत मला!"

"तूं एकटा कशाला? सगळेच जाऊं या कीं!"

"कुठं जाऊं या?"

"हैदरचिच्याकडे—"

"म्हंजे वाघाच्या घरांत? नबी चोवीस तास नशेंत असतो! अगदीं विलायती पितो म्हणे."

"मग प्याला तर तुला काय करताय्?"

"अरे, पण बंदुकीचं लैसन काढलं आहेन्!"

"पाहिली हो मीं! छान आहे. दुनळी—काडतुसाची."

"अरे जा बंदुकवाल्या! बंदुकीचं भय वानरांना दाखव म्हणावं. आम्हांला काय सांगताएस? कांहीं कायदा आहे का नाहीं?"

"हें बघ हरी, कायदा राहील पुस्तकांत—"

"अरे पण वादंग कशाला? असं करूं. बांधावरच बोलवूं त्याला म्हंजे झालं." दामूअण्णांनीं तोड काढली. लगेच सगळे बांधावर निघाले.

गणूभावजी म्हशीचं अंबोण कालवीत होते. मीं त्यांना पिटाळलं बांधावर काय होतं तें पाहायला. थोड्या वेळानं धांवत येऊन त्यांनीं हांकारलीं,

"वहिनी! आई ग!"

सासूबाई म्हणाल्या,

"काय रे? भारीसा धांवत आलाएस? सूनबाई, हा आलाय् गो!"

आबाला घेऊन आंत आल्यें, तशीं गणूभावजी म्हणाले,

"कठीण हो! भारी कठीण!"

"झालं काय तें त सांगशील!"

"व्हायचांय काय? फिर्याद करा म्हणाला."

"अरे, पण सगळं सांग कीं!"

"सांगतांय. बोलावलीं भाग्याच्या हातीं, तशीं बऱ्याच वेळानं दोघांना बरोबर घेऊन आला. अगदीं झोकांड्या जात होत्या, इतका लास होता. हातांत होती दुनळी बंदूक—"

"रांडेच्च्या! मग?"

"मग काय? फिर्याद करा म्हणाला!"

"अरे, पण यांनीं सांगू नये?"

"सांगितलं ढीग. ऐकून कोण घेताय्?"

"म्हातारा नाहीं आला?"

"म्हातारा नाहीं येत म्हणे."

"मग? सगळ्यांनीं केलीं काय?"

"फिर्याद कशी लावायची तें ठरवायला व्यंक्याकडे गेलेत."

"मरा मेल्यांनो! आतां हे फिर्याद लावणार, तिच्या तारखा पडणार, मग सहा महिन्यांनीं निकाल होणार!"

"नि बागांचं काय? तोंवेरीं वाळून नाहीं का जायच्या?" मीं म्हटलं.

"जातील त काय! प्यायलासुद्धां पाणी पुरायचं नाहीं."

तसंच झालं. फिर्याद लावली, नि स्वस्थ बसले कर्मावर हात घाशीत.

बागाच मुळीं सुकायला लागल्या, तिथं इतर झाडांना कोण विच्यारतंय्? मामंजींनीं लांबून कुटून वाईकडून बटमोगऱ्याचं एक कलम आणलं होतं. आमच्या परसांत तें खूप वाढलं. भलं थोरलं फूल यायचं. अगदीं मेजकीं दोनच फुलं फुललीं झाडावर, तरी सगळा परस घमघमायचा. तें झाड आतेसासूबाईचं भारी आवडतं.

पाणी नाहीं, म्हणून तें कोमेजलं. पफनशीचीं पानं पडलीं. गुलाबावर तजेला कसा तो उरला नाहीं. शेवंतीच्या रोपांनीं माना खालीं टाकल्या.

आमचंच नव्हे, घरोघरीं तीच परी. शारदाला फुलांची भारी हौस. तिनंहि घरामागं शानदार बाग केल्ती. ती वाळत चालली. भिऊआबानं वांगीं लावलीं होतीं. तीं करपलीं. तोंडलीं, पडवळं, घोसाळीं—ज्यानं ज्यानं जो जो माळवा केल्ता, तो पार सुकत चालला.

म्हशी पऱ्ह्यावर पाणी प्यायला जायच्या. पण वासरांना घरींच पाणी पाजत असूं. आतां त्यांनाहि पऱ्ह्यावरच पिटाळायचं. बनूवन्संकडे एक कालवड लंगडी होती. तिला घरींच बांधून पेंढाकाडी करीत. पाणी नाहीं म्हणून तिला गडी पऱ्ह्यावर न्यायला लागला, तर चोंढ्याच्या बांधावरून खालीं पडली, दुसराहि पाय मोडला!

एऱ्हवीं रोज चार सहा तास हा एवढा धोदाणा वहायचा, तें आतां पिण्यासाठींसुद्धां पाणी पुरायचं नाहीं. हे नि गणूभावजी हंडे घेऊन पऱ्ह्यावरून

डुरींतून पाणी आणायचें. मनमोकळं पाणी वापरायची सवय, तो नुसता कोंडमारा झाला.

एकदां चार खेपा आणलीं, नि म्हणाले,

" केळंबिळं असेल त दे गो एखादं ! तोंडांत टाकून आणखी आणतों चार खेपा."

दोन केळीं नि चार सुके गरे समोर ठेवले. नव्हतं बोलायचं पण बोलल्यें,

" आतां किती दिवस पाणी वाहायचं डोक्यावर ? "

" मग काय करूं ? "

" मी काय सांगूं ! पण बागा वाळून चालल्या—"

" सगळ्यांच्याच चालल्या आहेत."

" देवपुजेला फूल कांहीं मिळत नाहीं."

" केल्यै फिर्याद. ओक वकील दिलाय्. एक महिन्यांत निकाल लागेल म्हणे."

" नि तोंवर हिकडं बागांचा निकाल लागेल तो ? "

" मग काय करायचं ? "

" गुजाभावजी असते तर गप्प न बसते."

" काय केलं असतंन् ? "

" बांध फोडला असता त्यांनीं."

" म्हणजे भांडणच करायचं ना ? "

" ते मागं न सरते."

" नि बंदूक ? तो बंदुकीच्या जोरावर बोलतोय्."

" नुसता धाक घालतोय्. त्यालाहि जिवाची धास्ती असेलच कीं ! तो आपली बंदूक आणतो, तर आपण आपली न्यायची ! "

" हें पहा, आम्हाला नांदायचं आहे सुखासमाधानानं. भांडणं खेळायचीं नाहींत."

" नि गांव सुकूं द्यायचा ना ? "

" आम्हाला कळतंय् तें करतोंय् आम्ही. याहून जास्त कांहीं सुचत असेल तर तुम्ही करा."

दिवसभर तो विचार करीत होत्यें. संध्याकाळीं बनूवन्संच्या आईकडे गेल्यें. त्यांचं मत्त विचारलं. त्या खूप चरफडल्या, नि शेवटीं म्हणाल्या,

" गांव सोडून कुठं तरी पळून जावंसं वाटायला लागलंय्. "

यापलीकडे कांहीं बोलल्या नाहींत. तशीच शारदेकडे गेल्यें. ती म्हणाली,

"पुरुष डोळे झाकून बसले, नि आपण काय करायचं बाई?"

"बांध फोडायचा जाऊन!"

"बायकांनीं?"

"हो! पुरुष नाहीं करीत ना? मग बायकांनीं करायचं."

तोंडांत बोट घालून माझ्याकडे पहात राह्यली, नि म्हणाली,

"शहामत आहे हो बाई तुमची! आमच्याच्यानं कांहीं धीर व्हायचा नाहीं."

तशीच उठल्यें. आमचंच एक कूळ होतं. त्याच्या बायकोचं नांव सगुणी न्हवलकरीण. मोठी बाजिंदी बाई. तिच्यापुढं नवरा कसाबाघरच्या कोकरासारखा वागायचा. सड्यावर तिचं घर. आबाला कडेवर घेतला, नि सगुणीच्या दारांत जाऊन उभी राह्यल्यें.

उडीद भरडीत होती. तोंडानं चालल्या होत्या नवऱ्याला शिव्या. मला पाहिलंन् तशीं लाजली, नि घाईघाईनं उठून पदर नीट करीत, घोंगडी अंगणांत टाकीत म्हणाली,

"आज भलत्या येळीं कुनीकरं व्हयनीबाय?"

"तुझ्याकडेच आल्यें."

"माज्याकरं? नसल्. माज्याकरं नसाल इलां."

"अगो हो! खरंच तुझ्याकडे आल्यें."

"आत्ता करायचां काय बाय! गूळबी न्हाय घरांत—"

"गूळबीळ राहूं दे. इकडे अशी बस बघूं!"

न्हवलकरीण बसली. मला अवेळीं पाहून आणखी दोघीचौघी कुळवाडणी येऊन बसल्या.

मी म्हणाल्यें,

"सगुण्ये, गांव कुणीं वसवला गो?"

तिला कांहीं कळेनाय्. थोडा वेळ इकडे तिकडे करून मग म्हणाली,

"तां मना काय ठावां?"

"म्हंजे असं म्हणत्यें मी, कीं गांवांत रहायला अगोदर कोण आलं?"

तरी कुणाला कांहीं समजलं नाहीं. मीं म्हटलं,

"तुम्हांला नाहीं माहीत त मी सांगत्यें. गांव वसवला सातमायनं. अगोदर सातमाय गांवांत राह्यला आली, नि मागून वस्ती झाली."

हें बरीक पटलं सगळ्यांना. सगळ्या हां हां करायला लागल्या. सगुणी म्हणाली,

“बराबर हाय व्हयनीबायच्चां म्हन्नां. सातमायनीं वसवला गांव. तिचा ध्येवल अदुगर बांद्‌ला.”

“पटलं ना माझं म्हणणं? तर मग गांव उजाड व्हायला लागला, तर कोण धावून यील?”

“सातमाय येनार.”

“सातमायच्च यील. पण स्वतः नाहीं यायची. तिनं मला सांगितलंय्.”

“काय व्हयनीबाय?”

“ती म्हणाली, कीं दोघीचौघींना बरोबर घेऊन जा, नि मुसुनमानाचा बांध फोड.”

“बाय माजी!”

“बाय माजी नाहीं! तुम्ही कोण येणार नसाल बरोबर, तर मी जाणार आहें उद्यां.”

“उद्यां?”

“हो, उद्यां सकाळीं.”

सगुणीला चढला जोर. पदर खोचून म्हणाली,

“व्हयनीबाय, येकली नको जाऊं.”

“मग?”

“मी येनार! सातमायच्चां सांगनां हाय तर गेलां पायजे!”

“मग जाऊं मी?”

“जा. दीस निंगतां यीन मी तुला हांकारायला.”

“अंग धुवून ये हो! नाहीं तर तशीच्च येशील.”

“व्हयनीबाय तरी अशी हाय!—अंगोल करून यीन हो! देवीचां काम हाय!”

घरीं परतल्यें, नि सासूबाईंना तेवढं गुपचुप सगळं सांगितलं. कौतुकानं माझ्याकडं पहात त्या म्हणाल्या,

“पोरी! द्रिष्ट काढून टाकायला हवी हो तुझी!”

अन् दुसऱ्या दिवशीं सकाळीं सगळा कुळवाडवाडा उलटला. रात्रभर सगुणीचं तोंड चाललं होतं.

"माजी व्हयनीबाय जानार सवतां बांद तोरायला. तिला सातमायनीं सांगलां. तवा सगल्यालां गेला पायजे. येनार नाय तिचां वाटुलां व्हईल. सातमाय बगल तिच्याकरं!"

झालं! कुळवाडणी, पोरं, पोरी, सगळ्या निघाल्या बांध तोडायला. सातमायनं सांगितलंय् ना? मग गेलं पाहिजे! बाया निघाल्या, म्हणून मागोमाग बाप्येहि निघाले!

आमच्या घराशीं येऊन सगुणीनं हांकारलंन्,

"व्हयनीबाय!"

तो घोळका बघितला, नि कसं भरून आलं! कांहीं न बोलतां मुकाट्यानं कुदळी घेऊन चालायला लागल्यें. तशीं हे डोळे विस्फारून म्हणाले,

"निघालीस कुठं? नि हीं सगळीं कां जमल्यैंत?"

सासूबाई म्हणाल्या,

"म्हादेवा, हिकडे ये. मी सांगत्यें. ती चालल्यै बांध तोडायला. आतां तुला कांहीं असेल थोडीशी, तर जा तिच्यामागं!"

गणूभावजींनीं हें ऐकलीं, तस्से घरची बंदूक काढली नि माझ्यामागं धावले. हां हां म्हणतां ही गर्दी वाढली. मी पुढं, माझ्यामागं फटाफटा फुटाणे फोडीत सगुणा. तिच्यामागं गांवकरी.

ओणीकरांनीं हा सगळा गलगा बांधावर येतांना पाहिला. नबीला बातमी गेली.

आमचा बांध खालीं टाकून मी आसरांच्या खडकावर चढल्यें, नि शिमिटच्या बांधावर कुदळ घातली. तशीं भराभर कुदळी पडायला लागल्या. बघतां बघतां पडघवलीकडली बांधाची भिंत ढासळली, नि बदाबदा पाण्याचा धोदाणा वहायला लागला!

थोडक्याच वेळांत नबी बंदूक सरसावून धावत आला, नि त्याच्या पाठोपाट हैदरचिच्या. नबी म्हणे,

"माजा बांध तोरला! गोली घालून फुंकून टाकतों!"

हैदरचिच्या पुढं धावला. म्हणाला,

"कुनीं घातली पैली कुदल?"

मी पुढं होऊन म्हणाल्यें,

"मीं घातली!"

दाढींत हात घालीत हैदरचिच्या म्हणाला,

“सूनबाय—तूं?”

“हो!”

“तोबा तोबा! थू पडगवलीकरांनो! आखरी माजी सूनबाय आली, तवां काम झालं!”

त्याच्या पाठोपाठ होता नबी. बंदूक ताणीत म्हणला,

“कोन? कोन साला—”

म्हातारा किंचाळला,

“नबी!”

पण नबी कांहीं ऐकेना. त्यानं बंदुकींत काडतूस घातलंन्. हिकडे गणूभावजीहि बंदूक उचलीत म्हणाले,

“साल्या, तूं बंदूक उचल! कीं ठोकलाच तुला!”

हैदरचिच्याला काय वाटलं कोण जाणे, ताडकन् मागं वळला. नबीच्या खणखणीत तोंडांत सणकावलीन्! थेट इथपर्यंत आवाज आला. नबीच्या हातून बंदूक गळून पडली. म्हातारा कडाडला,

“हरामजादा! साल्याला वाटतांय् का हप्रीकेहून पैसा आनला, त जन्नत मिलला! गांवकऱ्यांशीं कसा बर्ताव करायचा समजत न्हाय्! नि माज्या सूनबायला मारायला चालला! चाल घरीं! चाल, न्हाय तर आनीक एक घेतांय्!”

नबी झोकांड्या खात घरीं परतला.



दोन महिन्यांनीं गुजाभावजी घाईघाईनं पहाटेस आले, नि म्हणतात कसे,

“वहिनी—”

मी मागल्या दारीं सडा घालीत होत्यें. तिथं येऊन म्हणाले,

“म्हादेव कुठाय्?”

“बागेंत आहेत.”

आबा माझ्या पायांत घोटाळत होता. त्याला गुजाभावजी म्हणाले,

“आबा, जा पळ—बापसाला बोलाव तुझ्या.”

“कां हो? कांहीं झालं का काय?”

“म्हादेवाला येऊं दे. मग सांगतों.”

हे, गणूभावजी, सासूबाई—सगळीं आलीं. गुजाभावजी घडवंचीवर बसत म्हणाले,

"काकू, मला सामक्षा घडली!"

"कुणाची?"

"गिरोबाची!"

"खरं काय? बाई माझी ती!"

"काय झालं रे गुजा?"

"रात्रीं कुस्त्या झाल्या, नि पोरं जेवून आलीं घरोघरून. थोडा वेळ भजन केलं, नि झोपलों सगळे. त पहाटेस असा तेजस्वी पुरुष आला माझ्यासमोर. डोईवर भरजरी पगडी. अंगांत बाराबंदी. असा सताठ हात उंच—"

"बाई माझ्या!"

"म्हणे, मी गिरोबा."

"खरं का काय?"

"मीं हात जोडून म्हटलं, बाबा रे, कां आलाहेस? त म्हणे, माझ्याबरोबर चल. निघालों. गिरोबा पुढं नि मी मागं. पहातों तों व्यंक्याच्या दाराशीं आम्ही दोघे उभे! म्हटलं, हितं कां रे बाबा आणलंस म्हाराच्या घरीं? त डोळे वटारलेन्. मी गप्प झालों. थोड्या वेळानं व्यंक्यानं दार उघडलंन्. नि असा नुसता सापळा झालेला रंग्या—त्याला हात धरून बाहेर लोटलंन्!"

"मेल्या!"

"रंग्याच्या पाठीवर होते माराचे वळ!"

"बरं नाहीं व्हायचं रेऽ तुझं!"

"त्याला बाहेर आणलंन् व्यंक्यानं, नि खुंटाला बांधून घातलंन्. कुत्र्याला बांधतात तसा. रंग्या दीनवाणा त्याच्याकडे पहात होता!"

"मग?"

"गिरोबानं त्याच्याकडे बोट दाखवलंन् नि मला म्हणाला, तूं इथं असतांना हें होऊं देतोस?"

"म्हणतोस काय गुजा!"

"त मी म्हणालों, काय करूं? त म्हणाला, तुझ्या घरीं घेऊन जा!"

"मग?"

"मग काय? धसक्यानं जागा झालों, तो आपला तालमींत झोपलोंय्! काकू,

आतां सांग. काय करूं?"

"घेऊन ये बाबा त्याला!"

हे घाईघाईनं म्हणाले,

"गुजा, अशा द्रिष्टांताच्या मागं लागून तूं कांहीं गांवांत भांडणं पिकवूं नकोस बाबा!"

आबाला मागं सारीत मी म्हणाल्यें,

"मग काय रंगूभावजींना मरूं द्यायचं?"

"तूं तरी अशी आहेस! मरायला काय झालं त्याला?"

"नाहीं तर काय? एवढी गिऱ्होबानं सामक्षा दि्ली—"

सासूबाई म्हणाल्या,

"गुजा, माझं ऐक तूं. आपला जा, नि गोडीगुलाबीनं पोराला सोडवून घेऊन ये. हितं आमच्या घरीं कां आणीनास?"

"हितं कशाला आणखी आई?"

"आणा हो गुजाभावजी तुम्ही! मीं कुशात्त्यांना वचन दिलंयू—"

"पुरे झालं तुझं वचन. घरचीं खरकटीं नीट होईनात धुवून—"

"आण तूं गुजा!"

"आत्तां जाऊं?"

"जा."

"मरा! काय वाटेल तें करा!"

गुजाभावजी उठले. हातांत एक सोडगं घेतलं. म्हणाले,

"वेळ पडली त असूं दे."

सासूबाई ओरडल्या,

"मारामारी नको करूं रे!"

"नाय—सद्‌गुरुरायांनीं शपथ घातल्यै!"

"गणूला देऊं का काय बरोबर?"

"नको."

जोशी पातेरी गोळा करीत होता वाटेंते. तो म्हणे,

"गुजा खोत! चाललेत कुठं?"

"दिसेलच कीं थोड्या वेळानं."

ते असे कुशात्त्याच्या घराची कुपाटी ओलांडून पुढं सरतात, तों त्यांना

आरडा ऐकूं यायला लागला रंग्याचा—

"आयो ग! ए आई ग! हा बघ मला मारताय् ग!"

त्याबरोबरच वाश्याचा, व्यंकूभावजींच्या भावाचा आवाज—

"मग साल्या ठोठोठो कोकलत कशाला होतास रात्रभर आयशीच्या नांवानं? खपली तुझी आईस ती! आतां कोकलशील? का देऊं पुनः तडाखा?"

हें ऐकलं मात्र, नि गुजाभावजी जे उसळले! तीनचार उड्यांत व्यंकूभावजींच्या अंगणांत पोंचले. पहातात तों खरंच! रंगूभावजी असे अंग चोरून मार चुकवायची धडपड करीत पडले होते जमिनीवर, नि त्यांच्यावर शिमटी उगारून उभा होता वाश्या!

"वाश्या, टाक शिमटी!"

गुजाभावजी गरजले, तश्शी शिमटी खालीं टाकलीन्! रंग्यानं गुजाभावजींना पाह्यलंन्, तसा उठला, नी धावत त्यांच्याकडे आला. त्यांच्या गळ्यांत पडून म्हणे कसा,

"ए बुवा, हे मला आईकडे जाऊं देत नाहींत! बांधून ठेवतात! हें बघ!"

त्यानं कंबर दाखवलीन्. खरंच करकोचे पडले होते सुंभाच्या दोरीचे! गुजाभावजी आरडले,

"व्यंक्या कुठाय्?"

पंच्याला जानवं पुशीत नि गणपतीचं अथर्व म्हणत व्यंकूभावजी आले आंतून. म्हणाले,

"कां हो बुवा, आमच्या नांवानं कां सकाळींच शंख करतांय्?"

गुजाभावजी तांबडेलाल झाले. पण कसं तरी सांभाळून म्हणाले,

"रांडेच्च्या, याला मारून का टाकणारेस?"

"ही बातमी कुणीं दिली तुला?" व्यंकूभावजींनीं दात काढीत विचारलं.

रंग्याची कंबर उघडी करीत गुजाभावजी आरडले,

"हें काय आहे?"

"बरं मग? त्याची आईसमुद्धां त्याला कोंडून ठेवीत होती!"

"नि ही मारझोड?"

"त्याचं असं आहे, गुजा—तिनं आपला हा खुळा गोळा केलाहेन् माझ्या स्वाधीन. तेव्हां आतां हितं आमच्या घरीं जसा शिरस्ता असेल, तसं त्याला वागवलं जाईल. रात्रभर बोंबा मारतो आयशीच्या नांवानं. मारली असेल एखादी चापट—"

"नाहीं हो बुवा! हे मला—रोज मारतात—हे–वाश्या–केन्या—केन्या तर काठीनं मारतो त्या मोठ्या! गालगुच्चे घेतात—चिमटे काढतात—डागसुद्धां दिला!"

रंग्यानं आपला हात दाखवलंन्. मग मात्र गुजाभावजी कर्कश स्वरांत ओरडले,

"साल्या! इष्टेट गडप केलीस प्रेताचा अंगठा घेऊन—"

"गुजा—कायद्यानं बोल!"

"रोज सकाळीं उगाळून गंध लावत जा तुझ्या कायद्याचं! हरामखोरा, नि या बिचाऱ्याचा जीव घ्यायच्या मागं अहांत? दात पाडीन!"

"पाड बघूं!" वाश्या पुढं येत म्हणाला, "पाडच तूं दात! मग मी दाखवतांय् तुला!"

रंग्याला बाजूला केलीं, नि गुजाभावजी धावले. एका धक्क्यांत वाश्यानं तीन कोलांट्या खाल्ल्यान्. मग काय आरडा! गडी धावले. बायका आरडायला लागल्या.

पण व्यंकूभावजींनीं रंग ओळखलीं. त्यांनीं वाश्याला आंत लोटलीं, नि ते म्हणाले,

"गुजा, तूं मारामारी का करणारैस? मार! मार मला! नाहीं, तूं मार! कोयती देऊं आणून? तूं गुरूचा मंत्र घेतलाएस. तुझ्या हातून मेलों, तर पुण्य तरी लागेल—"

"मग तो कशाला आला समोर?"

"तुला म्हणायचांय् काय?"

"मी रंग्याला नेणार!"

"नेणार? पहा बरं! हितं त्याची खायची प्यायची सगळी वेवस्था होत्येय्—"

"तिथंहि होईल. मी कांहीं उपाशी रहात नाहीं."

"बघ बुवा तुझं तूं! ऱ्हाऊं दे ना हितं. कशाला रिकामी पिडा गळ्यांत बांधून घेताहेस?"

"नाहीं. मी नेणार!"

"पहा बरं! नाहीं तर म सांगशील गांवांत, कीं व्यंकू नकोसुद्धां म्हणाला नाहीं!"

"कांहीं नाहीं सांगायचा."

"बऽरं! केन्या, निठवंभर मीठ, चार पायली भात, दोन पंचे, असं

देस काढून—नि कोणा तरी गड्याच्या टकल्यावर देऊन जाऊं दे त्याला गुजाबुवाबरोबर!"

"मुरांबा घाल तुझ्या चार पायली भाताचा!" गुजाभावजी रंग्याला हात धरून बाहेर काढीत कडकडले.

"इच्छा तुझी. खबर देत जा रे! नाहीं तर रंग्या खपला अशीच बातमी यायची एकदम!"

"लाकडं मागायला तुझ्याकडे नाहीं यायचा मी!"

रंग्याला सांभाळीत, हळूहळू गुजाभावजी आमच्या घराकडे निघाले. वाटेंत जो भेटे तो विचारी. भिकू सरमेळा डोईवरचा भारा काठीनं सांभाळीत म्हणाला,

"बुवा, रंगूला न्हेतांव व्हय? न्ह्या न्ह्या! लई मारीत थंकू खोत!"

"तुला कसं कळलं?"

"अवो, समजायचां काय त्यांत? रातदीस इवलनां नि रडनां चाललां होतां रंगू किल्लेदाराचां. आमच्या कानावर यायचां. रंगू किल्लेदार, जा हो!"

आम्ही वाटच पहात होतों. रंग्याला मीं आज किती तरी दिवसांनीं पाह्यलं. केस वाढलेले, लाळ गळून ओठ नि छाती बरबटलेली. नखांत माती जाऊन तीं काळीं झालेलीं. कशीबशी लंगोटी. हाडांचा सांपळा नि पाठीवर माराच्या खुणा!

आई ग! मला तर पहावेना. टचकन् डोळ्यांत पाणी आलं माझ्या. तशीच घरांत गेल्यें. आंघोळीच्या चुलीखालीं मूठभर पातेरी लोटली, नि तेलाची बुरकुली घेऊन गुजाभावजींना हाक घातली,

"भावजी, हिकडं आंत आणा त्यांना."

त्यांनीं रंगूभावजींना आंत आणलीं. पाटावर बसवून मी सगळ्या अंगाला तेल लावायला लागल्यें. ते माझ्याकडे पाहून म्हणतात,

"आई!"

डोळ्यांतलं पाणी पुशीत मी म्हणाल्यें,

"आई ती तिकडे. मी वहिनी!"

"वहिनी!"

मी आपली घसाघसा पाठ घासायला लागल्यें. तशीं ते ओरडले,

"ओयू! दुखतांय! आयो ग!"

मीं म्हटलं,

"दुखतंय ना? हळू चोळत्यें हो मी."

तेल लावल्यावर मी, गणूभावजी नि गुजाभावजी, तिघांनीं चांगल्या कडकडीत पाण्यानं आंघोळ घातली. तोंवरीं सासूबाईनीं गुरगुट्या भात शिजवला होता.

ताटलींत भात, मेतकूट, तूप असं वाढून ती त्यांच्यासमोर ठेवली. तशीं डोळ्यांतून पाणी वहात ते सासूबाईकडे पहात पुटपुटले,

"आई ग!"

"जेव घरं बाळ, जेव."

जेवण झालं, नि मग घोंगडी हांतरून त्यांना झोपवलं. कशी छान झोप लागली.

त्यांना घरीं आणलं खरं. पण तें कांहीं ह्यांना आवडलं नाहीं. म्हणाले,

"गुजा, तूं याला आणलेंस हें कांहीं बरं केलं नाहींस."

"कां रे?"

"अरे, जिकडच्या खांद्य तिकडे बसला तर चांगला दिसतो. तो व्यंकू नि रंग्या. काय हवा तो गोंधळ घालूं द्यायच्या होतास."

"म्हाद्या, तूं माणूस आहेस का कोण? लेको, रोज बडवीत होते तिघेहि आळीपाळीनं!"

"असे कितीकच मार खाताहेत रोज. कुळवाड्यांत जाऊन बघ. रोज रात्रीं रांडेच्च्या कुळवाडणी कोकलत असतात, जीव द्यायच्या धमक्या देत असतात, पण दुसऱ्या दिवशीं नवऱ्यांना मिठ्या मारतात. त सगळ्या जगाचीं का भांडणं विकत घेणारैस तूं?"

"मग म्हणणं काय आहे तुझं?"

"दुसरं कांहीं नाहीं. हें खेकटं आणलांएस तूं, आपलं तुझ्या घरीं घेऊन जा! व्यंक्याचं नि माझं वाकडं यायला नको तेवढ्यावरून."

"असं म्हण कीं तूं भितोहेस व्यंक्याला."

"भिताय् कशानीं? पण नकोच तें!"

"बराय! मी तरी येत जाऊं का नको? हो, तें सांगून टाक. नाहीं तर—"

"गुजा, मी चालता होईन हो घरांतून! तुला कधीं म्हटलं रे मीं?"

"आपलं विचारून घेतलं!"

रंगूभावजी उठले, तशीं त्यांना हाताला धरून गुजाभावजी घरीं निघाले.

एकदां अगदीं खूप वाटलं, सांगावं, यांचं घर आहे, तसं माझंहि आहे. राहूं दे माझ्या घरीं. पण—

ᔕ ᔕ ᔕ

व्यंकूभावजींनीं कुशात्त्याची बाग गिळली खरी, पण ती कांहीं अंगीं लागली नाहीं!

त्या वर्षीं सुपारीवर असा रोग पडला! खुद्द व्यंकूभावजींच्या हितं दीड खंडी सुपारी व्हायची, ती कांहीं शेरभरसुद्धां झाली नाहीं.

मुसुनमानांनीं बांध फोडला तेव्हांपासून पऱ्ह्याला पुरेसं पाणी ये ना. पाटाचं पाणीहि उणावलं. तशीं मग गांवकऱ्यांनीं पैसे मिळवायची आणखीन् एक युगत शोधून काढली.

झाडं तोडून कोळसा पाडायचा. तो होडींतून चिपळुणास नि दाभोळेस नेऊन विकायचा. कुणी एक जण कुणीकडून शिकून आला कोण जाणे. त्यानं सुरुवात केली, नि मग सगळ्या गांवानं त्याच्यामागं धाव घेतली. सगळं रान भराभरा तुटायला लागलं. मेल्यांना असं कळेना, कीं जमिनीचा ओलावा कमी होतोय् झाडी तोडल्यानं.

खलाटींत नांगर चालले होते. हे तिकडे जायच्या तयारींत होते. तेवढ्यांत व्यंकूभावजी आले, नि म्हणाले,

"म्हादेवा, व्यापार करायचा का? बघ, लाखाचा धनी होशील!"

"एकदम लाखाचा?"

"हो."

"कसला व्यापार?"

"हें बघ, सड्यावर बरंचसं रान तुझं आहे. पलीकडे आंधळ्या भिव्याचा पट्टा आहे भला मोठा. दोन्ही रानांत साग, ऐन, आंब्रा, किंजळ, बराच झाड-झाडोरा आहे. कोळश्याच्या भट्ट्या लावायच्या. तूं नुसतं हो म्हण. बाकी सगळं मी करतों. निम्मा निम्मा वांटा. आहे कबूल?"

आबा माझ्याकडे आला, नि माझ्या कानांत म्हणाला,

"आई, व्यंक्याकाका आलाय्!"

मी कान देऊन उभी राहिल्यें. हे म्हणाले,

"पण भिऊआबा ऐकेल?"

"न ऐकायला काय झालं? पैसे मिळतील बसल्या बसल्या."

"पण आमच्या रानांत आंबा भारी रे!"

"असेना कां! कलमं त नाहींत ना? नी आज कोळशाला भाव आहे!"

मी पटकन् पुढं झाल्यें. म्हणाल्यें,

"भावजी, आमचं रान नाहीं तोडायचं."

"कां गो?" यांनीं विचारलीं.

"नाही तोडायचं. जमिनीची ओल कमी होत्ये."

"हें कुणीं सांगितलं तुला? नि या वेव्हारांत बायकांना काय कळतंय्? व्यंकू, तूं तोड रे!"

क्षणभर उभी राह्यलें. मग कुठून जोर आला कोण जाणे. आपली बोलून गेल्यें,

"बायकांनीं फारसा वाद घालूं नये म्हणतात. मलाहि नाहीं घालायचा. एकच सांगत्यें. व्यंकूभावजी, तुमचे कुऱ्हाडये गडी झाडं तोडायला आले आमचीं, त त्यांना पहिला घाव माझ्यावर घालावा लागेल. मी नि आबा दोघं झाडाला धरून उभीं राहूं!"

एवढं बोलल्यें नि आंत निघून गेल्यें! हे श्वास सोडून म्हणाले,

"आई गेली, तेव्हांपासून ही भारी बोलायला लागल्यै!"

"मग?"

"मग काय? शोभा का करून घ्यायच्यै? तूं आमचं नाहीं असं समज. भिऊआबा देतोसा बघ."

भिऊआबाकडे काय बोलणीं झालीं देव जाणे. दुसऱ्या दिवसापासून त्यांची झाडी तुटायला सुरुवात झाली. गडी तरी कुठं मिळताहेत पुरेसे!

करंवेल्याचा मेव्हणा होता मुंबैस. त्याच्या लागाआगानं नाहीं तरी दहावीस माणूस मुंबईला गेलं. तिथं रोकडा दाम मिळे. हितं काय मिळतंय्? घाम फुटेस्तोवेरीं खपावं, तेव्हां कुठं मीठभाताची सोय व्हायची. मुंबैत आपली मजा. हंतरायला नको, पांघरायला नको. कुठंहि फुटपाथावर अंग टाकलं! दहा घरचीं भांडीं घासलीं, धुणीं धुतलीं, कीं टिवल्याबावल्या करायला मोकळे. भांडीं घासणं परवडे मेल्यांना! हितं शेतांत कष्ट करणं नाय परवडे! उठतोय तो मुंबैला पळतोय.

त गडीहि धडपणीं मिळेनात, तरी रान तुटायला लागलं. भिऊआबाकडली आवकजावक वाढली [illegible].

एकदां मारुतीला निघाली होती शारदा संध्याकाळची. केसांत आपली

शेवंतीची भरदार वेणी! शेवंतीचीं फुलं दाभोळेस मिळायचीं. आमच्या हितं कांहीं कुठं व्हायचीं नाहींत.

आमच्या घरासमोरून चालली, तशीं मीं विचारलं,

"वेणी ग कुठून आणलीस?"

लाजली नि म्हणाली,

"दाभोळेहून."

"गडी का गेल्ता?"

"नाहीं. मला फुलं आवडतात ना, म्हणून आणलीं. मी नको म्हणत होतें तरी ऐकलां नाहीं."

"कुणीं आणलीं?"

"व्यंकूभावजींनीं."

एकदम धस्स झालं माझ्या छातींत. हें कांहीं बरं नाहीं. हिला मेलीला कसं कळत नाहीं? व्यंकूभावजी चांगला का माणूस?

दुसऱ्या दिवशीं दुपारीं मला राहवेना. आबा गेल्ता शाळेंत. उठल्यें नि भिऊआबाकडे गेल्यें. शारदा बसली होती पावटे निवडीत.

"या."

"असूं दे. बसल्यें तुला मदत करायला. गेल्या सालचे ना ग?"

"होऽ! बरा झाला पावटा गेल्या सालीं."

"भिऊआबा कुठाएत?"

"धाकू घेऊन गेलाय त्यांना बंदरावर. सपरी बांधायच्यैय ना? त कौलं घ्यायला गेलेत."

थोडा वेळ काचकुच करून शेवटीं धीर केलाच बोलायचा.

"शारदे, बाई एक सांगणाराए तुला. राग कांहीं येऊं देऊं नकोस."

"इश्श! रागवायचं काय त्यांत? तुम्ही हिताचंच सांगाल."

"अगो, तूं नि मी बरोबरीच्या. म्हणायचीस कीं आम्हांला का कळत नाहीं का?"

"नाहीं म्हणायची. तुम्ही बोला."

"बाई, तूं वेण्या कांहीं घेत जाऊं नकोस! तो माणूस चांगला नाहीं!"

शारदा एकदम कोमेजली. तरी मी बोल्लतच राह्यल्यें.

"आतां तुमच्या घरीं वारंवार येतो जातो. ये बाबा म्हणावं. पण आपला संबंध

अगदीं कमी ठेवावा. जितक्यास तितकं. काय समजलीस ?"

बराच वेळ मान खालीं घालून वाल निवडीत राहिली शारदा. नि मग एकदम माझ्याकडे पाहून म्हणत्ये,

"बाई, खोटं वाटेल तुम्हांला—"

"अगो, खोटं कसं वाटेल?"

"मी अगदीं कमी बोलत्यें त्यांच्याशीं. मला का समजत का नाहीं? पण तेच सारखे सारखे येतात. नेमके हे घरीं नसतील अशा वेळीं येतात. हे आहेत का म्हणून विचारतात. पाणी मागतात प्यायला. म्हणतात, वहिनी तुझ्या केसांसारखे केस सगळ्या पडघवलींत कुणाचे नाहींत !"

"असंच गऽ बाई ! असंच !"

"नि काल आपले वेण्या घेऊन आले. म्हणाले, तुझ्या केसांत छान दिसतील म्हणून आणल्येत !"

"भिरकावून द्यायच्यास—"

"मीं नकोच म्हटलं. पण मुद्दाम ठेवून गेले हितं. म्हणाले, आमच्या घरीं तरी कोण आहे घालायला?"

"मेल्यांनो ! वासूच्या नि केरूच्या बायका नाहींत वाटतं?"

"वाळून जायला लागल्या. मीं घातली संध्याकाळीं एक. म्हटलं, फुकटच जायची !"

"पहा बाई तुझं तूं ! हें कांहीं बरं नाहीं !"

टच्चकन् शारदेच्या डोळ्यांत पाणी आलं. पुशीत म्हणाली,

"आमचंच नशीब फुटकं ! नवरा आंधळा, म्हणून कुणींहि कांहींहि बोलावं !"

"कांहीं का बोलल्यें, शारदे ? पहा बाई—"

"नाहीं हो बाई ! तुम्हांला नाहीं म्हणत मी. जगाचं सांगत्यें. एकादवेळीं वाटतं, कीं जीव द्यावा !"

कुणीकडचं कुणीकडे गेलं. तशीं मग तिला कशीबशी गप केली नि परतल्यें घरीं.

संध्याकाळीं आबा गेल्ता गुजाभावजींकडे. तो नाचतच परतला. म्हणे कसा

"आई गो ! किल्लेदार डोचक्यावर हिरवा पाला बांधून बसलाय्."

"मेल्यांनो ! कसला रे तो?"

"मीं विचारलं गुजाकाकांना. तशीं म्हणाले, ब्राह्मीचा पाला वाटून बांधलाय्."

"सगळ्या डोक्यावर का?"

"हो ना! डोचकं तासलंय्, नि त्यावर थापलाय् चहूंकडून पाला!"

"गुजाभावजींचं काम तरी असलं कांहीं तरी अघोचर असायचं. रंगूभावजी काय करीत होते?"

"म्हणजे किल्लेदार ना?"

"हो. अरे काका तुझे ते!"

"हसत होते."

"गुजाभावजी काय म्हणाले?"

"येतों म्हणाले."

गुजाभावजी आले. मी देवापाशीं निरांजन लावीत होत्यें. सासूबाई गेल्यापासनं संध्याकाळची पूजा बंदच झाल्ती. गणूभावजी दुपारीं कसेबसे देव पाण्यांतून खंगाळून काढायचे. आबा मात्र लवकर मुंज करण्याच्या लोभानं रामरक्षा म्हणत असे. त्याला मधून मधून चुकायचा तिथं सांगत होत्यें मी.

"कशाला बोलावलं होतंस वहिनी? नि हे दोघे कुठाएत?"

"ते आले नाहींत अजून सड्यावरनं. बसा भावजी त्या पाटावर."

"काय बातमी आहे?"

सगळं ऐकलं तशीं म्हणाले,

"हा शिंचा सगळा गांव नासवणार!"

"मग आतां?"

"आतां काय! होईल तितकं सांभाळीत राह्यचं. नि गांव उडीच घालतों म्हणाला, तर वरून धोंडा टाकायचा!"

"तुम्ही नाहीं कांहीं कराच्चेत?"

"सद्गुरु! सद्गुरु!"

रंगूभावजींना आणलीं त्या दिवशीं तिथं राग आला, म्हणून दोन दिवस उपास केला म्हणे गुजाभावजींनीं, असे गुजाभावजी! थोड्या वेळानं मींच म्हटलं,

"नि आज रंगूभावजींच्या डोक्यावर ब्राह्मीपाला कशाला थापला होतात?"

"अगो, त्याच्यावर प्रयोग सुरू केलेत!"

"कांहींच्या बाहीं करून बसाल—"

"कांहींच्या बाहीं कसा करीन? मला का तेवढंहि का समजत नाहीं?"

"मीं म्हटलं का तसं?"

"नाहीं म्हटलंस. पण उपेग दिसायला लागलाय् हो!"

"कसले प्रयोग करतांय्?"

"म्हशीचं दूध निघतंय् दुवक्त अडीचतीनेक शेर. खूप दूधदहीं खायला घालतोंय् त्याला."

"पचतं का?"

"न पचे त काय! शिवाय रोज रात्रीं अशा चार बोटांच्या दोन चिमट्या त्रिफळा घालतों खायला."

"त्रिफळा? तो कशाला? बुळकुंड नाहीं का लागायची?"

"लागल्यैय्! काळं, हिरवं, खडे! सगळं अंगण भरून ठेवतोय्. एकदां तर तालमींतली मातीच खराब केलीन्."

"मारीत बिरीत नाहीं ना?"

"मारून काय उपेग? अन् संध्याकाळीं टोपलीभर ब्राह्मीचा पाला वाटतों, नि देतों टकल्यावर थापून. रात्रीं बांधून टाकतों टकलं फडक्यानं."

"कांहीं तरीच हो तुमचं भावजी! सर्दी होईल अशानं."

"होऊं दे. शरीरांतल्या पंचधातू धुवून जाऊं देत एकदां."

"ओळखायला लागला का माणसं?"

"ओळखीत होताच थोडथोडा. पण आतां माझ्याशिवाय राहीना झालाय्. एकदां मी खाडीपलीकडे खापुर्लीस गेल्तों, त धुमाकूळ घातलंन्. पोरांना आवरेना!"

"पोरं म्हंजे कुळवाड्यांचींच ना?"

"हो. कां? नाकसं उडवलंस?"

"मी कशाला नाक उडवूं! तीं काय माणसं नाहींत? पण वाईटवकटं खातात—"

"ज्या दिवशीं खातात त्या दिवशीं भजनाला बसत नाहींत. मीं सांगून ठेवलंय् त्यांना."

"मीं म्हणत्यें गुजाभावजी, रंगूभावजी बरे झाले तर हो?"

"झाले तर? अगो होणारच तो! आसनं करायला बसवतोंय्. तो कांहीं अजून बसत नाहीं. पळतोय हिकडे तिकडे. पण थांब जराशी! गिरोबानं सामक्षा

दिल्यै ना? त्यालाच घालतों साकडं!"

"म्हंजे?"

"ऊं हूं! आत्तां नाहीं सांगायचं."

"कां हो?"

"तूं आडमोडा घालशील."

"मी कशाला घालूं आडमोडा?"

"नाहीं. आत्तां नाहींच सांगत. नि एकदां जर का हा पोर ताळ्यावर आला, त मग व्यंक्याला उंडीचं तेल पाजून ओकायला लावतों इस्टेट!"

"देतील का ते?"

"त्याचा बापूस दील!"

तेवढ्यांत हे आले. ह्यांनीं बापूस तेवढा ऐकलीं. विचारलीं,

"कुणाचा बापूस गुजा? काय चाललंय तुम्हा वह्यनी-भावजींचं?"

"काय नाय."

"नाय कसं? सांभाळा रे बाबांनो! मला कांहीं तुमचं लक्षण धड दिसत नाहीं, काय समजलास गुजा?"

"समजलों, समजलों! काय रे, कुणाच्या डोसक्यांत धोंडा घातला?"

"तुम्ही तोहि घालायला कमी करायचे नाहींत—"

"म्हाद्या!"

"आरडूं कांहीं नकोस. पण वाडवडिलांच्या वेळेपासून चालत आलंय्, तें नीटपणीं सांभाळलंय् आतांपर्यंत. आजवेरीं गांव नीट चाललाय्—"

"काय नीट चाललाय् रे?—गांवाची पत्रास सांगताहेस तूं! काय नीट चाललाय्?"

"काय वाकडं झालं सांग बघूं!"

"सांगूं का? मग कान वाकडा करून पळूं नकोस म्हंजे झालं!"

"सांग कीं!"

"आक्की कशानं मेली? धर्मीच्या नवऱ्यानं कां तिला टाकलीन्? रान कां तुटत चाललं? गांवांत गडी कां मिळेना झाला? पाणी कां कमी झालं? सुपारीवर रोग कशानं पडायला लागला? पाट कां आटायला लागला?"

"कांहीं तरी उकरून काढताहेस गुजा तूं. तुझ्याशीं तंडायला मला नाहीं वेळ. आमचीं जेवणं व्हायच्यैत अजून. तुझं झालं का? का नुसताच दुग्धाहार? ऐकलंस

का गो, गुजाचं पान घे."

"नको रे बा! रंग्या तिकडं वाट पहात बसला असेल."

गुजाभावजी गेले. पण माझ्या डोक्यांत मात्र वादळ सुरू झालं. रात्रीं ह्यांना म्हणाल्यें,

"म्हटलं, गुजाभावजी बोलले, तें खरं नव्हतं का?"

"लागलीस तूंहि डोस्कं खायला?"

"असे रागावतां कां हो?"

"रागावूं नको त काय करूं?"

"पण आपलं वडील घर. आपल्यावर नाहीं का याचा दोष येत?"

"हें बघ, आपण आपल्याकडून कुणाचं वाईट केलं का?"

"नाहीं केलं. पण दुसऱ्यांना करूं दिलं तें?"

"कुणाला? आतां कां बोलत नाहींस? व्यंकू तुमच्या डोळ्यांत सारखा सलत असतो. पण तो करतो किती तें दिसतंय का कुणाला?"

"काय करतात?"

"सांगूं? मोज. सुपारी सगळ्या गांवाची एका मुठीनं विकीत होता तो!"

"गरीब बागकऱ्यांना फसवूनच ना? हिरवीं पोफळं आहेत, तोंवेरींच सौदा करायचा, नि सगळं बागकऱ्याला करायला लावून शेवटीं कात्यावर येऊन आपण उभं राह्यचं!"

"चालायचंच. एकदम उडी घालील तळाशीं, त्याला मोतीं तरी मिळतील, नाय तर चिखल तरी."

"पण चिखल लागलेला कांहीं मीं पाहिला नाहीं व्यंकूभावजींच्या हाताला."

"भाग्य त्याचं. कुरकुरून काय लाभ? एक झालं. दुसरं, सगळ्या पंचक्रोशीं-तला कोळशाचा मक्तेदार आहे तो."

"म्हंजे घर मोडून गोठा केला, त्यांतलंच ना?"

"तोंड दिलंय देवानं, बोला काय वाटेल तें!"

"वाटेल तें बरं बोलेन! सगळं रान बोडकं होत चाललंय्."

"कावळ्यांची दृष्टि आहे तुमची. खतं तेवढीं दिसतात!"

"खतंच का? बरं, मी विचारत्यें, शारदेसाठीं अलीकडे व्यंकूभावजी वेण्या कां हो आणतात?"

"तुला काय करायचांय्?"

"मला? तुम्ही बसलांत डोळे झाकून. व्यंकूभावजींकडे हल्लीं कोणकोण जमतं नि काय काय करतात माहीत आहे का?"

"कोण कोण जमतं?"

"दत्तूअण्णाचा हरी, फोजदार, गोपू जोशी, टोसर—असे सगळे जमतात. गांवभरच्या कुटाळक्या चालतात. नि अलीकडे भिऊआबांकडे हरीचंहि येणंजाणं सुरू झालंय्, बरं का!"

"राहूं दे ग—एक शब्द सांगूं नकोस मला! झोपूं दे आतां."

हे झोपले, नि थोड्याच्च वेळांत घोरायला लागले. एवढं घडतंय् तरी झोप कशी येत्ये निश्चिंतपणीं कोण जाणे!

۵ ۵ ۵

म्हणाल्यें होतें तें खरं झालं! वाईट तेवढं मेलं नेमकं खरं व्हायचं!

पंधरावीस दिवसांनीं पहात्यें तों पुनः शारदेच्या डोक्यांत फुलांचा गजरा—चांगला कलाबूत घातलेला! आतां कसं सांगायचं या मेलीला? मरत कां नाहीं ही एकदांची?

बारापंधरा दिवसांनीं छानदार टोपपदरी लुगडं नेसून गेली मारुतीला. अगदीं कोरी घडी मोडली होतीन्. विचारलं,

"केव्हां ग घेतलंस लुगडं?"

त म्हणे,

"घेतलंय्!"

"केव्हां घेतलंस?"

एक नाहीं नि दोन नाहीं!

दुसऱ्या दिवशीं कोष्टी आला लुगडीं घेऊन, नि त्यानं टोपपदरी पातळाचा बस्ता सोडीत सांगितलंन्,

"एक तरी घ्याच ह्यांतलं. तुमच्याच गांवांत घेतलीं यांतलीं दोन."

"कुणीं घेतलीं?"

"भिकूनानाकडे घेतलीं."

"दोन्ही?"

"नाहीं. एक घेतलं त्यांनीं, नि एक व्यंकटदादांनीं. घ्या ना!"

जळ्लीं तुझीं पातळं तीं! असा संताप आला—म्हटलं,

"जा बाबा तूं. मला नाहीं घ्यायचीं लुगडीं."

"कां हो वहिनी? दुसरीं, इंदुरी, बऱ्हाणपुरी—"

"तुझीं इंदुरी नकोत नि बऱ्हाणपुरी नकोत. तूं जा आज. माझं डोकं नाहीं ताळ्यावर!"

"हे दाभोळी वाण ठेवून घ्या चारसहा. खोतांना दाखवून पसंत पडेल तो ठेवा."

"तूं जा!"

संध्याकाळीं गणूभावजींना म्हटलं,

"भावजी, एक पत्र लिहायचंय्."

"कुणाला?"

"बनूवन्संना. त्यांना म्हणावं, काय वाटेल तें करून एकदां दोन दिवसांकरतां निघून या."

"लिहितों."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं अशीं आठदहा वाजतां आबा नि चारसहा पोरं सगळी दरी गर्जवीत आलीं. आबा टाळ्या पिटीत माझ्याकडे आला नि म्हणे,

"आई, तूं आधीं चल!"

"कुठं?"

"तूं चल!"

"अरे कुठं तें सांगशील कीं नाहीं?"

"तूं चल—लोणच्यांब्याखालीं!"

"कशाला रे!"

"गुजाकाकांनीं किल्लेदारकाकाला फाशीं दिलं!"

मेल्यांनो! होणारे तरी काय काय! तांदूळ ओयरीत होत्यें, ते तस्से ठेवले नि धावत निघाल्यें. सगळा गांव धावत होता तिकडे. अगदीं म्हाताऱ्याकोताऱ्यासुद्धां! ठेचकाळत, धडपडत.

वाटेंत जो तो म्हणत होता,

"आपण लागला बुवाच्या नादीं, नि त्या पोराला दिलान् भैताडानं फाशीं!"

"मीं हें भाकीत खूप अगोदर केल्तं महाराजा!"

"तूंच कशाला? मीसुद्धां म्हणालों होतों—असं कांहीं होणार नाहीं, तर नांव बदलून दीन!"

"यंकूखोताचां सगलां वागनां असांच अक्रीत!"

आंब्याशीं ही गर्दी जमली होती! मेल्यांनो! कुठून दुर्बुद्धि सुचली ही!

धावत गेल्यें, त्या सगळ्या पोरांना बाजूला केलं. नि पाहात्यें तों काय!

कर्म ग बाई!

फांदीला बांधल्यै दोरी. तिला बांधलैत रंगूभावजींचे पाय. नि उलटं डोक्यावर उभं केलंय! रंगूभावजी तांबडेलाल झालेत, नि खदखदा हसताहेत. गुजाभावजी शेजारीं बसलेले.

"ये वहिनी!"

"काय हो हें भावजी?"

"हें शीर्षासन."

"नि तें कशाला?"

"गिरोबाला साकडं घातलंय्. हा धड शीर्षासन करीना, म्हणून पाय वर बांधलेत."

माझ्यामागं आबा होता. त्याच्या पाठींत धपाटा घालीत मीं विचारलं,

"तूं काय सांगत आलास रे?"

"मला काय माहीत? पोरं म्हणालीं, मी म्हणालों!"

"पुरे झालं कीं भावजी आतां!"

"हो! झालंच. पांच मिण्टांनीं सोडतों."

"[illegible] पांच मिण्टं! सोडा आतां. तोंड पहा कसं झालंय् लालभडक!"

"बरं. आज पहिला दिवस आहे. पुरे करतों."

सोडलीं त्यांनीं रंगूभावजींना, नीं थोडा वेळ टाळू चोळली.

"आमच्या हितं चला. थंडसं ताक देत्यें."

"तुझ्या हितं? ऊंहूं!"

"कां हो?"

"म्हाद्यानं नाहीं म्हटलंय्! रंग्या बरा झाल्यावर आणीन तुझ्या घरीं!"

नि मग रोज सकाळीं आपलीं हीं शीरशासनं सुरू!

चारसहा दिवसांनीं बनूवन्संचं पत्र आलं. लिहिलं होतं,

"तूं बोलावलंस. मलाहि यावंसं वाटतंय. पण सासूबाईंचे पाय धरलेत. नि धाकटीला झालाय् डांग्या खोकला. त्यामुळं येतां येत नाहीं. पण दोनतीन महिन्यांनीं यीन म्हणत्यें."

करायची काय दोनतीन महिन्यांनीं येऊन? ब्राह्मणवाड्याला लागल्यै आग.

तोंवेरीं जळूनसुद्धां जाईल!

शारदा माझ्याशीं बोलेनाशी झाली. नि रोज मेली नवी वेणी, नि नवीं लुगडीं! शेवटीं एक दिवस मी कोडग्यासारखी उठल्यें, नि तिच्या घरीं गेल्यें. तों आपला हरी तिथें बसलेला! बायकोला दिलीन् मेल्यानं माहेरीं धाडून नि हितं लोकांचीं घरं चुडीनं पेटवीत बसलाय्. मला पाहिलंन् तसा पटकन् उठून चालता झाला. भिऊआबा घरीं नव्हतेच. शारदा ओटीवर बसली होती. मी आलेली पाहिलंन् तिनं. पण या, बसा कांहीं म्हणाली नाहीं!

शेवटीं निलाजऱ्यासारखी मीच बसल्यें खालीं, नि म्हटलं,

"शारदे!"

"काय?"

"बाई काय मांडलं आहेस तूं?"

ओठ चावलेन् नि म्हणत्ये कशी,

"तुम्हांला नाहीं पाहावत? मत्सर वाटतो वाटतं माझा?"

"शारदे!"

"आरडूं कांहीं नका! आल्याच अहांत, त बसा थोडा वेळ. कुंकू लावत्यें नि जा आपल्या घरीं. मला उपदेश कांहीं करूं नका. मला बरं दिसतंय् तशी वागत्येंय् मी!"

"असं नको ग करूंस शारदे! तुझ्या माहेरच्यांना काय वाटेल—"

"माहेरच्यांना? आंधळ्याच्या गळ्यांत बांधतांना माहेरच्यांना कांहीं नाहीं वाटलं? सगळा गांव म्हणतोय, शारदा एखाद्या राजाची राणी झाली असती म्हणून. काय उपेग आहे या रूपाचा? जन्मभर आंधळ्यालाच मिठ्या मारीत बसायचं ना? मुळींच नाहीं बसायची! माझ्याजवळ आहे रूप. त्यावर भुलून माणसं घिरट्या घालतात. मीहि त्यांच्याशीं गंमत करत्यें. तुम्हांला नसेल पाहावत तर डोळे मिटून घ्या. नि पुनः उपदेश करायला येऊं नका!"

खेटर मारल्यासारखी एवढंसं तोंड घेऊन घरीं आल्यें. भावजी होते घरीं, ते म्हणाले,

"कां गो वहिनी—काय झालं?"

"भावजी, जरा गुजाभावजींना बोलावतां का?"

"आत्तां बोलावूं?"

"हो."

थोड्या वेळानं गुजाभावजी आले. डोळे पुशीत त्यांना सगळं सांगितलं.

"सद्गुरु! सद्गुरु!"

"मग आतां?"

उठले नि सरळ भिऊआबाकडे गेले. त्याला घेतलीं, नि पऱ्ह्यावर गेले. तिथं त्याला काय सांगितलीं, तें देव जाणे. त्या रात्रीं दहाच्या सुमारास शारदेच्या किंकाळ्यांनीं सगळी पाखाडी गाजली! म्हटलं, का जनावर चावलं! धावत गेल्यें. पहात्यें तों हरीनं भिऊआबाच्या हातांतली काठी धरल्यै, नि शारदेच्या कपाळांतनं भळाभळा रक्त वहातंय्!

आमची एवढ्यांची चाहूल लागूनहि भिऊआबा शब्द कांहीं बोलला नाहीं. त्यानं ओठ दातांखालीं गच्च दाबून धरला.

ह्यांनीं त्याला धरलीं नि समजावीत हंतरुणावर नेऊन झोपवलीं. शारदेच्या कपाळाला पट्टी बांधली, नि आम्ही जायला लागलों, तशीं माझा हात धरून ती म्हणाली,

"बाई!"

"काय?"

"मी तुमच्या घरीं येत्यें!"

हो म्हणाल्यें असत्यें तर? पण नेमका त्याच वेळीं कसा माझ्या जिभेवर कली उभा राह्यला तो. मघांचा राग अजून गेला नव्हता. तिचा हात सोडवीत म्हणाल्यें,

"नको शारदे! तुमचीं तुम्ही काय वाटेल तें करा!"

घरीं परतल्यें. रात्रभर कांहीं झोप आली नाहीं.

अन् सकाळीं ऐकलं कीं भिऊआबानं बावेंत जीव दिला!



गणूभावजींना बरेच दिवसांपासून मुली सांगून येत, पण त्यांनीं पहिल्यापासूनच सांगितलं,

"मला लग्न करून दुसऱ्याची पोर फसवायची नाहीं!"

कारण होतं त्याचं एक. त्यांच्या छातीवर इवला पैएवढा पांढरा डाग होता. तो वाढत चालला होता. आमच्या सबंध घराण्यांत कुठं हें असलं नव्हतं. बिचाऱ्या गणूभावजींच्याच नशिबीं कुठून उमटलं, कोण जाणे!

अगदीं पाटाच्या पाण्यासारखा स्वभाव. म्हणाल त्याला हो म्हणायचे. सांगाल तें करायचे. पण ह्यांचेच भाऊ! अंगांत धमक नाहीं.

आबाच्या मुंजीच्या वेळीं त्यांना एक मुलगी सांगून आली. एक पाय जरा आखूड होता. मुलीच्या बापाला भावजींच्या पांढऱ्या डागाचं माहीत होतं. तो म्हणाला,

"असेना कां! मला चालेल. माझी मुलगी तरी कुठं निर्व्यंग आहे? चांगल्या घरीं पडल्येय्, डागानं कांहीं बिघडत नाहीं. तो कांहीं बापाचा पोरांत उमटत नाहीं."

पण भावजी तयार होईनात. मग हे म्हणाले,

"मग जन्मभर तूं असाच का शुकदेव रहाणारैस?"

"हो."

"जेवायला कोण घालील?"

"वहिनी घालील. आईसारखी ती."

"घालीन हो भावजी! पण मी जल्मभर का पुराच्यैय्?"

"पुरशील तितके दिवस पुरशील. तुझ्यामागं गुजाचा शिष्य होऊन जाईन."

"नाय रे बाबा! अशी चेष्टा करूं नका त्याची. तो अघोचर आहे खरा. पण गुजा तो गुजा. त्याचं दुसऱ्याला नाय जमायचं!"

"शेवटीं कळली ना गुजाभावजींची किंमत?"

"अगो, मी का त्याला परसांतल्या भाजीवारी का विकत होतों? तें असूं दे. गणू, तुला नाय ना लग्न करायचं?"

"नाय."

"मग तूं आपली इस्टेटींतली वांटणी तुझ्या नांवानं करून घे बाबा! माझ्यामागं आबाची बुद्धि कशी फिरेल तें काय सांगतां येतंय्?"

"दादा, मी घरांतून चालता होईन हां! वांटणीचं नांव काढायचं नाय् पुन्हां!"

"तरी तुझ्यासाठीं कांहीं तरी उद्योग पाहून देतों."

त्या वर्षीं कलमं अशीं आलीं कीं सांगतां पुरवत नाहीं. दरवर्षी ओणीचे मुसुनमान बारावर कलमं घ्यायचे, नि मुंबैला नेऊन विकायचे पाड. यंदा यांच्या डोक्यांत भरला छंद. व्यंकूभावजींना बोलावलीं, नि म्हणाले,

"व्यंकू, आपल्याला व्यापार करायचा."

"कसला ?"

"आंब्यांचा."

"वहिनीला विचारलंस का?"

"तिला काय विच्यारायचांय् ?"

"नाहीं तर मध्येंच नको म्हणाच्ची !"

"नाय रे बा ! त कसं करायचं ?"

"कसं ?"

"हें बघ, गांवभरांत आपलं सगळ्यांचं मिळून नाहीं तरी पांचशें कलम आहे. दरवर्षी तें मुसुनमानांना विकतों आपण. रांडेच्यांनीं पाणी अडवलीं आमचं ! नाय द्यायचा आंबा त्यांना. यंदा आपण ठेवाच्चा मुंबैशीं वेव्हार."

"कल्पना बरी आहे. पण सगळ्यांचीं कलमं मिळतील ना?"

"न मिळायला काय झालं ? मुसुनमानांना देतात नि आपल्याला देणार नाहींत ?"

"हें बघ म्हाद्या, मानानं तूं मोटा. तूं सांगावंस नि मीं करावं. काय कराच्चं तें सांग. पण सांभाळून हो ! नाहीं तर म्हणशील, कीं व्यंकूनं सांगितलं नाहीं अगोदर. मुसुनमान व्यापाऱ्यांशीं गाठ आहे !"

"असूं दे रे ! नि हें बघ, मी हें कां करतांय् ?"

"कां ?"

"आमच्या गणूकाकाचा धंदा आहे हा."

"म्हंजे ?"

"म्हंजे फायदा होईल तो सगळा त्याचा. त्यानं वाटेल तें करावं त्याचं."

"बारं बारं ! मग सांगायचं ना सगळ्यांना ?"

"हो, तूं नि मी निम्मे निम्मे."

"ठीक."

एक हरी वगळला, त सगळ्यांचीं कलमं मिळालीं. हरी मात्र म्हणाला,

"मुसुनमानाला दीन. म्हाराला दीन. माझीं मी पेटवीन कल्मां ! पण तुम्हांला द्यायचा नाय !"

"पेटवा !"

नुसतीं आमचींच कलमं नव्हतीं. कुळवाड्यांचींहि होतीं शेंदीडशें. यांनीं जाऊन सांगितलीं, त म्हणाले,

"खोतांनो ! तुमापरीस का ओनीचा म्हम्मद जवल्चा हाय आमाला ? पर तो रकम अदुगर द्येत होता—"

"मी दीन कीं ! अजिबात कळ निघत नसेल, तर मीहि दीन हो पैसे !"

झालं. मुसुनमान सगळ्या गांवांत खेपा घालून गेले. हरीचीं कल्मं तेवढीं मिळालीं त्यांना. मंमद बागवान येऊन अंगणांत बसला. म्हणाला,

"भाभी, यवरा गूळ नि पानी द्या."

"देत्यें."

"ऐकलाव् काय खोतांनो, तुमी क्येलांव् खरा सगला जैण बारगेण. पर आमच्या बारगेणला मिलायचा न्हाय तुमचा."

"कां रे ?"

"कां म्हनून इचारताव तवां सांगतो. मुंबैला आमचीं मानसां असतात. तिथून आम्हांला तार देतात. आज माल धारा. आज धारूं नका. काय समजलेत ?"

"असूं दे रे ! आम्हीहि करूं वेवस्था."

"करताव् तर करा. पर हा काय खरा झालां न्हाय. अहो, हा काय पंचांगन सांगायचा हाय ? हा धंदा करावा आमींच."

"बरं बरं, पाहूंच ना ! घोडामैदान काय लांब आहे ?"

नि मग अशी धावाधाव सुरू झाली ! रात्रीं बाराबारा वाजतां उठून हे नि गणूभावजी दोघे जायचे कलमांवर नजर ठेवायला. सगळा डोंगर नि सडा पालथा घालावा लागायचा. मी म्हणायची,

"कंद्या तरी नेत जा भावजी, बरोबर!"

हे म्हणायचे,

"करायचा काय कंद्या ? कंद्या पाह्यला कीं लांबूनच चोर पळेल."

नि एकदां आपला वाघ यांच्या अंगावरून गेला ! डोंगरावरून झुरमुट्या कातळ उतरून खलाप्यांत शिरत होते हे दोघे. तशीं पटकन् हे थांबले नि म्हणाले,

"गणू, काय रे तें डाव्या अंगाला ? मांजर का काय ?"

"एवढं मोठं कुठलं मांजर ?"

"काठी हापट ! हा हो हा हो हुड्—!"

यांचा गलगा ऐकला, तशीं संथपणं बाबा उठला, नि यांच्या समोरून निघून गेला !

रानभर पसरलेलीं कलमं. सगळ्यांवर नुसती नजर टाकायची म्हटलं, तरी दिवस नि रात्र पुरायचीं नाहींत. दुवक्त आपले घरीं येऊन जेवायचे, नि पुनः बाहेर.

मध्येंच एकदां व्यंकूभावजी आले, नि म्हणाले,

"म्हादेवा, अरे खोकीं लागतील कैऱ्या धाडतांना."

"हो ना."

"मग ? चलताहेस होडी करून चिपळुणास ? तिथं ब्रुकब्रोणचा एज्रंट आहे. त्याच्याकडे मिळतील हवीं तितकीं."

"तूंच जाईनास ?"

"मीच का जाऊं ? अरे, तूं नि मी असलेले बरे."

"ऊंहूं. तूंच जा."

चौथ्या दिवशीं व्यंकूभावजी परतले, ते दोनशें रुपयांचीं खोकीं घेऊन !

मीं जेवतांना विचारलं,

"कां हो ? एवढीं दोनशेंचीं खोकीं ?"

"नवीं आहेत."

"पण दोनशेंचीं ?"

"एकदां घेतलीं कीं आठदहा वर्सं पहायला नको."

"तरी पण तुम्हीं जायचं होतंत बरोबर. दोनशें रुपै—"

"तुम्ही बायका अशा हिमस्त्या अहांत ! व्यंकू का फसवील आपल्याला ?"

तितक्यावरच थांबलं तें.

आंबा पाडावर यायला लागला, तशीं गडी ठरवा, नि नवे झोले करा, एकच धांदल. फोजदार कांहीं तरी निमित्य सांगून सगळे पैसे घेऊन गेला. कुळवाडीहि दाभोळेस जातांना दोनदोन चारचार रुपै मागून नेत. घरांत शिल्लक होती ती आटली. नि गडी ठरवायच्या वेळीं हातांतल्या गोठ नि बांगड्या मोडल्या ! हे म्हणाले,

"गणू दील तुला करून नवं ! नाहीं तरी जुनंच झालं होतं तें."

त्यांत गुजाभावजी अलीकडे येईनासे झाल्ते. शेवटीं आबाला धाडून विचारलं, तशीं म्हणाले,

"संध्याकाळीं मी नि रंग्या दोघे येतों म्हणून सांग तुझ्या बापसाला !"

संध्याकाळीं पहात्यें तों पंचा, सदरा, टोपी अशा थाटांत रंगूभावजींना घेऊन गुजाभावजी हजर ! आल्याबरोबर म्हणाले,

"अगोदर वहिनीला नमस्कार कर. मानानं मोठी आहे ती."

रंगूभावजींनीं मुकाट्यानं येऊन मला नमस्कार केला! कुठं कांहीं चिन्हसुद्धां नाहीं वेडाचं! शांत चेहरा.

"म्हादेव कुठाय्? चल ये समोर असा. रंग्या, त्याला नमस्कार कर. म्हादेवा, सांग. ओळखलंस रंग्याला?"

यांनीं बराच वेळ बघितलं रंगूभावजींकडे. त्यांची नजर स्थिर, नि खालीं वळलेली.

"नांव काय बाबा तुझं?"

"रंगनाथ."

"अरे, नांव काय विचारताहेस? अकरकी नि औटकीचे हिशेब विचार!"

"म्हणताहेस काय गुजा?"

"तूं विचार कीं! मी अगदीं थक्क झालेंय आश्चर्यानं!"

"सांग रे एकावन औट किती ते—"

"एकशें साडे अठ्ठ्याहत्तर."

"गुजा, अरे तूं जादू तरी काय केलीस?"

"मीं? गिरोबानीं म्हण! शीर्षासनांनीं गुण आला बघ! त्रिफळा, ब्राह्मी नि शीर्षासनं, सहा महिने सारखं सुरू होतं."

"भावजी, थांबा! तुमची दृष्ट काढत्यें!"

"दृष्ट कसली काढत्येस वहिनी! गिरोबाला दहींभात दे करून उद्यां. रंग्या यील ठेवून."

"नि याला कसं यायला लागलं रे हें सगळं?"

"अरे, एकपाठ्या झालाय्! दुसऱ्यांदा कांहीं सांगावं लागत नाहीं!"

"शहामत गड्या तुझी!"

"माझी? व्यंक्याची शहामत म्हण!"

"कां?"

"सकाळीं गेल्तों त्याच्या घरीं याला घेऊन. त म्हणे, ठाण्याच्या इस्पितळाच्या डाक्तराचं सर्टिफिकीट आण बरा झाला म्हणून, मग देतों इष्टेट!"

"मग?"

"परवां याला घेऊन मुंबैला जाईन म्हणतों! काय समजलास? त्याला नाय खाऊं देत रे याची इष्टेट!"

" तो तरी कसा खाईल? वेडा का आहे तो?"

" भ्रमांत आहेस तूं म्हाद्या!"

" बरं."

दुसऱ्या दिवशीं रंगूभावजी गिरोबाला दहींभात ठेवून आले. जेवायला दोघांनाहि सांगितलं होतं. ओल्या नारळाचे मोदक केले होते. वाढतांना म्हटलं,

" भावजी, मोदक आवडतात ना? लाजूं नका असे. पोटभर खा हं!"

गुजाभावजी रंगूभावजींना घेऊन मुंबैला गेले, नि व्यंकूभावजीहि जायला निघाले. म्हणाले,

" म्हाद्या, मी स्वतः जातों रे! म्हंजे माल उतरून घ्यायला, दलालांशीं बोलणीं करायला, सगळं सोयीचं होईल. अरे, जिथं तिथं माणूस स्वतः उभा हवा. दुसऱ्यावर विसंबून भागत नाहीं!"

" व्यंकू, अरे तुझ्याच भरंवशावर त ही एवढी उडी घेतल्यै."

" आपलं असं आहे म्हादू, एखाद्याला हो म्हटलं, कीं अगदीं विकून घ्यायची पाळी आली त्याच्यासाठीं तरी चालेल!"

" म्हणून त जग चाललंय व्यंकू, नाहीं तर दिवस का सोयीचे का राह्यलेत?"

" बरं, मी म्हणत होतों, एक पन्नास रुपै देऊन ठेव. मग सगळा हिशेब करूं."

मी मध्येंच बोलल्यें,

" भावजी, तुमचा आमचा निम्मा हिस्सा आहे ना? मग तुम्हीं नको का खर्च करायला?"

" वहिनी, तुला नाहीं उमगायचं तें. खर्च हा एका ठिकाणून झाला कीं हिशेबाला सोयीचं पडतं! माझं काय जातंय्? मीसुद्धां खर्च करीन. पण मग हिशेबाच्या वेळीं—"

" राहूं दे रे व्यंकू! बायकांना संवयच असते मध्यें तोंड घालायची! तूं जा पैसे घेऊन."

यांनीं पैसे काढून दिले.

" पुरेत ना एवढे?"

" हो! उरतीलसुद्धां! पण आपले असावेत म्हणून घेऊन ठेवलेत."

" तूं पत्र पाठवच!"

" पत्रानीं का भागणार? तार दीन. एवढ्यातेवढ्याकडे पाहून चालत नाहीं

अशा कामांत."

"बारं बारं! तार दे."

नि मग सुरू झालं आंबे उतरायचं तारांगण. मागचं अंगण, पुढचं अंगण, ओसरी, माजघर, माडी, सगळीकडे पाट्याच्या पाट्या आंबा येऊन पडायचा. तो छाटायचा, नि लगेच पेंढा घालून खोक्यांतून भरायचा. गडी, हे दोघे, आबा, भरीला मी, अशीं तीनचार दिवस सारखीं खपत होतों. अंग अगदीं आंबून गेलं. पण म्हटलं, घेतलंय् अंगावर तें पुरं करायचं.

व्यंकूभावजींची तार आली. दाभोळेस कुणी सुलेमान म्हणून नाखवा होता. व्यंकूभावजींनीं त्याला ठरवून ठेवला होता. गणूभावजी धावत दाभोळेस जाऊन गलबतं पडघवलीच्या बंदरांत घेऊन आले. कांडपिणी नि गडी बंदरावर खोकीं नेऊन रचायला लागलीं. सगळ्या गांवचा आंबा एकदम जायचा. त सगळ्यांनीं मिळून गलबतं भरलीं. तीन गलबतं माल झाला.

शेवटचा पेटारा पोंचवला नि काल्या म्हणाला,

"शिलेमानसाब! परत याल तवा कोंबरी कापीन हो तुमच्यासाठीं!"

"होऽ हो! चांगली हवा मिलाली त परवा संध्याकालीं मुंबै!"

"आतांच निंगनार काय?"

"हां. पानी होटायला लागला कीं निंगनार."

घरांतला पसारा कमी झाला, नि सगळं घर एकदां सारवून घेतलं. आंब्यांच्या चिकाबिकाचे डाग पडले होते.

आबा गणितं करीत बसला होता घडवंचीवर. तो म्हणे,

"गणूकाका, आम्हांला अंगठी करायची हां!"

"करू रे करू! वहिनीला वज्रटीक, नव्या फ्याशनच्या बांगड्या नि तुला अंगठी."

"नि तुम्हाला हो भावजी?"

"आबाला केलं म्हणजे मला केलं हो वहिनी!"

जेवतांना हे अमसुलाच्या साराचा भुरका मारीत म्हणाले,

"गणूला आवडतं म्हणून केलैस वाटतं सार?"

"हो."

"करायचीसच! नव्या फ्याशनच्या बांगड्या करणारे ना तो!"

"इश्श! एऱ्हवीं कधीं करीत नाहीं वाटतं?"

संध्याकाळीं आकाशांत ढग आले. मीं म्हटलं,

"हवा बिघडत्यैय का काय?"

"नाय! उलट वारा सुटलाय्. उद्यां संध्याकाळीं गलबतं पोंचतील मुंबैला."

"मी मारुतीला अभिषेक बोलल्यैं हो!"

"करा ना! नाहीं तर पैसे हातीं आले म्हंजे सत्यनारायणच करूं."

चौथ्या दिवशीं मी स्वैंपाकघरांत होत्यें, त आबा धावत आला नि म्हणे,

"बाहेर पोष्टमण आलाय."

मी डोकावल्यें बाहेर. आज अवेळीं कां हा पोष्टमण?

हे सचिंत बसले होते.

"कां हो?"

"कांहीं नाहीं. व्यंकूची तार आहे."

"काय म्हणून?"

"गलबतं कां पोंचलीं नाहींत म्हणून. हा तरी असला आहे! दर्यांचं काम. एखादा दिवस अधिकउणा लागायचा. सगळं वाऱ्यावर संधान. आतांवेरी पोंचलींसुद्धां असतील."

पण मला कांहीं विश्वास येईना! धसका उभा राह्यला पोटांत. एवढा सबंद गांवचा आंबा गोळा केलाय्. कोण जाणे काय होतंय्.

हे वरून हुशारी दाखवीत होते. पण आंतून त्यांनाहि हादरा बसलाच होता. ज्याच्या त्याच्यावर चिडायचे. मीं म्हटलं,

"अहो, चिडतां कां असे?"

"कुठं चिडलोंय्? तूं तरी अशी धांदरट आहेस!"

कधीं नव्हत तें आबाला मारलींसुद्धां त्या तीनचार दिवसांत.

नि त्याच्या पांचव्या दिवशीं स्वतः व्यंकूभावजी हजर!

आम्ही सगळीं गोळा झालों जिवाचे कान करून.

"कां रे व्यंकू?"

"कां काय! अरे, गलबतं नाहींत!"

"गलबतं नाहींत? अरे, झालीं तरी काय? आज दहा दिवस झाले, गलबतं हितून निघालीं. गणू, तुझ्या समक्ष निघालीं ना? खरंच निघालीं व्यंकू! अरे, कुणालाहि विचार. सगळा गांव गोळा झाल्ता बंदरावर. ए ह्या—काय तुझं नांव तें—हिकडे ये. हितून गलबतं निघालीं तेव्हां तूं होतास ना बंदरावर?"

"व्हय्. माझ्या संबुर निंगालीं!"

"बघ. नि तूं म्हणताहेस आलीं नाहींत म्हणून!"

"मग? खोटं का सांगतांय् मी?"

"तसं म्हटलं का व्यंकू मी? पण अरे, आज दहा दिवस झाले—या दहा दिवसांत खाऱ्या हवेनं आंबा पिकून उतरलाहि असेल. अरे, तूं धक्क्यावर नीट तपास केलास का? नाहीं. चेष्टा करताहेस तूं व्यंकू—अरे, हितून निघालीं नि तिथं पोंचलीं कशीं नाहींत?"

"म्हाद्या, झक मारली नि तुझ्या वेव्हारांत पडलों, असं झालंय मला! मला चेष्टा का सुचेल आतां? अगोदरच गुजानं आग लावलेली—"

"आग?"

"तर काय! रांडेचा ऐन ठाकुरद्वारच्या नाक्यावर हातीं खेटर घेऊन उभा. मी हरी केशव गोखल्याच्या सराफी दुकानासमोर. हज्जार माणूस येतंय् जातंय्. मोठेमोठे आफिसर त्यांत. त्यांच्यासमोर मला म्हणे कसा, कीं हें बघ सर्टिफिकीट—आतां दे रंग्याची इष्टेट! भर रस्त्यावर माझी अब्रू घेतलंन्! मी संतापलों. म्हटलं, जा कोर्टांत—देत नाहीं तसा! त खेटर काढलंन् पायांतलं! चार शहाण्यांनीं आवरला म्हणून, नाहीं तर तिथंच व्हायची झमकाझमकी! एक त हें झालेलं—नि मीं सारखा माणूस ठेवलेला धक्क्यावर. शिवाय मी खेटे घालतांय्. पण एक बापडा दाभोळखाडीच्या गलबतांचा पत्ता कांहीं सांगेना."

यांना चतुर्थीचा उपास होता. सकाळपासून कांहीं खाल्लं नव्हतं. हें ऐकलीं, नि झांज येऊन कोसळले! मी धावल्यें, गणूभावजी धावले. हंतरुणावर नेऊन निजवलं. झांज उतरल्याबरोबर गणूभावजींवर ओरडले,

"हितं माझं डोचकं धरून काय बसलाहेस गण्या? दाभोळ्ळेस पळ. त्या सुलेमानचा पत्ता काढ—ऊठ, जा!"

गणूभावजी तस्सेच निघाले. व्यंकूभावजी म्हणाले,

"घरून येतांय् रे आंघोळ करून."

यांचं लक्षण कांहीं धड दिसेना मला. पाणी मागितलीं—पाण्याचा पेला आणला, त तो फेकून दिलीं! मीं म्हटलं,

"असं रागावून काय होणारे? जरा थंड डोक्यानं—"

"तूं हितं बसून उपदेश नको करूंस मला! ऊठ! चालती हो!"

चालती होऊं? कुठं?

गणूभावजींना फारसं धावावं लागलंच नाहीं. तीन मैलांवर खालगांवच्या खाजणांत सुलेमानचा माणूस भेटला. तो नि गणूभावजी घरीं आले. ह्यांनीं उठून विचारलीं,

"काय रे, गलबतं कुठाएत ?"

"जौल झालां. गलबतां डुबलीं दर्यांत !"

हे खालीं कोसळले !

नि मग एकच्च कालवा झाला. सगळा गांव धावला. व्यंकूभावजी आले. जो तो म्हणायला लागला,

"अशीं कशीं बुडलीं ?"

"कशीं डुबलीं तां काय मनां म्हाईत? जौल झालां जबरदस्त ! साला सुलेमानचां नसीब जबरदस्त, म्हनून गरी तरी वांचले. तैरून निंगाले भाएर !"

व्यंकूभावजी यांच्याजवळ आले, नि म्हणाले,

"म्हादेवा, आतां ?"

हे निपचित पडले होते. ताड्दिशीं उठले. म्हणाले,

"नाय—मी माझ्यासाठीं गांवकऱ्यांना खार लागूं देणार नाय! व्यंक्या, पंधराशें रुपै उसने दे."

"पंधराशेंनीं कसं भागेल ?"

"दोन हजार दे."

"अडीच हजार लागतील."

"अडीच दे! सगळयांचं देणं देऊन टाकूं दे."

"पण—पैसे माझ्याजवळ—इतके—"

"काय वाटेल तें कर रे व्यंकू. पायां पडतों तुझ्या !"

"नाय—पायां कशाला पडतोस ? रुपयांची सोय होईल. मजजवळ नसले त ओणीहून हरखूशेटकडून आणीन. पण—"

"आतां कसला पण ?"

"नाहीं—कांहीं तारण हवं ना ?"

"माझा शब्द पुरा पडत नाहीं ?"

"अरे, तुझ्या शब्दावर दहावीस हजार उभे करीन ! हितंच नव्हे, मुंबैलासुद्धां ! पण हा पैशाचा वेव्हार—"

"असं ? ठीक आहे. आमचा आंबेमोहोराचा पट्टा—सहा तुकडे आहेत.

ते तुझ्याकडे ठेव, नि पैशांची वेवस्था कर!"

"कागद—"

"व्यंक्या—रांडेच्या अंत कां पाहताहेस माझा? तुला काय वाटेल तें कर—पैसे आण अगोदर!"

व्यंकूभावजी उठले, नि पुनः हे कोसळले!

आतां होणार आहे तरी काय? धस्स झालं माझ्या काळजांत! म्हटलं,

"इवलं शाहाळ्याचं पाणी पितां का?"

एक नाहीं नि दोन नाहीं! मीं डोक्यावरून हात फिरवीत म्हटलं,

"घाबरल्यासारखं का होतंय्? इवली सूतशेखराची मात्रा आणूं का?"

त्या वेळीं बोलले,

"हें बघ—अगोदर लोकांचे पैसे चुकते करूं दे. मग मला तब्ब्येतीचं विचारायला ये. तोंपर्यंत शब्दसुद्धां बोलूं नकोस माझ्याशीं!"

व्यंकूभावजी आले. त्यांनीं कागद करूनच आणला होता. काय लिहिलं होतं हरी जाणे! यांनीं कशीबशी सही केली. म्हणाले,

"आणलेस रुपै?"

"आणलेत. माझे तेवढे काढून घेतलेत रे!"

"तुझे?"

"आंब्यांचे रे!"

असा संताप आला! जळक्या लाकडानं टाळकं सडकावं! म्हणाल्यें,

"भावजी, तुम्ही भागीदार ना होतांत?"

"कशांत भागीदार? सौदा झालाच कुठं? मुंबैला आंबे पोंचून बाजारांत गेले असते, तर भागीदारीचा प्रश्न! तुला कळायचं नाहीं वहिनी तें! त म्हादेवा, हे मोजून घे बाबा!"

"गण्या, वही आण! हिशेब करा! बोलवा सगळ्यांना."

मंडळी आली. हिशेब झाले. दोघे सोडून बाकीच्यांनीं सगळे पैसे घेतले. एक घेतले नाहींत दामूअण्णांनीं. ते म्हणाले,

"बुडालेल्या आंब्यांचे कसले पैसे घ्यायचे? मी नाहीं घ्यायचा!"

नि दुसरे चंद्री आडविलकरणीनं. ती म्हणाली,

"खोतांनो, समजलां काय? म्होरल्या सालीं तुमी माजीं कलमां मुंबैला न्ह्या, नि मग मांगसून मला पैसे द्या."

व्यंकूभावजी म्हणाले,

"एक राहिलं आतां."

"काय?"

"सुलेमानचे पैसे—नि हो, एकदां झोला नीट करायला सुतळी आणली होती रे मीं अडीच आण्यांची, तें राहूं दे. अगोदर सुलेमानचा हिशेब—"

गलबतांचे पैसे दिले. हे म्हणाले,

"आतां कुणाचं कांहीं राह्यलंय्?"

"नाय! तेवढ्या त्या अडीच आण्यांशिवाय—"

हे धाड्दिशीं खालीं ढेपाळले. मी धावल्यें, नि डोकं उचलून मांडीवर घेतलं!



एक अंक संपला.

कुणी म्हणे, यांना शक्तिपात का काय म्हणतात तो झाला. कुणी म्हणे कांहीं, कुणी म्हणे कांहीं.

काय वाटेल तें कां होईना, मी उघडी पडल्यें, एवढी गोष्ट खरी.

कुणाला वाटेल, हिचं नि नवऱ्याचं फारसं सूत तर नव्हतं. मग एवढं दुःख कां?

सहजगत्या नाहीं कळायचं तें. सूत नव्हतं हेंहि कांहीं खरं नव्हे. कधीं कधीं त्यांच्या वागण्यामुळं चीड यायची मला. पण शेवटचं त्यांचं बाणेदार वागणं—

नि नवरा गेल्यावर काय वाटतं, तें उमजायला एका खात्यापित्या घरची थोरली सून व्हायला हवं. एऱ्हवीं तें कसं उमगेल?

माझं मला भोगायलाच हवं सगळं. कुणाला सांगून कांहीं त्यांत वांटा पडण्यासारखा नाहीं. पण हे गेल्यानं पडघवलीचं कितपत नुकसान झालं?

हे मनानं कितीहि दुबळे कां असेनात, तरी पडघवली या दुबळ्या खांबावर आधारली होती. तो खांब गेला नि मागं सगळ्या दावेदारांना चौखूर उधळायला मोकळीक झाली!

गुजाभावजी परतले मुंबईहून ते, तोंवरीं यांना वीस दिवस झाले होते, बंदरावरून घरीं रात्रीचे आले. वाटेंत कुणी भेटलं नाहीं. नाहीं तर बातमी कळती.

मारे फुशारकीनं रंग्याभावजींना घेऊन झोंपाळ्यावर बसत त्यांनीं हांकारलीं,

"म्हाद्या—आहेस कुठं? हिकडे असा समोर ये!"

मीं आवाज ऐकला बरीक, नी असं कांहीं रडूं फुटलं आहे! तोंडांत लुगड्याचा बोळा दाबून धरला शेवटीं, तरी वेग सावरेना!

गणूभावजी मागल्या दारीं होतें. आबा ओटीवर अभ्यास करीत बसला होता. त्यानं मान खालीं घातली. कुणी ओ देईनासं पाह्यलं, नि गुजाभावजी आंत आले. म्हणाले,

"ओब्या, शिंच्या झालंय् काय तुला? बोलत कां नाहींस? वहिनी कुठाय्?"

त्यांना माजघरांत पाह्यलं नि मीं मोठ्यानं हंबरडा फोडला,

"भावजी—"

तेवढ्यांत गणूभावजी मागल्या दारून आंत आले. गुजाभावजी एखाद्या खांबासारखे उभे होते. गणूभावजींनीं सांगितलं,

"गुजादादा—आज एकविसावा दिवस—"

"कशाला?"

"दादा गेल्याला!"

हें ऐकलीं, नि धप्पदिशीं खालीं बसले. बराच वेळ मुकाट्यानं रडत होते. मग भरल्या आवाजानं म्हणाले,

"मीहि चांडाळ मुंबैला मज्या करीत होतों! जल्मभर सोबत केली, नि शेवटच्या वेळीं दुर्बुद्धि सुचली—कसा गेला?"

"शक्तिपात झाला म्हणे!"

"म्हादेवा ऽऽ"

पुनः बराच वेळ आसवं गाळलीं. मग उठले नि माझ्याजवळ आले. खालीं बसत म्हणाले,

"वहिनी, तूं माझी आई! माझ्याकडे पहा बघूं—"

मी आणखीनच हुंदके द्यायला लागल्यें. तशीं काय वाटलं त्यांना कोण जाणे, माझ्या पाठीवरून हात फिरवीत ते म्हणाले,

"वहिनी, ए वहिनी, माझ्याकडे बघ—तुझ्या लेकराकडे! मला कळतंय् ग—भारी दुःख झालंय् तुला. आते नाहीं, काकू नाहीं, कुशींत डोकं ठेवून रडायलासुद्धां कोणी नाहीं. पण मी गुजाभावजी आहें ना?—तुझा आबा, गणू, तसा मी!—बघ माझ्याकडे!"

हुंदका आवरून उठून बसल्यें. म्हणाल्यें,

" भावजी—"

" रडायचं नाहीं वहिनी आतां. आबा लहान आहे अजून. हा सगळा पसारा आवरायचाय् ना ? मग रडायचं नाहीं. म्हादेव गेला, त्याचं सोनं झालं. काय काय झालं, सांग बघूं—"

नि मग थोडं मीं नि थोडं गणूभावजींनीं—दोघांनीं मिळून सांगितलीं. तशीं जे संतापले—म्हणाले,

" खून करतों साल्याचा ! कोयतीनं खापलतों धरून !"

" भावजी—"

" नाहीं वहिनी—त्या [illegible] तोडलाच पाहिजे ! फाशीं गेलों त माझ्या मागं रडायला कोणी नाहीं. गांवची बलाय जाऊं दे !"

" भावजी—माझी शप्पत आहे हां तुम्हांला. असं कांहीं केलंत, तर अफू खाऊन जीव दीन."

" तूं तरी अशी आहेस वहिनी ! ठीकाय ! यंव नी त्यंव ! दावा लावतोंच आहें साल्यावर ! आतां शेंडी तुटो का पारंबी तुटो—बाग विकावी लागली माझी तरी चालेल. पण कोर्टाच्या खेपा करतां करतां व्यंक्याच्या ढुंगणाला खटं पाडीन, त मी नांवाचा गुजा ! येतों वहिनी आतां. उद्यां सकाळीं येईन."

दुसरे दिवशीं सकाळीं आले भावजी. अगोदर गोठ्यांत जाऊन गुरांच्या पाठीवर हात फिरविलीं. मग खालीं बागेंत गेले. गडी आळीं नीट करीत होता. त्याला म्हणाले,

" काल्या, खोत गेला म्हणून कशीं तरी गाढवाला शिंगं जोडायचीं नाहींत हां !"

" नाय बा ! खोत ग्येलं खरं—पर आजून गनू खोत नि आबा खोत हाएत."

एका माडाला काय झालं होतं कोण जाणे, बुंध्यांतून सुकत चालला होता. गणूभावजींना हांकारलीं त्यांनीं.

" गणू—रे गणू—"

" ओ."

" हिकडे ये बघूं. हा माड आजच्या आज तोडवून घे गड्यांपासून. कोसळायचा तो कधीं तरी नि पोफळीं मरायच्या त्याच्याखालीं."

" तोडवतों."

कुणीकडून बुद्धि सुचली कोण जाणे ! एऱ्हवीं घरच्या बागांचं त्र्यंबकनं पाह्यचं.

यांना वेळ कुठाय्! भजनांच्या सुपाऱ्या घ्यायच्या. कुळवाड्यांचीं भांडणं तोडायचीं, निंबाचा पाला गटागटा प्यायचा, कसलं नि काय!

तिथून आले, नि झोपाळ्यावर बसत आबाला म्हणाले,

"आबा, कितवींत आहेस तूं?"

"चौथींतून पांचवींत गेलों."

"सांग बघूं—एका हौदाला दोन नळ असून एकानं पाणी आंत येतं नि दुसऱ्यानं बाहेर जातं. आंत येणाऱ्या नळानं हौद दोन तास सतरा मिण्टांत भरतो—"

"काका, तें शिकवलं नाहीं अजून!"

"नाहीं शिकवलं? बरं! लघुत्तमसाधारण विभाजक—"

"तेंहि नाहीं."

"रँडेच्या! मग शिकविलं आहे तरी काय? वहिनी—"

मला हांक मारीत भावजी आंत आले. मी ताक करीत होत्यें. म्हणाल्यें,

"बसा भावजी. ताक देत्यें ताजं."

"ताक देस. पण अगोदर आबाचं काय तें सांग बघूं!"

"काय?"

"मी फारसं शिकलों नाहीं. म्हादू नाहीं. आमच्या वेळीं नव्हती एवढी गरज. पण आतां मात्र या पोराकडे दुर्लक्ष करून भागायचं नाहीं. काय समजलीस?"

"पण भावजी, हितल्या शाळेंत काय शिकणार तो! शाळाहि तशीच नि मास्तरहि तसाच! गाढवाचं नांव गोपाळशेट, त्यांतलं."

"अगो, तेंच तर म्हणतांय् मी!"

"मग कराचं काय?"

"कापाला धाडत्येस? तिथं त्रिंब्याचा सासरा येऊन राह्यलाय् पेन्शन खात. काप दापोली म्हंजे हवा सुरेख, पाणी सुरेख. पाद्र्यांची शाळा आहे तिथं. त्रिंब्याचा सासरा नि सासू दोघंच आहेत. वहिनी एकटीच पोर. माणसं भारी सुस्वभावी. हौसेनं ठेवून घेतील. पाद्र्याच्या शाळेंत शिकेल."

"पाद्र्याच्या? किरिस्तावाच्या? नको बाई! तिथं वाईटसाईट खायला लावीत असतील—"

"हे:! अगो, नुसता हेडमास्तर नि सुपरठेण पाद्री. खायला कसं लावतील? नि सगळा काप त्या शाळेंत जातो. तीं मुलं कांहीं वाईटसाईट खात नाहींत,

नि तुझ्याच गोम्याला खायला लावील पाद्री? मी तर म्हणतांय्, रंग्यालाहि घालतों शाळेंत!"

"रंगूभावजींना? वय काय त्यांचं?"

"असेल बेचाळीस. माझ्याहून दोनअडीच वर्षांनीं धाकटा तो."

"मग आतां बेचाळीसचे रंगूभावजी का दफ्तर काखोटीस मारून शिकायला जाणारैत?"

"अगो, मी जातांना पाद्र्याला भेटलों होतों. रंग्या दाखवला होता त्याला. सगळं ऐकिवलं. घाला म्हणाला."

"घाला त मग."

"नि आबा?"

"त्यालाहि जाऊं दे. पण सुट्टीबिट्टींत यील ना घरीं?"

"यील तर? नि आतां मला कापास वारंवार जावं लागणार."

"कशाला तें?"

"व्यंक्याला सुखानं खाऊं देतों का मी? रांडेच्याला घायकुतीला आणीन!"

तेवढ्यांत गलगा ऐकायला आला. कान दिला तिकडे, त शारदा नि बनूवन्संची आई, दोघी कडाकडा भांडत होत्या!

आबा धावत घरांत आला नि सांगायला लागला,

"आई, शारदाकाकी नि—"

"पुरे रे! तूं वर जा बघूं माडीवर—अभ्यास करीत बस."

एवढंसं तोंड करून तो वर जाऊन बसला. भांडण पहायला नाहीं मिळालं ना?

आम्हीहि गेलों नाहीं. आपलं सुतावरनं स्वर्गास जायचं, तसं भांडण कशावरून चाललंय् तें कळलं होतं. तेवढ्यांत बनूवन्संच्या आईच आल्या भांडण घेऊन.

"अंब्ये, बाहेर ये."

मी बाहेर आल्यें नि म्हणाल्यें,

"काय झालं काकू?"

"मेल्यांनो! आम्हीं गांवांत रहावं, का देशोधडीं व्हावं?"

"झालं काय?"

"व्हायचंय् काय डोमलं? आपण उलथले नाटक मंडळींत! दोघां कार्ट्यांना घेऊन गेले. मला सटवीला ठेवली हितं लोकांचे उंबरठे पुजायला! द्यायची

होतीत म्हणावं धोंडा बांधून आपल्या हातानं ल्कटून एखाद्या बावींत!"

गुजाभावजी म्हणाले,

"अगो काकू, झालं काय तें तरी सांग."

"काय व्हायचांय् मातीम्हसणं! तुला माहिती आहे गुजा, शारदीकडे आहे चाफ्याचं झाड. तें आहे अगदीं मधल्या कुपाटीला. निम्मीं फुलं पडतात आमच्या अंगणांत. तीं वेचूं नको मी?"

"मग?"

"मग काय! रांडेच्ची म्हणत्ये काय, फुलं नाहींत वेचायचीं! मेलीला ह्ऱ्यानं शिकिवलंन्. एवढे दिवस नव्हत्यें वेचीत? म्हटलं, जाऊं दे. भांडणास मूळ नको. मी केराबरोबर लोटून टाकायची. नि आतां आमचा शेवगाहि कुपाटीला आहे, त्याच्या शेंगा झोडायला लागली. कां म्हणून विचारलं त म्हणे तुमच्या शेवग्याची सावली आमच्या अंगणांत पडत्ये त्याचं भाडं! भाडं म्हणे हो भाडं! अवकळा मेली! नवऱ्याला खाल्लंन् नि आतां बसल्यै बाजार मांडून!"

"पुरे हो काकू—"

"अगो, पुरे त मला हौस का आल्यै? पण हें भांडण तोड बघूं!"

"मी?"

"नाहीं तर कोण? कडू कुचल्याची बी? भांडण तोड, नाहीं तर हितं तुझ्या उंबऱ्यावर डोच्कं आपटत्यें! हेऽज्याव—"

"चला काकू."

त्यांच्याबरोबर त्यांच्या परसांत गेल्यें. शारदा शेंगा चिरीत बसली होती अंगणांत. काल रात्रींचं काजळ अजून तस्सं होतं डोळ्यांत, नि अंबाड्यांत फुलांची शिळी वेणी.

मी तर अगदीं थक्क झाल्यें! खरोखरच शारदा दिसायला हजार जणींत उजवी होती. एवढं वय झालं, तरी पोर नाहीं बाळ नाहीं, म्हणून अंगलट बिघडली नव्हती. मीं तिला बरेच दिवसांत पाहिलं नव्हतं. मलाहि वाटलं, खरोखरीच राजाची राणी शोभती शारदा.

पण राजाच्या राणीनं हें असलं का करायचं? देवानं रूप दिलं लक्ष्मीसारखं. त्याचा उपयोग काय नुसता गांवबसवीपणाकडे करायचा?

जाऊं द्या. त मीं म्हटलं,

"शारदे, बाई, भांडण कां ग करत्येस?"

वाघिणीसारखी माझ्यावर डोळे रोखून म्हणाली,

"तुम्ही कोण विच्यारणार?"

"मी? मी—कुणी नाहीं मी. पण यांच्या शेवग्याच्या शेंगा कां घेतल्यास?"

"घीन."

"अगो पण कां?"

"कां? फिर्याद लावा माझ्यावर!"

"अगो, फिर्याद कां आठवली तुला?"

"तुम्हीं केलंच आहांत ना सुरू फिर्यादीचं चक्र? मग होऊं द्या आतां. मी रोजच घ्यायची हो शेंगा तोडून—काय करायचं असेल तें करा तुम्ही!"

अस्सं! तर मग ही बुद्धि कांहीं शारदेची नाहीं; व्यंकूभावजींची आहे! मेल्यांनो! चांगल्याकरतां केलं, नि मुळावर आलं! आतां हें फिर्यादीचं शेपूट संपायचं तरी कुठं?

गुजाभावजींना सांगितलं, तशीं म्हणाले,

"असं काय? ठीक आहे म्हणावं!"



आबा नि रंगूभावजी दोघे कापास गेले. अगोदर कांहीं दिवस रंगूभावजींची खूप थट्टा केली मुलांनीं. पण पाध्यानं खडसावलं मुलांना, तशीं गाडं सुरळीत सुरू झालं त्या दोघांचं.

गुजाभावजींच्या दापोलीस खेपा सुरू झाल्या. व्यंकूभावजींचा ओक वकील. दुसरा एक नवीन वकील आल्ता कापास. मंडलीक त्याचं नांव. उंचच्या उंच, नि असा गोरापान होता. गुजाभावजींनीं त्याला वकीलपत्र दिलीं. दावा लावला दिवाणींत. तारखांवर तारखा पडायला लागल्या.

मांडवावर आंबोशी वाळत घातली होती. तींत हात फिरवीत होत्यें मी. तशीं भग्या कोळ्याचा न्हावऱ्या एका फडक्यांत कसलीशी गठुळीं बांधून दारासमोरून चालला होता. मीं विचारलं,

"न्हावऱ्या, काय रे तें?"

गठुळी लपवीत तो म्हणाला,

"काय न्हाय बा."

"न्हाय कसं? नि लपवताहेस कां? म्हावरं चालवलंस कीं काय?"

न्हावऱ्या घोटाळला, नि म्हणाला,

"काकी, वाईच गुल घेताव काय?"

"गूळ देत्यें रे. पण नेतांयुस काय तें नाहीं सांगितलंस?"

"सांगतांय्."

गुळाचा खडा खाल्लंन्, नि पाटाला तोंड लावून पाणी प्यायल्यावर डारकन् ढेकर देत हळूच म्हणे कसा,

"काकी, हा गुपित काम हाय. तुमाला कळूं देऊं नोको, म्हनून सांगलाय् माका!"

"कुणीं?"

"येंकूखोतांनीं."

"काम तरी सांग!"

"सांगतांय हो. पर मिनीं तुमांला सांगलां, असां माजां नांव परख्यात करूं नका! मला सा आने रोज घेताय् येंकूखोत."

"नाहीं सांगायची."

"हे खेकरे!"

"खेकडे? ते रे रांडेच्च्या कशाला?"

"पाटांत नि बांदांत सोडाया!"

"मेऽल्या! किती दिवसांपासून सोडतोयुस?"

"आज आट दीस झाल. पर सांगू नका हो काकी!--तुमच्या पायां परतों! न्हाय तर माजा बापूस मनां मारील."

"नाहीं सांगायची. तूं जा."

कर्म! बांधाच्या भिंतींत सोडायला चालवले होते खेकडे! म्हंजे त्यांनीं भिंतींत बिळं करावींत, नि पाणी वाहून जावं त्या बिळांतून!

तरी मी म्हणत होत्यें, आज इतके दिवस पाणी कां ओहोटलंय् पाटाचं? एरवीं हां हां म्हणेस्तोवेरीं सांचणबाव भरून पाणी सगळ्या बागेंत फिरून जायचं. नि अलीकडे पाळी फिरायची, तरी जेमतेम सांचणबाव भरली न भरली!

तशीच निघाल्यें नि गणूभावजी भात उपशीत होते भरडायला, त्यांच्याकडे गेल्यें.

"गणूभावजी—बांधांत खेकडे सोडताहेत आज आठ दिवस!"

"साल्यांनो—"

"जा बघूं, अगोदर बिळं बुजवून या घावतील तीं."

थोड्या वेळानं गणूभावजी घामाघूम होऊन परतले.

"कां हो ?"

"अगो, जोशी राह्यला तंडायला उभा !"

"नि तो कां ?"

"मी बांधांत गेलों त खरीच—दरादरादरा खेकडे धावताहेत चहूंकडे! बंद करून आलोंय बिळं. पण तेवढ्यानं भागायचं नाय वहिनी. बांधांत माती टाकायला हवी."

"पण जोशी कां भांडला ?"

"अगो, नुसते बांधांतच खेकडे नाहींत. त्यानं आपल्या पाटांत पण सोडलेत !"

"हा मेल्यांनो—मग ?"

"मग काय—अगोदर पाट त्याच्या बागेंत शिरतो, तिथवेरी कसंबसं पाणी पोंचतं. नि पुढं बोऱ्या ! टोसराची बाग जेमतेम भिजते, त्याच्यापुढं पाण्याचा वहाव आपला उंदीर-मुतवणी. त्याला पाट नीट कर म्हणालों, त म्हणे कसा, माझ्या पाटाची मी कुरल्या नि खेकडे सोडून चाळण करीन ! तूं कोण बोलणार !"

आतां काय करायचं ? उठल्यें नि दामूअण्णांकडे गेल्यें. त्यांचा मुलगा दाभोळेस दुकान घालून होता किराण्याचं. बायकापोरं तिथंच. नि आईस कधीं हितं असायची, कधीं तिथं. म्हातारा खोकत बसला होता दोन्ही हात कपाळाशीं धरून.

"ये अंबूताई. अगो, ही गेल्यै दाभोळेस."

"त्यांच्याशीं नाहीं, तुमच्याशींच आहे काम."

"काय म्हणत्येस ?"

दामूअण्णांना सगळी हकीगत सांगितली. म्हातारा कमोला हात लावीत म्हणाला,

"अंबे, गेला दिवस तो बरा म्हणायला झालाय्! अगोदरच पाऊस कमी झालाय्. गडी कुणी मिळत नाहीं. नि त्यांत या रांडेच्च्यांना या दुर्बुद्ध्या सुचताहेत ! आतां मी तरी काय करूं ? हा असा खोक्या दम्या मी. म्हणशील, तर येऊन बसेन तुम्ही माती टाकाल तेव्हां."

"तितकंच पुरे होईल आम्हांला !"

शेजारीं हरी झोपाळ्यावर पान नखलीत बसला होता. पोर रडत होतं, त्याच्या पाठींत चापटी घालीत म्हणाला,

"शिंच्याला जसं भुतानं धरलंय्! गप! गप नाहीं तर टकल्यांत मुसळ घालीन!"

कान देऊऽन आमचं बोलणं ऐकत होता. मी दामूअण्णांकडून निघाल्यें. एकदां वाटलं, जाऊं नये त्याच्याकडे. पण पुनः म्हटलं, त्याचंहि घर याच पाटावर जगतंय्. शिरल्यें अंगणांत. तो ओरडला,

"अंगो, ऐकलंस काय! अंबाव्हयनी आल्यै! पूर्वेचा सूर्य—"

"तुमच्याशींच काम आहे."

"माझ्याशीं? काय बा?"

"बांधांत माती चेपायच्यैय्. याल ना मदतीला?"

"बांधांत? ती कां?"

"बिळं केल्यैंत खेकड्यांनीं."

"असं असं! हें पा व्हैनी, ज्याची बाग उपाशी रहात असेल, त्यानं माती चेपावी बांधांत. आपली बाग बा धापल्यै आहे तेवढ्या पाण्यावर. काय समजलीस?"

"समजल्यें."

"येत जा मधनं मधनं. अञ्जाच विसरूं नका आम्हांला. रहातोंय तुमच्याच गांवांत."

ओठ चावला नि तशीच शारदाच्या घरांत शिरल्यें. म्हटलं, मागनं कोणी कळवलं नाहीं म्हणायला नको. उभेलावणं लावून सैंपाक करीत होती ती. ओटीवर अलीकडेच पोपट पाळलं होतंन् तो ओरडायला लागला, तशीं मागें वळून पाह्यलंन्. आश्चर्यानं म्हणाली,

"कोण? बाई?"

"हो."

"आज कुणीकडे? नी पुन्हा माझ्या घरीं?"

"हो. तुझ्या घरींच आल्यें."

हातांतले भेंडे खालीं ठेवलंन् नि हनवटीला हात लावून म्हणत्ये कशी,

"अग्गो बाई! यावं लागलं तर आमच्या घरीं आं?"

"हो. तुझं घर कांहीं वर्ज्य केलं नाहीं."

"म बसा तरी."

"पाट मांडूं नकोस. मला जायचंय् लवकर. बांधांत माती टाकायच्यैय्.

गडी देणारेस तुझा ?"

"माझा ? तो कां ?"

"तूं नाहीं पाटाचं पाणी घेत ?"

थोडा वेळ तशीच उभी राह्यली, नि मग म्हणाली,

"मी नाहीं द्यायची गडी."

"कां म्हणून विचारूं का ?"

"न विच्यारतांच सांगत्यें. बाग विकत्येंय् मी."

"कुणाला ?"

"सांगूं का ?"

"सांग ना !"

"व्यंकूभावजींना."

"कां ?"

"कां ? इच्छा माझी."

"अगो, वाडवडिलांनीं एवढी—"

"वाडवडील ? कुणाचे वाडवडील ? कुणीं काय बरं केलंय् माझं ? माहेरच्या माणसांनीं केलंय्, का सासरच्या ? मीं कां कुणाचं बरं करावं ? कुणीं कधीं आसरा दिला का मला ? आठवतंय् ? त्या दिशीं मी म्हणत होत्यें, बाई, मी तुमच्या घरीं येत्यें. घेतलीत का मला कुशींत ? फिरवलात का हात पाठीवरून ? जवळ घेतांत मला, नीट रस्त्यानं लावतांत, त आज ही परी झाली असती का ? कुणी अडपतं नाहीं, दडपतं नाहीं. नवरा आंधळा. जळ्ळं मेलं हें रूप ! मी चुकत होत्यें, त धरून दोन तोंडांत मारायच्या होत्यात. वडीलकीचा मान तुमचा होता. तें केलं नाहींत. आतां भोगा त्याचीं फळं ! मला काय—वाटेल तितके दिवस हितं राहीन. करमलं नाहीं, कीं मुंबैला जाऊन राहीन. जी बाजारांतच जाऊन बसल्यै, तिला काय ! जा तुम्ही बाई. पुनः माझ्या घरीं येऊं नका. हें घर तुम्हीं येण्यासारखं राह्यलं नाहीं !"

डोळ्यांतून निखारे फेकीत शारदा मागल्या दारीं चालती झाली. असं वाटलं, जाऊन पाय धरावे तिचे. सांगावं, बाई, चुकल्यें हो मी ! आतां चल माझ्या घरीं ! पण—

घरीं आल्यें त गुजाभावजी येऊन बसले होते. म्हणाले,

"कुठं गेल्तीस गो सकाळीं ?"

एकदां वाटलं, सगळं ओकून टाकावं. पण पुनः विचार केला, काय उपेग? भावजी तरी काय करणार?

"बोलत कां नाहींस गो!"

"भावजी, बांधांत माती चेपाच्यैय्."

"कां?"

"खेकड्यांनीं भारी बिळं केल्यैत."

"चेपूं मी नि गणू."

"मी येणाराय्."

"तूं कशाला!"

"उगीच. तुम्हांला मातीचीं टोपलीं भरून द्यायला."

दुपारीं मी, गणूभावजी, गुजाभावजी, दामूअण्णा, आमचा गडी, ठोसर, यादोनानाकडला गडी अशीं सगळीं बांधावर गेलों. जोश्यानं मातीसुद्धां घेऊं दिली नाहीं! पलीकडून मुरूम आणून घालावा लागला बांधांत. शेंदोनशें पाट्या टाकल्या, तेव्हां कुठं पाणी चढलं.

संध्याकाळीं व्यंकूभावजी चालले होते पाटावरनं. हांक मारून म्हटलं,

"भावजी—"

"काय गो वहिनी? मला म्हणत्येस कांहीं?"

"हो, तुम्हांला म्हणत्यें. आज बांधांत माती टाकल्यै. आतां एवढ्यातेवढ्या खेकड्यांनीं नाहीं भागायचं. पाट्यांनीं टाकायला हवेत हो खेकडे!"

"खेकडे? कसले खेकडे? मला नाय बा माहीत! कुणीं रांडेच्यांनीं सांगितलं? भांचोदाला बडवतों धरून—"

बडबडत जे सटकले आहेत...



नागोबाचं वारूळ म्हणून सांगितलं, तें होतं भिऊआबाच्या बागेंत. शेवटीं शारदानं बाग, घर, सगळं विकलंन् व्यंकूभावजींना, नि आपण भाडेकरी म्हणून राह्यला लागली आपल्याच घरांत!

रोज रात्रीं व्यंकूभावजी शेण खायला तिथं येत, नि आपलं घराचं भाडं घेत तिच्याकडून! गणूभावजी एकदां म्हणाले,

"आज व्यंक्याचं नि शारदावहिनीचं खूप कडाकलं!"

"भावजी, आपल्याला त्या घराशीं संबंध म्हणून ठेवायचा नाहीं. मरा मेल्यांनो! कडाडणार नाहीं त काय होईल? खूनहि पडतील तिच्यावरून!"

नि नेमकं माझं बोलणं खरं झालं. असं मेलं तोंड आहे! वाईट तेवढं नेमकं खरं होतं!

हें आपलं ऐकोवेकीं हो! प्रत्यक्ष मीं कांहीं पाह्यलं नाहीं. शारदेकडे म्हणे रात्रींबेरात्रीं होड्यांतून कुणीकुणी यायचं. कोण जाणे कोण होते, ते. पण एका दिवशीं सकाळीं उठल्यें तों आपली बातमी!

मैनी सुर्वीण आली अगदीं पहाटेस. म्हणाली,

"बाय—"

"काय गो?"

"हा माजा दात भारी दुकताऽ्. रातभर अस्सा दुकला, अस्सा ठनकला, का इच्यार आला, धोंडा घेऊन पाडून टाकावा!"

"मग म्हणत्येस काय?"

"काय न्हाय्? औशद घे काय तरी."

आतेसासूबाई हेंहि एक देऊन गेल्या होत्या मला. कुणीऽकुणीऽकुणी त्यांच्याकडे रडत यायचं. हें दुखतंय्, तें दुखतंय्. नि त्या द्यायच्या काय? आपलीं गांवठी औषधं हो! कुठं बिब्बा, कुठं हळकुंड, कुठं सुंठ, कुठं आवळकाठी, कुठं गवती चहा. त तेवढ्यानं आपले रोग बरे व्हायचे!

घरांत गेल्यें, नि इंद्रावन आणलं एक दुरडींतून सोधून. तें तिला देऊन म्हणाल्यें,

"हें बघ. याचा धूर घे. किडी असतील त पडून जातील सगळ्या."

"हां कसा करायचां?"

"करायचंय् काय त्यांत? चार निखाऱ्यांवर त्याच्या बिया टाक. नि धूर यायला लागला कीं निखाऱ्यावर फुंकणी उभी धरून तो तोंडांत घे."

"होऽहो—करीन." मग फुसफुस करीत म्हणाली, "बाय, तुम्हीं ऐकलां न्हाई काय अजून?"

"काय गो?"

"अवो, बंदरावर मुरदा मिळ्ला आज सकाळीं."

"मेल्यांनो! तो कुणाचा ग?"

"मना काय ठावं न्हाय्. पर हाय गडी शिरीमंत. पातळसूत धोतर, गरम

कोट, टोपी—असा तीसपस्तीस वर्साचा गडी हाय."

"नि तो या बंदरांत गो कसा?"

"मना न्हाय ठावां!"

"तर? तुला कसं माहीत नसेल? गांवांत कुणी कुठं शिंकलं, त तेंसुद्धां तुला कळतं."

"हो—तां खरां. त झालां काय, रातीं भरती होती अर्ध्या रातीं. तवा भरतीवर एक होरगा इला दाभोलेसून." मग तिनं मान डोलावून डोळे मिचकीत शारदेच्या घराकडे बोट दाखवलंन्.

"मरा मेल्यांनो! कवटाळीण मरतहि नाहीं एकदांची! नि मग?"

"मग काय नाय. त्यांतून इला व्हता म्हंतात हा बाबा. नि सकाळीं आपला मुरदा मिळा! त्वांड निसतां चेचून कारलाय् कांद्यासारकां!"

नि मग दिवसभर तो धिंगाणा सुरू होता. पोलिस, नि हवालदार, नि पंच! व्यंकूभावजींच्या पन्नास खेपा झाल्या असतील बंदरावर. करावं तसं निस्तरावं!

पण हें कांहीं बरं वाटेना मला. काय हें? गांव कसा मिळवला वाडवडलांनीं! काय कष्ट केले! कसे खपले या मातींत! किती घाम नि रक्त सांडलीं हें गांव वसण्यासाठीं! नि तिथं या अशा कारणासाठीं रक्त सांडावं? नि तेंसुद्धां त्यांच्याच एका सुनेपायीं?

गुजाभावजी आले तेच मुळीं एवढंसं तोंड घेऊन. म्हणाले,

"वहिनी, रांडेचीच्या डोसक्यांत धोंडा घालून मारून टाकावीसं वाटायला लागलंय्!"

"भलतं काय बोलतांय् भावजी?"

"रांडेच्चीनं गांवाच्या नांवाला काळोखी फासलीन्!"

"तिनं एकटीनं? नि तुमचे व्यंकूभावजी? हरी? त्यांनीं गांवाचं नांव उजळ केलं, नाहीं का?"

"असं काय बोलत्येस वहिनी?"

"खोटं बोलत्यें? बायकांनीं खाल्लं, त शेण खाल्लं! नि पुरुषांनीं खाल्लं, त औषध खाल्लं, नाहीं?"

"अगो हो! पण पुरुषांचं झांकून जातं. बायकांचा लगेच आरडा होतो!"

"मेलं असं वाटतं कधीं कधीं, कीं—"

"काय वाटतं?"

"नाहीं सांगत आतां!"

संध्याकाळीं काय वाटलं, कोण जाणे. उठल्यें नि शारदेच्या घरीं गेल्यें. एकटीच मागल्या दारीं कपाळावर हात देऊन बसली होती. भिंतीशीं उभी राहून हांक मारली,

"शारदे—"

"बाई!"

मला पाह्यलंन्, तशी जणुं कोसळून पडली डोंगरावरनं. उठली, नि धावत आंत गेली. बराच वेळ कांहीं हालचाल नाहीं, आवाज नाहीं! मला असं झालं, आतां उभी तरी किती वेळ राहूं!

शेवटीं निघाल्यें मी. तशीं दारांत आली, नि भरलेल्या गळ्यानं म्हणाली,

"कशाला आल्तांत बाई?"

"आल्यें होत्यें. काम होतं तुझ्याशीं. पण आत्तां नाहीं. तुझी वृत्ती ताळ्यावर नाहीं आत्तां—"

"नाहीं बाई—माझी वृत्ती अगदीं चांगली आहे आतां. सांगा."

"नाहीं!"

तशी दारांतून निघून आपली माझ्यासमोर येऊन उभी राह्यली! म्हणाली,

"बाई—शिवायची नाहीं मी तुम्हांला! विटाळ होईल माझा. काळजी करूं नका. पण काम काय तें सांगितल्याशिवाय कांहीं जाऊंहि द्यायची नाहीं!"

"सांगेन. पण तूं ऐकशील?"

"ऐकेन. गांवांत तुम्हीच एक अशा आहांत, कीं जिचं ऐकावं! सांगा."

"बाई, तूं आपली पडघवली सोडून निघून जा! मागं कांहीं पाशहि ठेवला नाहींएस. झाले धिंगाणे तेवढे पुरे झाले. एवढं करशील, त डोंगराएवढे उपकार होतील तुझे!"

कांहीं वेळ डोळे तारवटून माझ्याकडे पहात उभी राह्यली. मलाहि भीतीच वाटली. हो, घ्या काय—पण मग पटकन् आंसवं वहायला लागलीं डोळ्यांतून. म्हणाली,

"केव्हां जाऊं?"

मन दगडासारखं करून मीं म्हटलं,

"अगदीं उद्यांसुद्धां जा! उशीर नको आतां. जाशील?"

"हो. जाईन. उद्यांच जाईन!"

ढेपाळल्यासारखी आंत निघून गेली. काम झालं, असं समजून मी घरीं परतल्यें.

त्या रात्रीं झोप कांहीं येना. असं वाटायला लागलं, कीं कांहीं तरी चुकलंय् माझं. एका परीनं शारदेनं जात्यें म्हणून कबूल केलंन्, त्यानं बरं वाटायला हवं. पण तें बरं कांहीं वाटत नाहीं. अगदीं मुळापासून चुकलंय्. काय चुकलंय् तेंहि मेलं धड कळत नाहीं. शारदा हवी आहे का मला ?

हवी तरी कशी असेल ? मेलीनं सगळ्या गांवाला आग घातली ! काल सगळ्यांच्या हातांत बेड्या पडण्याचाच प्रसंग ! तिच्यामुळं आला तो. जाईल तेव्हां गांव सुटेल !

पण तिचा एकटीचाच का दोष आहे याच्यांत ? जर तिला जायला सांगितलं मीं, तर व्यंकूभावजींनाहि सांगितलं पाह्यजे. त्यांना त अगोदर सांगितलं पाहिजे. त्यानंच नासवलीन् तिला !

चांगली होती शारदा. गरीब. सोशीक. म्हणून तर आंधळ्या नवऱ्याबरोबर एवढे दिवस काढलेन्. एखादी केव्हांच काळं करून जाती. पण या मेल्यानं तिला भुरळ घातलंन्. वेण्या नि लुगडीं नि दगड नि धोंडे ! ती तरी काय करील बिचारी ? तिच्या मदतीला जायला हवं होतं त्या वेळीं. त्याच पाळीला हातांत खेटर घेऊन व्यंकूभावजीला सांगायला पाहिजे होतं, कीं मेल्या, गांवच्या सुनेला नासवायला निघालाएस काय ? घाल चुलींत तुझ्या वेण्या ! नि हितं पुनः तोंड दाखवलंस, तर खेटरपूजा करीन !

पण त्या वेळीं नुसती काडीनं औषध लावीत राह्यलें ! शारदा बिचारी रडलीहि होती. तेव्हां तिच्यामागं तिच्या आधाराला उभी राह्यलें नाहीं. नि आतां मात्र मोठा पुरुषार्थ करून आल्यें ! तिला सांगितलं, तूं गांवांतून जा !

एखादी असती त सांगती, जात नाहीं ! पण शारदा म्हणाली, हो. जाईन. उद्यां जाईन !

नको जाऊंस म्हणून सांगूं का तिला ? हितं माझ्या घरीं आणून ठेवीन. सुधारेल शारदा. न सुधारायला काय झालं ? तिचं तिला कळलंय्. पोथ्यांतून ऐकलंय् मीं. गणिकासुद्धां रामनामानं तरली म्हणे. मग ही न सुधारायला काय झालं ? जी जा म्हणाल्याबरोबर जात्यें म्हणाली, ती सुधारायला निघाल्यें तर सुधारेल सुद्धां !

मग ? जावं नी सांगावं तिला हें सगळं.

निघाल्यें. गणूभावजी झोपले होते ओसरीवर. आरडले,

"कोण तें?"

"कुणी नाहीं. मी."

"वहिनी, कुठं निघालीस एवढ्या रात्रीची?"

"चूक दुरुस्त करायला!"

"कसली चूक?"

"मग सांगेन."

"मी येऊं का बरोबर सोबतीला?"

"नको. आत्तां येत्यें पांच मिण्टांत."

अंधार गच्च होता. तरी रस्ता पायाखालचा होता. यादोनानांच्या ओटीवर उंडीच्या तेलाचा दिवा जळत होता. गडी घोंगडींत हातपाय गुंडाळून झोपला होता ओसरीवर. नि ती कुपाट ओलांडून अशी भिऊआबाच्या अंगणांत पाय टाकत्यें, तेवढ्यांत—

"रडत्येस काय अशी? कांहींसुद्धां झालं नाहीं! थेट मामलेदारसुद्धां माझ्या मुठींत आहे. वाकवेन तसा वाकतो. सरळ दडपून टाकील तो. तूं जायचं नाहींस हितून!"

"ऊं हूं! मला राह्यचं नाहीं हितं! आजवर झालं तें पुष्कळ झालं! सगळया संसाराचे धिंडवडे! मी उद्यां जाणार!"

"कुणीं सांगितलं तुला धिंडवडे झाले म्हणून? अंबीनं सांगितलं असेल—"

"त्या कशाला सांगायला हव्यात? नि नांव घेऊं नका त्यांचं. तुमच्या तोंडांत शोभत नाहीं तें! उठा! सोडा मला!"

रांडेच्यांनो! तस्सा पाय मागं घेतला नि घरीं पळाल्यें. अजून का मिळ्या मारीत बसलींत एकमेकांना?

आतां काय करूं? शारदा राह्यली हितं, तर हा मेला तिला छळल्याशिवाय नाहीं राह्यचा. एवढं झालं तरी पुन्हा गेलाच लुच्च्यासारखा तोंड खुपसायला! जाऊं दे तिला.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं शारदेची मोलकरीण पोपटाचा पिंजरा घेऊन आली, नि म्हणाली,

"बाय, यवरा सांबालायला सांगलाय् बायनीं."

"गेली का ती?"

तशी ढसढसा रडायला लागली ती. म्हणे,

"गेली होऽ बाय—जह्ला मेल्या येंकूखोताचा म्होरा ! मेल्यानीं नासवलीन् माज्या गुनाच्या बाईला. वाटुलां क्येलान् म्येलानीं सगलां ! त्याचांबी तसांच व्हईल ! कंदी न्हायचां नाय झाल्याविगर ! किती गुनाची होती माजी बाय ! सांगून गेली, हा पिंजरा यवरा न्हेऊन दे. नि सांग, माजा लय जीव होता याच्यावरं—सांबाला याला."

ठेवलान, नि रडत रडत निघून गेली. पिंजरा घेतला, नि ओटीवर टांगून ठेवला. काय मेलं पाखरूं तरी ! सारखं शारदा ! शारदा ! शारदा !

इवली हरभऱ्याची दाळ नि आमच्या मागं पांढऱ्या मिर्चीचं झाड होतं त्याची एक मिर्ची ठेवायला गेल्यें पिंजऱ्यांत त चावायला धावला ! मर मेल्या ! मग गणूभावजींनीं शीक घेतली एक नि तिचं भय दाखवून तें खाणं ठेवलं त्याच्यापुढं. खाईना ! म्हटलं, भूक लागली म्हंजे आपच खाईल.

संध्याकाळीं गुजाभावजी म्हणाले,

" वहिनी, कशाला ठेवलं आहेस तें दळिद्री पांखरूं ? सोडून दे !"

" नको हो. मांजरू खाईल—"

" कशानं खातंय मांजरू ? जाईल उडून. "

" नको. दिलायन एवढ्या कौतुकानं—"

" त्या वेसवेचं काय कौतुक ? "

असं तोंडावर आलतं उत्तर ! पण नको ! गिळून घेतलं. नि आतां या पोपटाला करायचं तरी काय ? कांहीं खात नाहीं, पीत नाहीं. सारखा शारदेचा जप चालवला आहेन् मेल्यानं !

रात्रीं मग चार शेंगदाणे, चिकूची फोड, मिरची असं त्याच्या पिंजऱ्यांत घातलं, नि म्हटलं, आतां खा कीं उपाशी रहा !

पहाटे पहाटे त्याचं आरडणं बंद पडलं. नि सकाळीं उठून पाहात्यें तों आपला पंख पसरून उताणा पडलेला ! तिचा जप करीत प्राण सोडलान् पांखरानं !

टचकन् पाणी आलं डोळ्यांत. गणूभावजींना म्हटलं,

" भावजी, मागं खळगा करा, नि त्यांत याला पुरून टाका !"



शारदा गेली, नि आपल्याबरोबर गांवाची कळा घेऊन गेली ! दामूअण्णांनीं

घराला कुलूप घातलं, नी मुलाकडे राह्यला ते निघाले. विचारलं तर्शी म्हणाले,

"अंबे, पाटाचं तें तसं चाललंय्. बागेला पाणी पुरेना झालंय्. ही राहात्ये दाभोळेस. मला आहे दम लागलेला. केव्हां उखडेल भट्टी, तें का सांगतां येतंय्?"

"नि मग बाग?"

"उरल्यै कुठं बाग? चारसहा माड नि दहावीस पोफळीच ना? सांगितलंय् गड्याला. करील तो जमेल तसं. नाहींतरी आमच्या मागं उन्हाळाच व्हायचाय्!"

दामूअण्णा गेले.

इतके दिवस आबा नी रंगूभावजी दोघे दापोलीस होते. आबा भराभर शिकत चालला. आतां त्याच्यावरच मदार. पण पोर हितं यायचं, त म्हणायचं करमत नाहीं म्हणायचं!

"कां रे करमत नाहीं?"

"हितं मैदान नाहीं. पत्ते नाहींत. हाटेलं नाहींत."

"रांडच्च्या! हाटेलांत जातोस का काय?"

"नाय गो! जात नाहीं हाटेलांत; पण बघायला बरी मजा असते. रात्रीं बत्ती लागत्येय् पेट्रोमॅक्सची—"

"दाभोळेस रात्रीं बंदरावर लावतात तसली?"

"हो!"

"रोज लावतात?"

"हो!"

"खूप माणसं जमत असतील बत्ती पाह्यला!"

"नाय बा. नी फोनोग्राफ आणलाय् एक हाटेलांत."

"म्हंजे रे काय?"

"म्हंजे असं यंत्र असतं. तें चालू केलं म्हंजे गाणं वाजतं."

"रांडेच्च्यांनो! खरं काय!"

"खोटं का सांगतांय् मी? तुला नाहीं तिथली मजा कळायची! शहर फार चांगलं. हितं खेड्यांत काय आहे डोमलं?"

हें अस्सं बोलायचा! इथून केव्हां एकदां पळतोंय् कापास असं होऊन जायचं त्याला. त्यांत गुजाभावजी एकदां कापाहून आले, नि त्यांनीं एक नवीनच सांगितलं! पाणीबिणी प्यायले, नि म्हणाले,

"वहिनी, पोरांचं कल्याण व्हायची वेळ आल्यै!"

"अगोदर तारखेचं काय झालं तें सांगा."

"व्हायचांय् काय? तारखावर तारखा चालल्याएत. वकिलांची धन होत्येय्. पण मीहि म्हणावं गुजा आहें नांवाचा. बाग विकून उन्हाळा झाला तरी चालेल. पोर नाहीं बाळ नाहीं. पण व्यंक्याला खारं पाणी पाजीन खाडीचं, तेव्हां बरं वाटेल मला."

"नि कल्याणाचं काय म्हणत होतां?"

"अगो, पाद्री असा खूष आहे रंग्यावर?"

"कां?"

"अगदीं तेलबुद्धि का काय म्हणतात, त्यांतला झालाय् रंग्या!"

"खरं का काय?"

"खोटं का सांगतांय् मी?"

"भावजी, एवढं केलंत, तें कारणीं लागलं हो!"

"लागेल त काय! स्वतः पाद्री त्याला शिकवितो. नि आतां कसा झालाय् बघ! ओळखायची नाहींस तूं! त पाद्री म्हणाला, मुंबैला ठेवा. तो पत्र देतों म्हणे. तिथं चांगली वेवस्था होईल दोघांच्याहि शिकण्याची."

"मुंबैला?"

"हो. भिऊं नकोस! त्रिंब्याचा सासरा म्हणाला, कीं मुंबैस त्याचाच चुलत-भाऊ आहे. म्हणे, त्याच्याकडे करतों त्यांची सोय."

"पण भावजी, मुंबैला नको बाई!"

"कां गो? पोराचं बरं होतंय् तुझ्या. अशी आडवी कां येत्येस मधें?"

"आडवी कशानी यीन! पण—"

"काय् काळजी करूं नकोस. मी दर महिन्यास खेप टाकीत जाईन मुंबैला. नि दिवाळीला, गौरीगणपतीला पोरं येतच जातील."

"खर्च काय यील?"

"जो काय यील तो यील. एकटा मुलगा तुझा. करायला नको?"

"करीन हो! हें सगळं त्याच्याकरतांच त करत्येंय. पण एवढा दूर—"

"तूं काळजी करूं नको म्हटलं ना! मुलगा मामलेदार होईल, तेव्हां बरीक अंगावर शाल पांघरून मिरवशील मामलेदाराची आईस म्हणून!"

"बरं बाई! करा तुम्हांला काय बरं दिसेल तें. तुम्ही काय वाईट का करणारांत!"

दोघेहि चार दिवस घरीं आले. खरोखरीच मीं ओळखलं नाहीं रंगूभावजींना. केवढा बदल झाला होता त्यांच्यांत! बुद्धीचं तेज असं तोंडावर दिसायचं. नि शांत, हंसरा चेहरा. फारसे बोलायचे नाहींत. विचारलं तेवढ्याचं उत्तर द्यायचे. दिवसभर पुस्तकं वाचीत असायचे.

नीट सगळी तयारी करून दिली, नि गुजाभावजी स्वतः निघाले मुंबैला त्यांच्याबरोबर. अगदीं ठरवलं होतं डोळ्यांतून पाणी काढायचं नाहीं म्हणून. पण मेलं तें उभं राह्यलंच आयत्या वेळेवर.

"नीट संभाळ हो प्रकृतीला! खाण्यापिण्यांत अघोञ्चरपणा करूं नकोस! नि नीट पत्रं धाडीत जा. नि हें बघ, रात्रींचं वातुळ खाऊं नयें; मानवत नाहीं तें तुझ्या प्रकृतीला!"

"वह्यनी, मी जातांय् ना त्याच्याबरोबर! करीन सगळं नीट."

हे तिघे गेले. गणूभावजी त्यांना पोंचवायला बंदरापर्यंत गेले. नि मी घरांत एकटी राह्यल्यें. मागं जनी तेवढी भांडीं घाशीत होती.

असं वाटायला लागलं, कीं सगळीं गेली, आपणहि कुठं पळून जावं! अगदीं वरल्या घरापासनं हिशेब घ्या. अंबूनानांचा एकटाच मुलगा हितं. बाकी तिघे बाहेर. कुशाल्याचं घरच बंद. जोशानं आपलीं पोरं दाभोळेस ठेवलेलीं. ठोसर एकटा. आमच्या घरीं ही परी. यादोनानांची बायको काय ती हितं. शारदेच्या घराचं तं तसं झालं. दामूअण्णांच्या घराला कुलूप!

कशाला राह्यचं या मसणवस्त्यांत? सगळं रान रात्रींचं जसं खायला धांवतं!

नि त्यांत व्यंकूभावजी लागले वेडचाळल्यासारखं करायला!

शारदेच्या घरामागं नागोबाचं वारूळ होतं. त्याच्या शेजारीं उंबराचं झाड. पाटाचं पाणी कमी झालेलं. तशी त्यांनीं तिथं बाव खणायची ठरवली! कुणा पाणाड्यानं सांगितलं म्हणे, कीं तिथं भरपूर पाणी आहे! सात बाजांचं सुंभ लावलं तरी ठाव मिळायचा नाहीं, इतकं!

एका दिवशीं आपले दाभोळेहून गडी आणलीं, नि तें वारूळ उकरायला लागले! गुजाभावजींनीं पाह्यलीं, तशीं त्यांच्याच्यानं राहवलं नाहीं. म्हणाले,

"व्यंक्या, अरे तुला सांगूं नये! पण तें बापजाद्यांनीं नागोबाचं ठिकाण, म्हणून हात न लावतां तसंच सोडलं होतं! खणूं नकोस तें!"

"फिर्याद लाव माझ्यावर! जा! एक लावल्यैसच, दुसरी लाव! म्हणावं, हा वारूळ पाडताय्!"

"तुला धडी गोष्ट कांहीं सांगायची सोय नाय्—"

"सांगूंच नकोस तूं! समजलास? जागा माझी आहे. मीं विकत घेतल्यै. काय वाटेल तें करीन मी! समजलास?"

"समजलों ऽ समजलों! काय वाटेल तें कर! मग मात्र म्हणूं नकोस सांगितलं नाहीं म्हणून!"

भराभर गडी खणायला लागले वारूळ. तों असा वावभर नाग फों फों करून धांवला बाहेर! कुदळ्यांनीं नि काठ्यांनीं चेचलीं नि कुठं विसांवताहेत तों दुसरा! जोडाच होता त्या वारुळांत. तो तर चावायचाच एक्या गड्याला. पण बचावला. त्यालाहि मारला. आंत अंडीं सांपडलीं तीं फोडलीं, त कांहींतून निघाला बलक नि कांहींतून वीत वीत किरमं! तींहि धरून चेचलीं.

तिथं पाणी खूप लागलं. पण बांधायला लागले, तशीं दगड म्हणून धर घेईनात! नाना परी केलीं, नि शेवटीं नाद सोडली विहीर बांधायचा.



मारुतीचा उत्साव दर वर्षी चैत्रांत व्हायचा. गेलीं आठदहा वर्सं आपला सुमारच उत्साव करायचा. सकाळीं जल्माच्या वेळीं मारुतीला अभिषेक नि दोन ब्राह्मण जेवायचे आमच्या घरीं. पण यंदां [illegible] मुलगा चार दिवस हवा पालटायला म्हणून येऊन राह्यला कोरड्या हवेवर. दाभोळेपरीस इथली हवा कोरडी. म्हणून वैद्यानं हितं धाडलंन् त्याला. अंबूनानाचे मुलगेहि दोघे घरीं आले उन्हाळ्यांत सुट्टी घेऊन. यादोनानाहि परतले मुलांना घेऊन. परत तेवढ्यापुरता गांव भरलेला दिसायला लागला.

गुजाभावजी असे नुकतेच येऊन टेकले. गडी हुज्जत घालीत होता गणूभावजींबरोबर.

"यवरा ब्येरना काय व्हायचा न्हाय् माज्याच्यान्."

"न व्हायला काय झालं? आमचा काल्या करीत होता."

"व्हय् त्यें खरां हाय्. पर आतां जिमीन निसती कडक! पानी कमी होत चालला ना!"

तेवढ्यांत अंगांत गरम घातलेला दामूअण्णाचा बाळू छातीवर हात ठेवून आला, नि ओटल्यावर बसला. गुजाभावजींनीं विचारलीं,

"काय रे बा? तब्येत काय म्हणत्ये?"

"काय म्हणाची ? बरी आहे. गुजाकाका, मारुतीचा उच्छाव कधीं ?"

"महिन्यावर आलाच कीं !"

"त मी काय म्हणत होतों, यंदां जरा जोसांत करायचा."

"कां रे बा ?"

"काय करमत नाहीं गांवांत. तेवढीच जरा खळबळ होईल. अनायास आलेत सगळे. खूप वर्सांनीं गांव भरलाय् पुन्हा. त काय म्हणतों मी. यादोनानाचा नारू आहे. नाटकबिटक करूं. काय समजलेत ?"

यादोनाना पलीकडे जानवीं वळीत होते. ते म्हणाले,

"गुजा, संगीत झालं पाह्यजे हो ! प्रोजनीं मजा नाय यायचा !"

"पण गाणार कोण ?"

"हात्तेच्या ! एवढंच ना ? मी करतों तयार. तुमच्या वाटेल तसला पार्टी असूं दे. त्याला आ करतां आला कीं पुरे. बाकीचं माझ्याकडे लागलं."

"मग उद्यां संध्याकाळीं घ्या गांवकीची बैठक."

"कुठं ?"

"हितंच घ्या कीं थोरल्या घरीं !"

"हितं नको."

"कां ?"

"व्यंकूची पार्टी यायची नाय हितं."

"न येतील त तेल घालीत गेले !"

"गुजा रे, गांवकींत असं करून भागत नाहीं ! मारुतीच्या देवळांतच कां घ्या ना !"

"ब ऽ रं—मारुतीच्या देवळांत !"

दुसऱ्या दिवशीं मारुतीच्या देवळांत गांवकी भरली. हळूहळू सगळे आले. सगळ्यांत म्हातारे यादोनाना. ते म्हणाले,

"व्यंकू रे, या मंडळीचा विचार असा आहे, कीं यंदां उच्छाव जरा जोसांत करायचा. नाटकबिटक—काय समजलास ?"

"समजलों."

"मग ? तुझा काय विच्चार ?"

"करा कीं !"

"करा कीं म्हणून कसं चालेल ? तूं नमरशेट. तूं हवासच."

"कशाला मी? उगीच तंडणं होतील."

"नाय होत तंडणं. सगळ्यांनीं समजुतीनं घेतलं, कीं नाय होत. मग?"

"करा करा. मी आहेंच तुमच्यांत."

"मग गुजा, कसं कसं?"

"काय रे बा बाळू? सांग."

"सांग काय? मीं काय सांगायच्चा? कोणचं नाटक करायचं तें ठरवा."

"गुजा, संगीत हां!"

"हें पहा यादोनाना, प्रोज नाटक असलं, तरी त्यांत पदं घालूं आपण. पण दगदणीत पाह्यजे बा! ऐतिहाशिक काढा एखादं."

"हो रे बा. इतिहाशिकच होऊं द्या."

"हें पहा, त्या तुमच्या पोतनिसानं का कारखानिसानं लिहिलंय् सूर्यग्रहण. शिवाजीचं नाटक आहे. बरं आहे तें. मीं म्हाडास पाह्यला होता प्रयोग."

"सूर्यग्रहण? आपण नाहीं बा नांव ऐकलं."

"हें पहा हन्या, तूं जगांत पुष्कळ वस्तूंचीं नांवं ऐकलीं नाहींस. गूजबेरी म्हंजे काय माहीत आहे?"

"गूजबेरी? तुपाची बेरी निघत्ये कढल्यावर त्यांतलं असेल कांहीं."

"शहाणा आहेस. तें आहे एका फळाचं नांव. म्हाबळेश्वरीं मिळतात. तात्पर्य काय, गुजा, तुझं सूर्यग्रहणच बरं आहे रे!"

"बऽरं! पार्टी कोण कोण?"

"तें मग पाहूं रे. नाटक आणूं दे, नि मग ठरवूं. बारं. पुढं काय?"

"पुढं काय? एखादा कीर्तनकार बोलवावा च्यार दिवस. होऊं देत कीर्तनं."

व्यंकूभावजी म्हणाले,

"हें पा, आपण पुष्कळ कीर्तनं ऐकलीं. पण शिरढोणकर—वा रे शिरढोणकर! काय लावण्या म्हणतोय्! आहा!"

"कीर्तनांत?"

"नाहीं त काय तमाशांत? अरे, भर कीर्तनांत लावण्या म्हणतो! पण अशा तशा नाहीं हो! राधाकृष्णाच्या. आहा! काय बरं लावणीचं तोंड—माझ्या अगदीं जिभेवर होतं—विसरलों!"

"हें पहा व्यंक्या, उच्छाव आहे मारुतीचा. तेव्हां लावण्यावाला बुवा नापास! काय समजलास? वांईकर बुवा बोलवायचा." गुजाभावजी ठणठणले.

"यादोनाना, मीं अगोदरच सांगितलं होतं. मला याची ही सोटेशाई माहीत होती. तुम्हांला काय करायचं तें करा. माझ्याकडून चाराठ आणे घ्यायचे रीतीप्रमाणं ते घ्या!"

"असं काय करताहेस व्यंकू? आपण समेट् करूं. बुवा गुजा म्हणेल तो बोलवायचा नि नाटकांत शिवाजीचं काम तूं सांगशील त्यानं करायचं. आहे कबूल?"

"बराय्. आतां तुम्हीच म्हणताहांत—"

"तर रे काय! अरे, आज अनेक वर्सांनीं योग येतोय्—"

"नि यादोनाना, समाराधनेचं कसं?"

"करूं या कीं! आहे काय त्यांत? मांडव घालूं झक्कसा मारुतीपुढं नि चालूं द्या जल्लोश!"

"पण काय करायचं?"

"हें पहा, तें अंबावहिनीला ठरवूं दे. बायकांची म्होरकी ती. तेव्हां ती करील तो बेत."

"बराय्. मग वर्गणी?"

"हो. बोला. व्यंकूशेट!"

बरीच घासाघीस, भांडणं, अगदीं तुटेस्तोंवर झालं. पण मग काय वाटलं कोण जाणे, शेवटीं आले सगळे सुतावर. आंकडे ठरले.

गुजाभावजी येऊन म्हणाले,

"वह्यनी, आबाला नि रंग्याला बोलावतों."

"बोलवा कीं! मला काय? तेवढंच पहायला मिळेल पोर!"

सूत्रं हलायला लागलीं. नाटकाचं पुस्तक आलं, सहाव्या का आठव्या दिवशीं आबा नि रंगूभावजी आले. सगळा गांव पुनः जागा झालाय् जणूं कांहीं!

संध्याकाळीं अशी तुळशीजवळ बसली होत्यें. डोळ्यांत उगीचच पाणी आलं. आबा नि रंगूभावजी दोघे फिरून आले. आबा मला हांका मारीत आला.

"आई, ए आई, यंदां काय सुरेख मोहोरलीं आहेत कलमं!"

माझ्यापाशीं आला नि माझ्या डोळ्यांतलं पाणी पाहिलंन् तशी म्हणे,

"हें काय गो आई? रडत्येसशी?"

"नाय रे! ये तूं असा. जवळ बस माझ्या."

माझ्या गळ्यांत पडत म्हणाला,

"पण तूं रडत्येस कां तें सांग."

"उगीच."

"उगीच म्हंजे ?"

"अरे, उगीच म्हंजे उगीच हो ! गांव पुनः भरलाय् ना ? तें पाहून पाणी आलं हो डोळ्यांत ! कुठं कुठं गेलतेत ?"

"सड्यावर जाऊन आलों. येतांना गुजाकाकांच्या घरीं गेलों. ते वर्गणी गोळा करीत धांवताहेत. अगो, जो भेटेल तो रंगूकाकाकडे पाहून विचारतोय्, रंगू किल्लेदार, बरे हाव ना ?"

"विच्यारायचेच्च !" हळूच मीं विच्यारलं, "काय रे, रंगूभावजींचा अभ्यास बरा चाललाय् ना ?"

"वेष्ट !"

"म्हंजे ?"

"म्हंजे फार चांगला. एकच वाईट आहे."

"काय रे ?"

"अगो, रंगूकाका माझ्यामागून शाळेंत जायला लागला नि माझ्या अगोदर मेट्रिक होणार !"

"मेल्या ! वाईट काय आहे त्यांत ?"

एवढ्यांत [illegible] गडी आला.

"ओ आबा खोत, येंकू खोताकर जमायच्याय् आज रात्रीं !"

"कशाला रे ?"

"तां मना न्हाय ठावा. म्हनाले, इच्यारलीं त नाटकाचे पार्टी का काय त्यें सांग."

"बराय् रे."

रात्रीं परतले तिथे, नि आबा म्हणाला,

"गणूकाका, तूं म्हण कांहींहि ! नाटकाच्या पात्रांची निवड कांहीं आपल्याला पसंत नाहीं."

"अरे, पण व्यंकूला पास आहे ना ती निवड ? त्याच्या पसंतीनं करायचं असं ठरवलंय्."

"हेः ! व्यंकूकाकाचा भाऊ असला म्हणून काय झालं ? केरू काय शिवाजी होय ? शिवाजी असा होता ? बोंड्या नाकाचा ? पाण्याचं पितर ? झोल्याचा

शेकाटा? धड शब्द बोलता तरी येतोय् का त्याला?"

"आबा, अरे महाप्रयागांनीं गांवकी एकत्र आल्यैय्. तेव्हां आतां होऊं दे काय व्हायचं तें."

"व्यंकूकाका म्हणे कसा, याला शिवाजी करायचं असेल, तर नाटक करायचं. नाहीं तर नाटक बंद. असा राग आला कीं—पण तुम्ही सगळे गप्प बसलेत, म्हणून मीहि गप्प बसलों. नि हरि म्हंजे काय जिजाबाई होय रे?"

"अरे आबा—!"

"बोबा हरी, नाकावर चांगला वालाएवढा मस! आवाज त असा, कीं बोलायला लागला म्हंजे जणूं आभाळ गडगडतंय्सं वाटतं! त्याला यादोनाना जिजाईचीं पदं शिकिवणार—नि तीं पदं करणार गोप्या जोशी! आनंद आहे! छान होणार तुमचं नाटक! वेष्ट!"

"पुरे रे आबा! आपण बोल्रं नये मोठ्या माणसांत."

"कां बोलूं नये? नि सांगूं का आई? गणूकाकाला हुजऱ्याचं काम दिलीं. मला म्हणत होते, कॉमिक स्त्रीपार्ट करतोस का म्हणून."

"मग काय म्हणालास तूं?"

"काय म्हणायचंय्? साफ नाहीं म्हणून सांगितलं. तशीं केऱ्या म्हणे कीं मग आबा कटाप. मीं म्हटलं, कटाप त कटाप! अगो, शिवाजीचं काम द्यायचं मला! असा छान दिसलों असतों! नि रंगूकाकांना म्हणे, मुसुनमान शिपायाचं काम करतोस का? तेहि नाहीं म्हणाले."

"बरं झालं!"

मग गणूभावजी हुजऱ्याचं काम पाठ करायला लागले. काम तरी कितीसं होतं? येवढंसं. पण त्यांना तेवढंच कौतुक!

मांडव घालायची पाळी आली, तशीं व्यंकूभावजींच्या बाजूनं काढलीं आपलीं नखं बाहेर! पोफळींचे खुंटे मागायला गेले, तशी म्हणे,

"तें काम थोरल्या घराचं. त्यानं करावं तें सगळं. आम्ही नुसते वर्गणीपुरते मालक."

ठीक आहे! थोरल्या घराचं त थोरल्या घराचं. गुजाभावजींच्या पायाला उसंत नाहीं. बारा बारा वाजेपर्यंत रात्रीं हिंडताहेत. हिकडून हें आण, तिकडून तें आण. नि मग मला हांका मारून म्हणायचे,

"वहिनी, खायला दे कांहीं तरी! जेवण झालं नाहीं दिवसभरांत."

मीं चांगले पोहे थोरली पातेलीभर धुवावे, त्यांत दूध, गूळ घालावा नि द्यावेत त्यांच्या पुढं. त्यांनीं दिवसभर कोण कोण काय काय म्हणालं तें ऐकवावं. ते हात धुवायला उठताहेत, तेवढ्यांत तिघे तालमीहून यावेत. नि मग चालायच्या आबाच्या कुचाळक्या. हा अस्सं बोलला, नि तो तस्सं बोलला !

कांहीं कां असेना, दिवस पुनः पालटलेसे वाटायला लागले. तेवढ्यांत ब्रनूवन्संहि आल्या. नि मग तर काय ? मजाच मजा !

मांडव ,याच सताठ जणांनीं घातलीं. व्यंकूभावजी, केरू, गोप्या जोशी, हरि फोजदार, कुण्णी आलं नाहीं. निमित्यं सांगून बाजूला झाले. गुजाभावजी संतापलेच. पण यादोनानांनीं कसंबसं शांत केलीं त्यांना.

गुजाभावजींच्या पत्राप्रमाणं वांईकरबुवा आले. त्यांच्याबरोबर त्यांचेच दोघे मुलगे. एक तबला वाजवायचा, नि एक पेटी. बुवा आमच्याच हितं उतरले.

[illegible] कीर्तनं सुरू. बुवांना विच्यारलं,

"बुवा, आख्यान कोणतं लावणार ?"

"कोणतं ? तुम्ही सांगाल तें."

"असं कांहीं तरी लावा. सगळ्यांना वाटलं पाह्यजे, तुम्ही आम्ही सगळे एक !"

"बरं. घोषयात्रेचं लावतों."

बिछाइती, बत्त्या, सगळं आम्हींच केलं. कीर्तनाची वेळ झाली. पोरंसोरं अगोदर गर्दी करून पुढं बसलीं. पण व्यंकूभावजींच्या पक्षाचीं पोरं दिसेनात ! कीर्तन उभं राह्यलं. आम्ही सगळ्या जणी एक्या बाजूला बसलों. दुसऱ्या बाजूला पुरुष मंडळी. बुवा उभे राह्यले. मंगलाचरण झालं, पहिला अभंग झाला, भजनहि सुरू झालं. तेव्हां मग खुंटासारखे एकेक जण आले ! देवाला नमस्कार केलीं, नि बुवांना नमस्कार न करतां सगळ्यांच्या पुढं ओळीऽनं बसले ! व्यंकूभावजी, फोजदार, गोप्या, हरि, केरू, सद्या, सगळे !

त्यांचा पोरवडा सगळा बाहेर !

पूर्वरंगांत बुवांनीं मारे हसूं येईल अशा गोष्टी सांगितलीं. पण पुढल्या सहासात जणांच्या तोंडावर ढीम नाहीं ! बुवांनाहि चेव आला. त्यांनीं अगदीं आपलं सगळं कसब पणाला लावून कुंभकर्ण नि न्हाव्याची गोष्ट सांगितली. हंसून हंसून आमची पुरेवाट झाली; पण हे मुखंड आपले चौकोनी तोंडं करून बसलेले !

नि बाहेरचं कौतुक ऐका आतां! जसजसे बुवा हंसायच्या गोष्टी सांगत, तसतशीं बाहेरचीं पोरं वेडेविद्रे सूर काढून रडायचीं! नि बुवा कांहींतरी गंभीर सांगायला लागले, कीं बाहेर त्या टुल्लर कार्ट्यांचा हंशाचा कल्लोळ!

तावातावानं गुजाभावजी उठले, नि बाहेर जाऊन म्हणाले,

"ए:! भुतावळ रांडेच्ची! चूप बसा. नाहींतर हग्या मार दीन एकेकाला!"

तेवढ्यापुरतं बाहेरचं गप्प. नि गुजाभावजी आंत आले, कीं पुन: तोच चारगटपणा सुरू!

बुवांनीं छान आख्यान सांगितलं. पण हे चारसहाजण अगदीं दगडी पुतळ्यांसारखे बसलेले! पसंती नाहीं, नापसंती नाहीं!

कीर्तन आटपलं नि आरती सुरू झाली. बुवांना ओवाळायचं, पैसा टाकायचा, कडकडून दोअंगांनीं भेटायचं, प्रदक्षिणा घालायची, नि बाजूला येऊन उभं राह्यचं. या पाळीला सगळीं बाहेरचीं पोरं आंत आलीं.

आरती सुरू झाली, तशीं मी नि बनूवन्सं दोघी बाहेर पडून घरीं निघालों. बुवांना दूध तापवून द्यायचं होतं. थोड्या वेळानं बुवा, आबा, सगळी मंडळी आली. बुवा आंगांतलं काढून झोपाळ्यावर बसले. हळद घातलेलं दूध पीत ते म्हणाले,

"गुजाभाऊ—!"

"काय बुवा?"

"हीं कीर्तनं नाहीं व्हायचीं माझ्याच्यानं. तुम्ही आपला दुसरा बुवा पहा."

आम्हांला सगळ्यांनाच आश्चर्य वाटलं.

"बुवा, अहो, एवढं कोवळं अंग ठेवून कसं चालेल? या गांवांत दोन पक्ष आहेत."

"होऽ! म्हणून तर मीं तुम्हांला धोपयात्रेचं आख्यान लावायला सांगितलं होतं!"

"दोन नाहीं, चार असूं देत. पक्षांना नाहीं घाबरत मी. अहो, पुणं-मुंबैला अटीतटीचे फड जिंकलेत मीं! काय समजलांत? पण हें असं—"

"झालं तरी काय?"

"बाहेर पोरं कुणाचीं होतीं?"

"गांवांतलींच होतीं."

"त्यांनीं आरतीच्या वेळीं माझ्या पायांना चिमटे काढले नी कांटे टुपले!"

"रांडेच्च्यांनो! बघूं?"

कंद्या घेऊन बघितलं तों खरंच! सबंद पायांवर ओरखड्यांच्या खुणा होत्या, नि एकदोन जागीं रक्त सांकळलं होतं!

"अहो, एवढ्यानं भागलं नाहीं. पुढं ऐका."

"काय केलं साल्यांनीं?"

"आरतीच्या ताटांत खडे पहा किती टाकलेत ते! टुप्प! टुप्प! मी म्हणतोय् कीं आरतींत आज बरेच पैसे जमले!"

"तुम्ही काळजी करूं नका बुवा. उद्यां मी एकाहि कार्ट्याला आंत येऊं द्यायचा नाहीं. शिपटी घेऊन दारांत उभा राहतों!"

"अहो, पोरांना झोडून काढाल गुजाभाऊ तुम्ही. पण थोरांना?"

"थोरांना?"

"हो."

"त्यांनीं काय केलीं?"

"अहो, सांगितलं तर तुमचा विश्वाससुद्धां बसायचा नाहीं! साक्षी नाहीं नी पुरावा नाहीं."

"सांगा त खरं."

"ते मागून येऊन पुढं कोण बसले होते?"

"बऽरं! काय केलं त्यांनीं?"

"त्यांतल्या त्या दोघाचौघा तरुणांनीं काय केलीं, आरती ओवाळली, मला कडकडून भेटले. मी चकितच झालों. नि माझ्या कानाजवळ तोंड आल्यावर काय सांगतात गुपचुप माहीत आहे का?"

"काय?"

"एक एका कानांत म्हणे, तूं हजाम आहेस—नि दुसऱ्या कानांत म्हणे, तूं न्हावगंड आहेस!"

"साल्यांनो!"

"दुसरा म्हणे, तुझं तंगडं तोडतों, नि तुझं टाळकं फोडतों!"

गुजाभावजी नुसते तांबडेलाल झाले! आबा तोंड लपवून हंसायला लागला. भावजी त्याच्यावरच उखडले.

"आब्या! गधड्या! तडाखा का खायचाय्?"

आबा उठून घरांत पळाला. बुवाहि हंसायला लागले. नी मग म्हणाले,

"अहो, कीर्तनं उधळून लावण्याचे दम मला कांहीं ठिकाणीं दिले गेले. पण हा कोंकणी मासला कांहीं और आहे बुवा! मग सांगा गुजाभाऊ, अजून मला कीर्तनं करायला सांगतां का तुम्ही?"

गुजाभावजी भडकले,

"कट करून आल्ते भांचोद! उद्यां टाळकीं सडकतों एकेकाचीं!"

"अहो! तेवढं करूं नका! मीच पायां पडतों तुमच्या. नुसतं समजुतीनं सांगा. काय समजलेत? मी करतों सप्ता पुरा. आलोंच आहें आतां, तेव्हां तड लावल्याशिवाय कांहीं जात नाहीं!"

दुसऱ्या दिवशीं गुजाभावजींनीं काय केलीं कुणास ठाऊक, पण चावटपणा थांबला. हे चार चौथे यायचे, नि मागं बसायचे.

आबा, गणूभावजी, गुजाभावजी, यांचीं कसलीं तरी गुपितं शिजायला लागलीं. पौर्णिमेला सकाळीं जन्म झाला, नि गुजाभावजी दाभोळेस खेप टाकून आले.

त्या दिवशीं संध्याकाळीं नाटक, नि दुसऱ्या दिवशीं समाराधना. गणूभावजी सकाळीं गेले, नि सांगितलीं,

"ऐकलंस का व्यंकू! मला नाय नाटकांत काम जमायचं."

"कां रे? मग अगोदर नये सांगूस? आयत्या वेळीं हुजऱ्या कुठून आणायचा?"

"माझं पोट दुखायला लागेल आयत्या वेळीं, हें मला भुतानं येऊन कानांत सांगितलं होतं काय माझ्या?"

"बारं बारं! आहे काय काम? हुजऱ्याचंच ना? करूं कोणीतरी उभा."

स्टेज बांधलीं, पडदे लावलीं. सगळे त्यांचे ते. आबा गेला मदतीला त त्याला नको म्हणाले. म्हटलं बलाय् गेली!

दुपारीं अंग टाकलं, नि जरा कुठं डोळा लागतोय, तों गुजाभावजी सगळ्या गांवाला हांकारा घालीत आले. लांबून लागले आरडायला,

"वहिनी, ए वहिनी—"

चमकून उठल्यें. म्हटलं, एवढं झालं तरी काय!

"अगो, दावा आपल्यासारखा झाला!"

"खरं क्काय भावजी?"

"अगो हो! ही बघ वकिलाची चिठ्ठी आल्यै! मामलेदार आला ना नवा? त्यानं फैलावर घेतली केस नि निकाल दिला! रंग्या कुठाय्?"

आरडा ऐकून रंगूभावजी आंतून बाहेर आले.

"रंग्या, तूं जिंकलास! आतां चल व्यंक्याच्या दारीं. रांडेच्याचं मानगूट धरून ओकवतों आजपर्यंत खाल्लंन् तें!"

"लगेच मिळेल ना ताब्यांत?" मीं विचारलं.

"न कां मिळेना! त्याच्या वकिलानं लगेच अपील केलंय् म्हणे रत्नागिरीला. करूं दे गो! आतां मला दहा हत्तींचं बळ आलं!"

"भावजी, तुम्ही होतेत, म्हणून झालं हो एवढं!"

रंगूभावजींना काय वाटलं कोण जाणे! आंत गेले. देवांना नमस्कार केलीं, नि बाहेर येऊन गुजाभावजींच्या पुढं वांकले.

"रडताहेस काय रंग्या? अगोदर वहिनीच्या पायां पड."

"माझ्या कशाला? वयानं तुम्ही माझ्यापेक्षां वडील!"

"पण नात्यानं तूं मोठी."

"औक्षवंत व्हा! भावजी, आतां सत्यनारायण करायचा बरं का! मी बोलल्यें देवाला."

"करूं गो करूं! टोलेजंग पूजा करूं!"

"नि भावजी,—तुम्ही नाहीं—रंगूभावजी, अगोदर लोणच्यांब्याशीं जाऊन गिऱ्होबाला गूळपोहे ठेवून या बघूं!"

आबा, रंगूभावजी दोघेहि गेले.

संध्याकाळीं ही सगळी मंडळी लवकरच जेवली. बुवा दुसऱ्या दिवशीं जायचे होते. त्यांचे मुलगे नाटकांत पेटीतबला वाजवणार. बुवांना रात्रीं जेवायचं नव्हतं. म्हणाले,

"अहो आबासाहेब, आम्हीहि येऊं बरं का नाटक पाहायला!"

"जरूर! तुम्ही तर हवेच अहांत. पहा तर खरी कशी गंमत करतों ती!"

मी म्हणाल्यें,

"कसली रे गंमत?"

"नाय्! आत्तां नाय्! तूं नाटकाला येणारैस ना? मग कळेल आपच!"

काय करणारैत कोण जाणे! रात्रीं मी नि बनूवन्सं दोघी निघालों जोडीनं. पहात्यें तों सगळा मांडव चिक्कार भरला होता बायकापोरांनीं, नि मोठ्या माणसांनीं. अगदीं ओणी, नवशी, तवेगांव, मुकटी हितपर्यंतचीं माणसं आल्तीं.

तास-सवातासानं घंटा झाल्या, नि पडदा वर गेला. कुणी एक बाच्छा एका

खुर्चीवर बसून हेल काढून कुणाला कांहीं तरी सांगत होता. काय बोले तें कांहीं त्याच्या दाढीमिशांच्या जंजाळांतनं ऐकूं येनाय्. त्या सगळ्या कलकलाटांत कांहीं कर्ममुद्धां समजत नव्हतं. कुणी तरी मुमुनमान सरदार त्याला मुजरा करून छातीवर हात मारीत गेला एवढं दिसलं. वायका म्हणाल्या,

"हा सरदार तो व्यंकू ग्वोत हो!"

तेव्हां कुठं आम्हांला कळलं. मग शिवाजी आला. तो मात्र मीं ओळखला. केरूच तो. लांबच्या लांब माडाचा सोट. मागून त्याची आई म्हंजे हरि आला. मिशांचा काळपट भाग अजून तस्सा दिसत होता. शिवाजी आईपुढं गुडघे टेकून बसला, नि ती त्याच्या डोक्यावर हात ठेवून गाणं म्हणायला लागली. आहाहा! काय आवाज! काय गाणं! जशी रहाटाची करकर! तो प्रवेश झाल्यावर खैबरखान म्हंजे व्यंकूभावजी एका तरण्याताठ्या पोरीला ओढीत आले स्टेजवर. ती पोरगी रडत नि किंचाळत होती. वनूवन्सं म्हणाल्या,

"ओळखलास का वहिनी कोण तो?"

"नाय गो!"

"अगो, आमचा नारायण!"

"असं का? काय तरी बाई सोंग काढलींन्! अगदीं ओळखूं येत नाहीं हो!"

तेवढंच एक काम जरा बरं होत होतं.

ती बाई बिच्यारी गयावया करीत होती, भांडत होती, एकदां पदर खोंचून उभीहि राह्यली. तेव्हां आम्हांला बरं वाटलं. नी तिनं पट्टदिशीं कमरेचा सुरा काढलंन्, तेव्हां तर आम्हाला ब्रह्मानंद झाला. पण तो सुरा हिसकावून खैबरखान म्हणाला,

"तुला आम्ही आमच्या जनानखान्यांत नेणार!"

मर मेल्या! ती बाई किंचाळायला लागली,

"सोडवा हो! कुणी मला सोडवा!"

नि हे सगळे शंभ्ये करताहेत काय हितं बसून? कोणीच कसा धांवून जाईना तिच्या मदतीला?

तेवढ्यांत नाटक पहायला जमलेल्या मंडळींत गलगा झाला. एक कुणीतरी घोगडी पांघुरलेला पट्टदिशीं स्टेजवर चढला.

"अरे, तो नाहीं शिवाजी! मी शिवाजी!"

अग्गो बाई! हे त गणूभावजी! नि यांनीं हे शिवाजीचे कपडे, दाढीमिशा,

तलवार हें सगळं आणलीं कुठून!

खैबरखान म्हंजे व्यंकूभावजी ओरडले,

"गण्या—तूं?"

"गण्या नाहीं, शिवाजी!"

"तुझं पोट दुखत होतं ना?"

"ए खैबरखान, सीधा बोल! सोड तिला!"

"तूं नाहींस शिवाजी! जा हितून! नाटक होऊं दे धडपणीं!"

तेवढ्यांत आणखी एक शिवाजी स्टेजवर चढला! घोंगडी फेकून तो ओरडला,

"तो पसंत नाहीं? तर मग हा बघ! खरा शिवाजी! तुझ्या लंबूटांग्या केल्यापेक्षां दिसायला हजारपट चांगला!"

मांडलीं आहे काय यांनीं? हा तर माझा आबा! लोक आरडायला लागले,

"भले आबा! तूंच छान शिवाजी दिसतोस. आम्हांला आबाच शिवाजी हवा!"

व्यंकूभावजी किंचाळले,

"आब्या, बाजूला हो! नाहींतर थोतरींत मारीन."

"ए! शिध्धा बोल."

"अरे, जा शिध्धावाल्या!"

हें एवढं म्हणताहेत व्यंकूभावजी, तों ढुणदिशीं स्टेजवर उडी मारून आणीक एक शिवाजी त्यांच्यावर धांवला. गुजाभावजी! हो! तेच हे.

हा शिवाजी जो निघाला, तो सरळ खैबरखानाजवळ जाऊन त्याचं गचुंडंच धरलं त्यानं.

"तो नसेल शिवाजी. पण मी त आहें कीं नाहीं? गंडेच्च्या खैबऱ्या!"

"गुजा, सोड तूं! सोड बघूं मुकाट्यानं! ए, पडदा टाका रे!"

"कोण टाकतंय् पडदा? कुणाची माय व्यायल्येय्? तिला सोड अगोदर. का फोडूं तुझं एकेक बिंग?"

सगळा एकच काल्वा! मंडळी जल्लोश करायला लागली. शिव्या काय नि आरडाओरडा काय! गुजाभावजींचे तालीमवाले उभे राहून आरडायला लागले,

"साल्या खैबरखाना, पोरीला वरीत इलास तेवा?"

"गुजा, तूं सोड बरं का!"

"गुजा नाहीं, शिवाजी!"

"अरे, सोड!"

"नाहीं ऐकत? मंडळी! या खेबऱ्या व्यंक्यानं आजपर्यंत रंग्याची इष्टेट दाबली होतीन्! आजच ती आम्हीं जिंकून घेतली!"

नि मग पुढं काय झालं कांहीं कळलं नाहीं. सगळा जमाव उठून उभा राहिला. एकानं बत्तीवर काठी मारली. बाया आरडायला लागल्या, पोरं किंचाळायला लागलीं.

पण माझा पाय निघेना! स्टेजवर आवा. काय मारामारी होत्येय्! मंडळी पळायला लागली एकेक. पांच मिण्टांत मांडव मोकळा. हे तिघे शिवाजी खालीं उभे होते, नि त्यांच्याभोंवतीं गुजाभावजींची प्रभावळ.

मी पुढं शिरल्यें नि म्हणाल्यें,

"भावजी, चला बघूं घरीं!"

"चलतांय्! झालेंच काम. नाटक मोडलं रांडेच्च्यांनीं. नाहीं तर आम्हींहि भाषणं पाठ केलीं होतीं शिवाजीचीं."

तो सगळा गोतावळा घरीं आला. खोबरेल तेल लावून दाढीमिशा काढलीं. नि मग जो काय हंशाचा गदारोळ म्हणून सांगूं!

"रांडेच्चे नाटक करताहेत नाटक!"

मला कांहीं यांचं हें करणं आवडलं नाहीं. म्हणाल्यें,

"भावजी, नाटक मोडलंत, हें चुकलंच हो बाकी तुमचं! एवढी मंडळी गोळा झाल्ती!"

"कांहीं चुकलं नाहीं वहिनी. असं नाटक त्यांनाहि पाहिला मिळालं नसेल जल्मांत."

"कांहीं तरीच—"

"कांहीं तरीच? चार चार शिवाजी पाहिले होते का त्यांनीं कोण्या नाटकांत?"

माझं बोलणं हंशाच्या कालव्यांत ऐकूं गेलं नाहीं कुणाला. मी आंत गेल्यें, नि हंतरुणावर अंग टाकलं. सारखं वाटे, झालं हें कांहीं चांगलं नाहीं.

नि त्याचं प्रत्यंतर दुसऱ्या दिशीं आलं!



दुसरे दिवशीं समाराधना. पुरणाच्या पोळ्यांचा बेत होता. मी, बनूवन्सं, त्यांची आई, हरीची बायको, अशा पांचसात जणी सकाळीं अंग धुवून मारुतीच्या

देवळांत आलों. चरबीर आदल्याच दिवशीं करून ठेवले होते. धडाधडा चुली पेटवल्या, नि पुरणाचं, डाळीचं नी भाताचं, तिन्ही आधणं चढवलीं. कालची चर्चा चालूच होती.

"काय तरी रात्रीं केलीं!"

"काय करतील तें करोत. हें कांहीं चांगलं झालं नाहीं! चार गांवची मंडळी जमली होती. आपापल्या गांवीं जाऊन काय सांगतील? पडघवलीचा फज्जाच सांगतील ना तिखटमीठ लावून?"

यादोनाना, दामूअण्णांचा मुलगा, गुजाभावजी, एकेक जमायला लागले.

"अंबे, केळीचीं पानं चालतील, का पत्रावळी टांचूं?"

"कशाला पत्रावळी? चालतील कीं पानं."

यादोनानांना मीं खूण केली. ते बाजूला आले, तशीं म्हटलं,

"सगळा गांव येणारे ना जेवायला?"

"हो तर—मी सकाळींच घरोघरीं सांगून आलों."

"नाटकाबद्दल कुणी कांहीं बोललं का?"

"कुणी नाहीं. बाकी आश्चर्यच आहे!"

पुरणाच्या चरकावर बसले गणूभावजी. भराभर तवे टाकले, नि हा एवढा थोरला ढीग रचला पोळ्यांचा. भाताचीं आधणं ओयरलीं, नी मीं यादोनानांना सांगितलं,

"आमच्याकडून तयारी आहे हं!"

त्यांनीं पानं मांडायला घेतलीं मांडवांत, नि जोशाला म्हणाले,

"गोप्या, जा पाहूं! व्यंकूला म्हणावं, झालंय् सगळं. तुझीच खोटी आहे."

जोशी गेला, नि थोडक्या वेळांत सगळे जमले. बायकांनीं उजवं डावं वाढलं, आळवाची भाजी, आमटी, भात, पोळ्या—सगळीं पानं सजलीं.

पण कांहीं कुणी कुणाशीं बोलेना! यादोनाना म्हणाले,

"चला मंडळी! सोंवळीं नेसा."

भराभर सगळे सोंवळीं नेसले. नि मग व्यंकूभावजी मध्यें, नि त्यांच्या दुतर्फा त्यांचा सगळा कंपू बसला. गुजाभावजी म्हणाले,

"मी पाणी वाढायला थांबतों."

"कांहीं नको. आम्ही वाढूं. तुम्ही घ्या बसून."

गुजाभावजी आवा नि रंगूभावजींजवळ बसले. वरण वाढलं, नि बनूवन्संनीं

तूप वाढायला घेतलीं. पांचदहा पानं वाढून झालीं असतील नसतील, तेवढ्यांत व्यंकूभावजी उठून उभे राहिले.

"यादोनाना—"

"काय रे?"

"जरा पांच मिण्टं थांबू द्या अनशुद्द वाढणं."

"कां?"

"आम्हांला खरोखरीच जेवायला घालायचंय् का तुम्हांला?"

"म्हंजे?"

"अगोदर हो का नाहीं तें सांगा."

"अरे, म्हणतोस काय? सगळ्या गांवची वर्गणी. सगळ्या गांवकीचं जेवण. कोण कुणाला जेवायला घालणार?"

"व्याख्यान नकोय् मला. आम्हीं जेवावं असं वाटत असेल तुम्हांला, तर—"

"तर काय?"

"तर गुजाला उठवा पंक्तींतून!"

ताड्दिशीं गुजाभावजी उठले, नि म्हणाले,

"कां? का रे साल्या?"

"यादोनाना, तो शिव्या देतोय्!"

"दीन म्हंजे काय? आगखीनसुद्धां दीन! काहीं तुझ्याघरची पेज पिऊन नाहीं देत!"

"तूं ऐक गुजा! बस बघूं खालीं! बैस! असं काय करतोस व्यंकू?"

"तें कांहीं नाहीं. आम्ही त्याच्याबरोबर नाहीं जेवायचे."

"कां?"

"तें विचारूं नका!"

"सांग कीं रांडेच्च्या! कुणाचं काय डबोलं खाल्लंय् तुझ्यासारखं?"

"डबोलं खाणं बरं!"

"सांग कीं."

"यादोनाना, आतां तुम्ही विचारतांय् म्हणून सांगतों. हा रात्रीं बारा वाजतां अंधारांत म्हादेवाच्या घरांतून बाहेर पडला!"

जशी कांहीं वीज कोसळली!

"केव्हां?"

"नाटकांच्या तालमी सुरू होत्या तेव्हां. अंबावहिनी नि गुजा हीं दोघं--"

पुढचं कसं सांगूं? सांगत्येंच. हातांत भाताची वेळणी होती माझ्या. ती टण्णदिशीं खालीं पडली. दोघींचौघींनीं धरलं म्हणून बरं झालं. नाहीं तर मी खालींच कोसळायची.

नि तिकडे?

आबा नि गणूभावजींना धरलीं मंडळींनीं. पण चित्त्यासारखे गुजाभावजी जे उसळले, ते थेट व्यंकूभावजींच्या उरावर! व्यंकूभावजींचं डोकं खांबल्यावर आदळलं. खोक पडली. पण पुनः डोसकं धरून दणादणा आपटताहेत गुजाभावजी. केरू नि वासू त्यांच्या पाठींत फुलपात्रं घालताहेत. पण एवढा मोठा मारुती गुजाभावजी! तो काय आवरतो काय त्यांना?

शेवटीं यादोनाना धावले, त्यांनीं ओढलीं गुजाभावजींना.

"अरे गुजा, तूं शपथ घेतल्येस गुरूजवळ!"

"झक मारली शपथ!"

यादोनानांनीं हात धरलीं तेव्हां वर पाय देऊन काडदिशीं व्यंकूभावजींचा हात मोडीत गुजाभावजी ओरडले,

"भांचोदा—जा आतां! फौजदारी कर माझ्यावर!"

मला बायांनीं धरून घरीं नेलीं, नि डोक्यावर पाणी शिंपडलीं. शुद्धीवर आल्यें, तोंवरीं सताटजण येऊन अंगणांत बसले होते. गुजाभावजी तर जसे इंगळासारखे लालभडक झाल्ते.

यादोनाना फेऱ्या घालीत म्हणाले,

"बरं नाहीं झालं! बरं नाहीं झालं!"

"खूप छान झालं! साल्याचे तीन दांत पाडले! मारलंय् त इतकं कीं महिनाभर उठायचा नाहीं! नि हात मोडून ठेवलाय्! खूनच करणार होतों. पण म्हटलं, यानं टणकत राह्यलं पाहिजे चार महिने! वहिनीबद्दल अपशब्द बोलणारं थोबाड हें अस्सं सुजवलंय् टोसे मारून!"

नि मग पुढं?

पुढं दापोलीहून डाक्टर आणलीं. त्यानं औषधं केलीं. डोलींत घालून व्यंकूभावजींना कापास नेलीं. फौजदारी झाली. वारंट येऊन गुजाभावजींना पकडून नेलीं. भिकूनाना जामीन राह्यला. गुजाभावजी आले, नि त्यांनीं आबा नि रंगूभावजींना मुंबैस धाडून दिलं. त्यांना होडींत बसवून परतले, नि येऊन

मागल्या अंगणांत तुळशीपाशीं बसले.

"वहिनी!"

"काय भावजी?"

"हिकडे ये."

मी येऊन उभी राह्यलें भिंतीशीं. भरलेल्या गळ्यानं गुजाभावजी म्हणाले,

"सांग. तुझ्या मनांत माझ्याविषयीं—"

"भावजी—"

"बोलूं दे वहिनी मला. कारण व्यंक्या भर मंडळींत बोललाय्! तर तुझ्या मनांत संशय आहे का?"

"भावजी, आतां अधिक अंत पहाणार असाल, त मी उंबरठ्यावर डोस्कं फोडून घीन हां!"

"मग म्हण, तुझा आबा, गणू, तसा मी!"

"हो भावजी! तुळशीसाक्ष सांगत्यें. आबा, गणूभावजी, तसे तुम्ही!"

नि मग आम्ही दोघंहि खूप वेळ रडत होतों. डोळे पुशीत गुजाभावजी म्हणाले,

"वहिनी, मीं ठरवलंय्. खटला भांडायचा नाहीं."

"कां?"

"नाहीं भांडायचा."

"पण कां तें तर सांगाल कीं नाहीं?"

"एक तर मीं त्याला खूप मारलंय्."

"नि दुसरं?"

"दुसरं—दुसरं असं कीं वकील म्हणाला, कां मारलं हें सिद्ध करायला लागलों, तर तुझी साक्ष काढावी लागेल."

साक्ष! तोंड एवढंसं झालं माझं. तरी तशीच कशीबशी म्हणाल्यें,

"काय होईल तें करायचं."

"साक्ष काढायची?"

"हो."

"नाहीं काढायची! कोर्टांत काय हा नर्क उपशीत राहणार पडघवलीचा? त्यापेक्षां मीं शिक्षा भोगलेली काय वाईट!"

नि तसंच झालं. कोर्टांत गुजाभावजींनीं सांगितलीं,

“ मीं याला मारलंय्. कां मारलंय् तें सांगायची माझी इच्छा नाहीं. मला शिक्षा द्या.”

वकील म्हणाला,

“ अहो गुजाबुवा, तुम्ही ऐका!”

“ कांहीं ऐकायचं नाहीं !”

त्यांना नऊ महिन्यांची सक्तमजुरी झाली.

पण ब्यंकूभावजीहि कांहीं उठले नाहींत! जे आजारी पडले ते पडलेच. नि म्हणे रोज रात्रीं त्यांना गिरोबा दिसायचा! भ्यायचे काय, ओरडायचे काय नि आरडायचे काय!

नि एकटे ब्यंकूभावजीच नव्हेत—आणखी एक जण.



एकदां सकाळीं अंग धुवून शेवग्याच्या शेंगा शिजत लावल्या आमटीकरतां. तेवढ्यांत गणूभावजी हांकारीत आले,

“ वहिनी गो—”

“ काय हो?”

“ बाहेर चल बघूं!”

“ कां हो?”

“ तूं ये अगोदर.”

उभेलावणंच लावलं होतं. तेंच जरा नीट केलं, नी माजघरांत आल्यें, तों अंगणांत ही गर्दी!

एक मेणा, त्याच्याबरोबर चारसहा मुसुनमान म्हाताऱ्या नि चारसहा पुरुष. इंयसर नि थंयसर करीत बसलेत अंगणांत.

“ हें काय हो गणूभावजी?”

“ तुझ्याकडे आलेत हे.”

“ माझ्याकडे? नि ते कशाला?”

“ तें मला गो काय माहीत? मेण्यांतला दुखणेकरी आणलाय् त्यांनीं तुझ्या पायांवर घालायला! लुगडं बदल नि हिकडे ये.”

लुगडं बदलून बाहेर आल्यें, तों त्या चारसहा बायांनीं नि बाप्यांनीं जो काय गोंगाट सुरू केलाय्! सगळींच एकदम बोलायला लागलीं. एक शब्द कांहीं कळेना.

शेवटीं गणूभावजी उठले, नि वर हात करून आरडले,

"हें पा, तुम्ही सगळे मिळून असा फात्या कांहीं पडूं नका, काय समजलेत? एकेक जण सांगा."

तशीं मग एक मुसुनमान म्हातारा बोलायला लागला,

"बीबीसाब, हा खरा हाय म्हन्ना. आम्ही तुमच्याकरे इलांव पीरबाबाच्या सांगन्यापरमान."

"कोणता पीरबाबा?"

"सांगतांय्. मेन्यांतून आनला, तो माझा चचेराभाई. शिलिमान नाखवा."

सुलेमान? ह्यालाच त मुंबईला धाडला होता आंबे घेऊन!

"कारा रे, भाएर कारा त्याला."

मग चारचौघांनीं मिळून मेण्यावर कपडा टाकला होता, तो बाजूस केलीं. नि आंतून शिलेमानला बाहेर काढलीं. ईः! काय झालं होतं ग बाई भूत! पहावत नव्हतं. त्याला त्यांनीं माझ्या जवळ आणलीं. त्या सांपळयानं धापा टाकीत माझ्या पायांवर डोस्कं ठेवलंन्, नि खोल आवाजांत म्हणे,

"रहम! रहम! खोतीनबाय, रहम!"

मला कांहींच कळेना. रहम कसलं नि काय कसलं! बुचकळयांत पडून मीं विचारलं,

"कसला रहम बाबा?"

शिलेमानच्यानं बोलवेना. त्याला धाप लागली. तो डोकं जमिनीवर टेकून पडून राह्यला. तशीं तो म्हातारा म्हणाला,

"हितं एका आंब्यावर पीरबाबा हाय ना?"

गणूभावजी म्हणाले,

"गिरोबा?"

"हां हां, आमी लोग पीरबाबा म्हतांव, तुमी गिरोबा म्हतां."

"मग?"

"तो रोज रातीं याच्या शातीवर बसताय्!"

"अगोबाई! तो कां?"

"म्हताय्, का परघवलीला खोतनीची मापी मांग."

"म्हंजे?"

"त्याचा असां झालां खोतीनबीबी. तुमचे आंबे घेऊन शिलेमान गेला

हुमैला. तुमाला येऊन सांगलांन् कीं जौल झालां, नि झाज डुबलां."

"त्याला बरींच वर्षे झालीं."

"तो झाज कांई डुबला न्हाय—"

"मग?"

"जौल झालां. पर झाज हुमैला पोचल्यावर झालां."

"नि आंबे?"

"येंकूखोत नि शिलेमान, दोगांनीं इकून खाल्ले."

कर्म!

"त तुमी मापी द्या! रहम केल्याबिगर शिलेमान हितून हलायचा न्हाय्!"

आतां रहमच आहे म्हणावं! केला सारखा, न केला सारखा!

तशीं त्या मुसुनमान बाया लागल्या रडायला नि आरडायला. नको झालं. भोंवतीं येणारीं जाणारीं जमलीं. तशीं म्हणाल्यें,

"रहम आहे बाबा. जा हो! जा. मीं माफी केल्यै."

तशी त्या बायांनीं पदरांत बांधलेल्या मूठभर रेवड्या काढल्या, नि माझ्या हातांत द्यायला लागल्या. मीं घेतल्या, नि गणूभावजींना दिल्या. मग त्यांनीं शिलेमानला परत डोलींत ठेवलीं, नि ती मंडळी लोणचांब्याकडे निघाली.

"रांडेच्यानं असं केलंन् हां?" गणूभावजी म्हणाले.

मी कांहींच बोलल्यें नाहीं. मुकाट्यानं सैंपाकघरांत जाऊन बसून राह्यल्यें. सगळंच विश्वासारखं वाटायला लागलं. माणूस एवढा हा असतो? मेल्यांनीं आपल्या आंब्यांचे पैसे अगोदर काढून घेतले, नि पुनः तीनतीनदां सुतळींचे पैसे बजावीत होते!

पण केलेलं भोगावं लागतं हो! कांहींना याच जन्मीं, कांहींना पुढच्या जन्मीं. गणूभावजींच्यानं राहवलं नाहीं. त्यांनीं गांवभर जाऊन सांगितलीं. सगळा गांव छीःथू करायला लागला.

नि व्यंकूभावजी?

आजारी होतेच. डोक्याची जखम बरी होत्येशी वाटली, नि पुनः उपळली. किरीम पडले तिच्यांत. डाक्टरच्या खेपा सुरूच होत्या. आरडायचे काय नि ओरडायचे काय! गिरोबा रात्रंदिवस दिसायचा म्हणे. खाऊं द्यायचा नाहीं कांहीं.

एका दिवशीं सकाळीं पहातात तों व्यंकूभावजी नाहींत! मग शोधाशोध केली. त जिथं आक्कीनं जीव दिला, तिथंच त्यांचंहि प्रेत मिळालं! गुडघाभर पाण्यांत!

गणूभावजी म्हणाले,

"मी नाहीं जात!"

पण मीं म्हटलं,

"भावजी, माणूस गेलं, नि हेवेदावे संपले. जा हो तुम्ही! ऐका माझं."

तेव्हां मग गेले. परत आल्यावर म्हणाले,

"व्यंकूनं पत्र लिहून ठेवलंन्."

"काय?"

"अपील केलंय्, तें काढून घ्या म्हणे!"



काल्याची सून बाळंत व्हायची होती. तो संध्याकाळीं बोलवायला आला. रात्र-भर तिथं होत्यें. तिचा नवरा होता मुंबैस. तिची सुटका केली, तोंवेरीं उजाडलं. काल्या म्हणाला,

"व्हयनी, च्या करा, खा नि जा!"

"नको रे बाबा! घरीं जात्यें मी. थोड्या वेळानं ये. इवली मात्रा देत्यें आल्याच्या रसांत उगाळून, ती हिला चाटव म्हंजे झालं."

निघाल्यें घरीं. सड्याची उतरण उतरायला लागल्यें. तिथून सगळा ब्राह्मण-वाडा नि बागा स्पष्ट दिसायच्या.

मेल्यांनो! हीच का पडघवली? का पडघवलीचं भूत हें?

सगळ्या ओसाड बागा, नि उदासवाणीं घरं! खरं वाटेना मला. डोळे चोळले, नि आणखी कांहीं केलं, म्हणून का द्रिश्य का बदलतंय? खरं तें खरंच!

तो बांध पऱ्ह्याचा. ढोपरभर पाणी उरलंय् त्यांत. तो बाकीचा पऱ्ह्या. मागं गंगेसारखा वहायचा. नि आतां झाल्यै त्याची सरस्वती. ते केवढाले हत्तीसारखे धोंडे मात्र आहेत जागच्या जागीं. दरवर्षी अजूनहि जागा बदलत्यैय् त्यांची. तें जोशाचं घर. शाकारायला कौलं काढल्यैंत, त्यानं मरणकळा आल्यै त्याला. गिधाडानं खाल्लेल्या ढोरासारखं दिसतंय् तें ठोसराचं. केवढं वैभव होतं ठोसराच्या बागेचं! आतां एखाद्या बाईचे केस गळावे नि इवलीशी अंबुडी यावी हाताला, तसं झालंय्.

त्याच्या पलीकडे ती आमची बाग! नको तें पाहणं! एका पिढींत एवढा फरक! पडघवलींत आल्यें तेव्हां काय होतं नि आतां काय राह्यलंय्? परमेश्वरा,

बाबा, हें दाखवण्यापरीस नेत कां नाहींस तुझ्याकडे बोलावून ?

पलीकडे यादोनानांच्या खुरटलेल्या दहावीस पोफळी नि माड. शेजारीं शारदा—

शारदा ! शारदे, कुठं असशील ग तूं ?

असं वाटतंय्, यावं नि तुला कडकडून भेटावं ! पोटभर रडून घ्यावं ! कसं झालंय् बघ हें गांवाचं ! नि हें तुझ्या माझ्या पिढींत ग झालंय् असं !

गेली शारदा ! शेवटीं येत्यें बाई म्हणून सांगायलासुद्धां आली नाहीं. जा म्हटलं, मुकाट्यानं गेली. तिची ती बाग !

पलीकडे दत्तूअण्णा नि दामूअण्णांचे चार चार माड नि आठदहा पोफळी ! दामूअण्णांचा तो पडका आवसा. तीं गळायला लागलेली पडवी.

संपलं. खालचं कांहीं दिसत नाहीं. द्रिष्टीला दिसत नाहीं. पण मनाला कळतंय्. हें असेंच आहे खालीं.

या घरांपैकीं अंबूनानांचं घर आज ना उद्यां बंद होणारै. ठोसरहि भागत नाहीं म्हणतोय् दामूअण्णा—शारदा—नको !

सगळं धुकं पसरलं डोळ्यांपुढं, नि त्या धुक्यांत बोचकीं डोसक्यावर घेऊन गांव सोडणारीं माणसं दिसायला लागलीं ! गांवाकडे वळून वळून पहाताहेत, आसवं पुसताहेत नि पुढं सरताहेत. बोटींत बसताहेत. नि एकदां जीं जातात तीं कांहीं पुनः दिसत नाहींत !

मागून चिंगी नवलकरीण आली काठी टेकीत टेकीत. माझ्याकडे पाहून म्हणत्ये,

"कोन तां ? खोतीन का काय ? नि डोल्यांत पानी ?"

"नाय ग, कचरा गेला डोळ्यांत."

"बाय, हा धुका कसला ?"

"दिवसच आहेत वावधुळीचे. वर्सातून या दिसांतच एकदां येऊन जातं ना ? त्यांतलं आहे."

घरीं आल्यें, तों पर्शुरामाच्या उच्छावाहून कीर्तनकार परतले होते, त्यांतले एक औंधकर कपडेबिपडे काढून घाम पुशीत होते. गणूभावजी त्यांची चौकशी करीत होते. मला पाहिली तशीं बुवाच म्हणाले,

"काकू, अतिथि आलाय्."

"येऊं दे. घर अतिथीचंच आहे."

"सासवडकरबुवा—आतां झाले पार म्हातारे. अर्धांगाचा झटका आला. ते माझे गुरुजी. त्यांनीं पडघवलीची कीर्ति सांगितली. परशुरामीं आलों होतों. जातांना म्हटलं, पडघवली बघून जावी."

थोडा वेळ कांहीं बोलल्यें नाहीं. नि मग म्हटलं,

"बुवा, तुम्हांला यायला थोडा उशीर झाला."

"उशीर ? हो. पर्शरामाहून निघतांनाच—"

"आजचं नाहीं म्हणत मी."

"मग ?"

"बराच उशीर झाला—दहावीस वर्सं. एवढा उशीर करून कशाला आलांत ?"

एवढं बोलल्यें, नि सहन झालं नाहीं म्हणून घरांत निघून गेल्यें. असं कां झालं कोण जाणे. पण इवलंसं कुणी कांहीं बोललं कीं तें जिव्हारीं लागायचं, नि चटकन डोळे पाझरायला लागायचे. एवढाले प्रसंग मीं झेलले. पण आतां उतरत्या वयांत किनी, माणूस अशक्त होतं.

थोड्या वेळानं बाहेर आल्यें. बुवा अवघडून बसले होते. त्यांना म्हणाल्यें,

"बुवा, तुम्ही किनई रहा हो दोन दिवस ! घर तुमचंच आहे असं समजा. पण कीर्तनबीर्तन कांहीं व्हायचं नाहीं."

"कां ?"

"कीर्तन ऐकायला चार माणसं नकोत ?"

बुवा माझ्याकडे पहात राह्यले. तशीं मग गणूभावजींनीं समजावलीं,

"बुवा, गांवांत माणसं राहिलीं नाहींत."

"तरीच ! येतांना म्हणतोंय्, अगदीं रस्ता विचारण्यापुरताहि माणूस कसा भेटेना कुणी ! बरं. धुक्यामुळं रस्ता दिसेना धड. खूप भटकून शेवटीं आलों झालं एकदांचा."

बुवांची स्नानसंध्या उरकली, नि जेवायला बसले. जेवतांना म्हणाले,

"ऐकलंत काकू, ही कांहीं एकट्या पडघवलीचीच तऱ्हा नव्हे."

"मग ?"

"आज अक्षतृतीयेपासून महिना दीड महिना हिंडतोंय् कोंकणांत. सगळीकडे तीच परी. कुठं म्हणून तरुण चेहरा कांहीं दिसेना. सगळे म्हातारे नि पोरं. मुंबई बरं ही—मुंबई !"

"म्हंजे ?" गणूभावजींनीं विचारलं.

"रामायणांत ताटकेचं वर्णन आहे. दहा योजनं तोंड पसरून ती रामावर धावली. किती सृष्टि तिच्या पोटांत गडप झाली. तशी कलियुगांत मुंबादेवी राक्षसी झाल्यै. सगळं कोंकण चाटून पुसून खात्यैय् ती."

बुवा बोलत होते. राक्षशिणीचं वर्णन करीत होते. बाहेर पसरलेलं धुकं घरांत शिरलं होतं. नि त्यांत धूर. बुवांचा चेहरा कांहीं धड दिसत नव्हता. पण त्यांचा एकेक शब्द माझ्या मनांत जसा रुतून बसत होता.

ते बोलत होते. पाहिलं कोंकणांत तें सांगत होते. बाहेरून आलेले बुवा. उद्यां पुनः बाहेर जातील, नि तिकडे सांगतील,

"कोंकणचं हें असं झालं बरं का!"

दुसरा विषय निघाला, कीं मग विसरून जातील. पण आम्हीं? ज्यांनीं हें सगळं सोसलंय् त्यांनीं? त्यांनीं कसं विसरायचं हें? एकेक बाण जसा हितं या छातींत खोल जाऊन बसलाय्.

नि बुवांच्या वर्णनानं तें सगळं पुनः उपळलंय् वर.

कुणीं केली कोंकणची विदुळवाट? माणसानं का दैवानं? का दोघांनींहि?

कांहीं कळेना झालं. बाहेर धुकं पसरतंय्, तसं आंतहि धुकं पसरलं. एवढ्या वर्सांची सवै, म्हणून बुवा नि गणूभावजींना वाढलं, बाकी सगळं अन्न झांकून ठेवलं. जेवायची इच्छाच उरली नाहीं. जेव म्हणायलाहि कुणी नव्हतं.

देवासमोर चौघडी अंथरली, नि हात उशाशीं घेऊन पडून राह्यल्यें.

धुक्याचा जोर वाढत चालला. तिसऱ्या पारीं गडी आला, तो म्हणाला,

"गनूखोत, जौल होनार काय?"

"दिसतंय् तर तसंच रे बाबा! काय धुकं हें! अगदीं हातावरला माणूस कांहीं दिसेना."

बुवा म्हणाले,

"जौळ म्हंजे काय हो?"

"बुवा, जौळ म्हंजे वादळ हो! समुद्रावर वादळ होतं त्याला जौळ म्हणतात."

"म्हंजे वादळ होणार कीं काय? मग मी जाणार कसा?"

"न गेले. राहिले हितं जौळ ओसरेपर्यंत."

"फार भयंकर असतं का हो हें जौळ?"

"असतं कधीं कधीं."

❦ ❦ ❦

पण तें जौळ एवढं भयाकारी असेलसं कुणालाहि वाटलं नव्हतं.

धुकं इतकं वाढलं, कीं पसाऱ्याहून परतलेलीं गुरं कांहीं पुनः आवश्याबाहेर तोंड काढीनात. कसेबसे गणूभावजी पाण्याची पाळी फिरवून आले. पातेरी गोळा करायला गडी धाडले होते, तिकडंहि जायला झालं नाहीं त्यांना. तिसरा प्रहर उलटला नाहीं, तोंवरींच दिवस अस्तावल्याचा भास व्हायला लागला.

एवढं पाखरूं पडघवलीच्या रानांत, पण एकाचा कांहीं आवाज येईना. जसं कांहीं त्यांना होष्यमाण उमगलंच. सगळं चहूंकडे कुंद. झाडाचं पान कांहीं हालेना. नि धुक्याचे डोंगरच्या डोंगर आपले पडघवलीवर कोसळताहेत !

असा आठनऊ वाजतां जोशी कंद्या घेऊन काठी ठोकीत आला. गणूभावजी नि हरदासबुवा दोघे गोष्टी बोलत बसले होते झोपाळ्यावर. जोशी येऊन बसला त्यांच्यांत.

"गणूकाका, अरे पानाचं दे कीं!"

पान नखलीत तो म्हणाला,

"दरवर्षी एखाददोन वावधुळी होतात. पांचपंचवीस झाड मोडतंहि. पण आजचा फेरा वेगळाच दिसतोय् बरं का!"

हरदासबुवांनीं गांवाची एकंदर हकीगत गणूभावजीच्या तोंडून ऐकली होती. ते म्हणाले,

"करावं तसं भरावं! इस हात दे नि इस हात ले!"

"म्हंजे ?"

गणूभावजी म्हणाले,

"मी सांगतांय् म्हंजे काय तें. पडघवलीकरांनीं जें केलीं, त्याचं फळ आहे हें."

"तूं तरी कांहींच्या बाहीं बोलताहेस गणूकाका."

"कांहींच्या बाहीं? सांगूं का आतां? उलगडूं का एकेक सणंग?"

"जाऊं दे रे ! कोळसा उगाळावा तितका तो काळा."

मी ओसरीवरच गोष्टी ऐकत बसल्यें होत्यें. एकदां वाटलं, कीं जोशीहि कांहीं निर्लेप नाहीं. घ्यावी त्याची हजेरी. पण—

पण तेवढंहि त्राण उरलं नाहीं अंगांत. सगळं विषासारखं वाटायला लागलं. बराच वेळपावेतों तिघेजण बोलत बसले होते. पण माझं लक्ष कुणीकडे तरी भरकटत होतं.

शेवटीं जाऊन हंतरुणावर पडल्यें. पण झोंप कुठाय्? ती रुसली. काय होतं, काय झालं! काय होतं, काय झालं! मधूनच तिघांच्या बोलण्यांतला एखादा शब्द कानांवर पडे. पण मागचं पुढचं कांहीं कळायचं नाहीं.

एकेक चित्रं डोळ्यांपुढं दिसायला लागलीं. भंवतालीं धुकं, न् त्याच्यावर चित्रं. कळसूत्री भावल्यांसारखीं.

कधीं न पाह्यलेले चेहरे, पण डोळ्यासमोर दिसायला लागले. असं वाटे, हे केशवभट, हे राघोभट, हा गेंगाण्या!

आपला, माझ्या मनाचाच खेळ हो! खरं कांहीं नसेल. पण झालं खरं असं. हे सगळे मिळून गांव वसवताहेत. रान तोडताहेत, चोंढे पाडताहेत, घरं उभीं करताहेत, देवळं बांधताहेत, बांध रचताहेत, पाट खोदताहेत, बागा लावताहेत, एक नि दोन!

हें संपलं, नि मग आतेसासूबाई, मामंजी, हे पाह्यलेले चेहरे. सगळीं खपताहेत. कष्ट करताहेत. घाम गाळताहेत. नवीन वाढवताहेत—

नि मग आमची पिढी—

नको ग बाई! नको आतां. अगदीं देखोवेखीं पाहिलेल्या गोष्टी आहेत सगळ्या. हें एवढं गोकुळ—त्याचं हें स्मशान...आमच्या पिढीनं केलं...नको! नको!

पण नको म्हटल्यानं का थांबतंय् मन? जों जों नको म्हणत जाईं, तों तों दुप्पट जोरानं सगळं समोर येई. दम घोटायला लागला. असं वाटलं, आतां संपतंय् सगळं.

संपलं मात्र नाहीं. दुसरा दिवस उजाडला. उजाडला कशाचा? उजाडला नाहींच. आदल्या दिवसापेक्षां अधिक धुकं!

कथेकरीबुवा म्हणाले,

"असलं धुकं नव्हतं बुवा कुठं पाहिलं."

गणूभावजींनीं अगदीं [illegible] आठवण सांगितली.

"मी लहान होतों—दोन वर्षांचा. आई सांगायची कीं तेव्हां असलं जौळ झालं होतं. पण बुवा, काल आपलं तुम्हीं सांगितलंत, आम्ही हो म्हणालों. खरंच का हो हें पापाचं फळ आहे?"

"माझं नका ऐकूं बापड्याचं, शास्त्राचं तर ऐकाल किनी? एकदां काय झालं, प्रल्हादराजानं फार पुण्य केलं. इंद्र भ्याला. त्याला वाटलं, हा आपलं पद घेणार.

म्हणून तो ब्राह्मणाच्या रूपानं आला मागायला."

"प्रल्हादाकडे?"

"हो. त्यानं प्रल्हादाची संपत्ति मागितली, त्यानं दिली. पण पुनः आपला प्रल्हाद श्रीमंत! जें जें मागावं तें दिल्याबरोबर दुप्पट होऊन प्रल्हादाच्या घरीं परत यावं."

"खरंच?"

"खरंच त काय? थकला इंद्र. अगदीं पुण्यसुद्धां मागितलंन्. तरी तीच परी. शेवटीं त्याला सुचली युक्ती. त्यानं शील मागितलंन्."

"दिलंन् प्रल्हादानं?"

"मागितल्यावर दिलं पाहिजे. नि शील देतांच सत्य, धर्म, तेज, लक्ष्मी— सगळीं प्रल्हादाला सोडून गेलीं! शील होतं तोंवेरीं सगळं होतं. शील जातांच कांहीं नाहीं."

मी आपली ऐकत होत्यें. विचारावंसं वाटे. पण तोंडच उघडेना. काय झालं, कोण जाणे.

संध्याकाळीं बनूवन्संच्या आई आल्या. म्हणाल्या,

"सूनबाई, जौळाचा रंग दिसताय् गो!"

"हो बाई!"

"बघ ना! पान कांहीं हालत नाहीं. नुसतं धुकं भरलंय् पडघवलींत. लक्षण कांहीं बरं नाहीं. मी म्हणत्यें—"

"काय?"

"भारीच पाऊस कोसळायला लागला, त माझी वासरी मी तुझ्या आवश्यांत बांधीन हो!"

"बांधा कीं! त्यांत काय विचारायचं?"

"नाइ, विच्यारलेलं बरं. घरहि बहुतेक गळेलच. मेल्या वांदरांनीं घोसाळ्याचा वेल खाल्लीं त खाल्लीं, नी घरहि विस्कटून ठेवलीं. आमचा आवसा त भारीच गळणार हो!"

"मग आत्तांच कां बांधीत नाहीं वासरी? नि तुम्हीहि हिकडेच या झोंपायला. एकट्याच त अहांत."

"नको गो बाई! म्हणतात ना, आपलं घर नि शेणानी भर. असूं दे. भारीच कोसळला पाऊस त वांसरूं तेवढं आणीन हो!"

त्या गेल्या. जेवणं उरकलीं, नि पुन्हा जोशी येऊन बसला. त्यानं बुवांशीं कीर्तनाच्या इकडल्या तिकडल्या गोष्टी सुरू केल्या. मीं अंथरुणावर अंग टाकलं. भावजींनीं बुवांचं हंतरूण नि आपलं हंतरूण ओटीवर घातलं, नि ते गप्पांत मिसळले.

थोड्या वेळानं सूं सूं असा भयाकारी आवाज यायला लागला. मला वाटलं कीं माझ्याच कानांत कांहीं गेलं असेल. पण भावजीहि म्हणाले,

"वहिनी, आवाज कसला येताय् गो?"

उमगल्यें मी. भावजींना म्हणाल्यें,

"भावजी, अंगणांत भिजेलसं कांहीं नाहीं ना पहा एकदां. नि मांडवावर टोपलीखालीं कोकमं वाळताहेत, तीं तेवढीं खालीं काढा."

"आलं का काय भूत?"

"तसंच दिसतंय्."

भावजी कोकमं घेऊन खालीं उतरताहेत, तोंवेरीं आवाज वाढत चालला. नि ते कंद्या घेऊन अंगणांत पाऊल घालताहेत, तों असा झपाटा बसला वाऱ्याचा, कीं कंद्या विझून पार! लगेच भावजींनीं आंत पाऊल घेतलीं.

वारा कसला, भूतच तें! समोर कलम होतं, त्यावर झोत असा कांहीं आदळला, कीं वाटलं, मोडतं आतां. पण नुसतं एकच कलम नव्हे, सगळी बाग नाना परींच्या झाडांनीं भरली होती, तीं सगळीं झाडं हलायला लागलीं.

शिमग्यांत पालखी निघते. तिच्यावर चवरी ढाळतात. त्या चवरीसारखीं—एवढालीं झाडं, पण जशीं कांहीं ढाळलीं जाताहेत! फांदीला फांदी घासत्येय्. या झाडांच्या चवऱ्या ढाळणाऱ्याच्या जसं कांहीं अंगांत आलंय् नि तो पिसाळून या सगळ्या चवऱ्या ढाळतोय्. मोडतील तर मोडतील. त्याला काय त्याचं!

नको नको म्हणतां जोशी घरीं निघाला. त्याच्या हातांत कंद्या होता. एवढा थोरला माणूस, पण वाऱ्याच्या झपाट्यानं हिकडेतिकडे भेलकांडत चालला. धुळीच्या झोतांत तोहि दिसेना झाला.

भावजींना म्हटलं,

"भावजी, तुम्ही तुमचीं हंतरुणं आंत घ्या."

"हितं ओटीवर असूं दे कीं!"

"नको. पाऊस आला, तर शिंट ओटीवरसुद्धां येईल."

हंतरुणं आंत घेतलीं, नि ते दोघे पंचे पांघरून बसून राहिले. वाऱ्याचा आवाज

एवढा वाढला कीं, बोलायचीसुद्धां सोय नाहीं. कुणाचं कुणाला ऐकूं येईना.

नि तेवढ्यांत जसा कडा कोसळावा तसा आवाज झाला. भावजी ओरडले, "मोडलं झाड कुठं तरी!"

तेवढ्यानं भागलं नाहीं. एकामागें दुसरा, दुसऱ्यामागून तिसरा. आपलं मनांतल्या मनांत मोजीत असायचं. आमच्या घरासमोरचं कलम—तेंहि मोडेल कीं. हीं एवढीं मोडताहेत, त्यांत तेंहि.

मग काय होईल?

बरं होईल. पडघवलीच्या नाटकाचा शेवटला अंक तरी संपेल. देवा, कर एवढं! ऐक माझं!

पण देव बरा ऐकेल? त्याला कुठं ऐकायला येतंय्? कानांत दडे घालून बसलाय् तो.

कथेकरीबुवा चांगलेच हादरले. त्यांनीं केली स्तोत्रं म्हणायला सुरुवात. मोठमोठ्यानं म्हणायला लागले.

मागल्या दाराचा अडसर करकरत होता. भावजी उठले, नि त्या दारामागं उखळी, लांकडी पेटी, असं लावून पुनः येऊन हंतरुणावर बसले.

एक क्षणभर असं वाटे, कीं वाऱ्याचा जोर मंदावतो आहे. पण कसला कर्माचा मंदावतोय् तो? दुप्पट जोरानं सगळ्या रानाचं घुसळण पुनः सुरू व्हायचं.

शेवटीं वाट पहात होत्यें तें झालं. पार कानांचे दडे फुटतील एवढा गडगडाट ऐकूं आला, नि गारांचा सोसाटा कौलांवर वाजायला लागला! एक भूत पिसाळलं होतं, त्याच्या मदतीला हें दुसरं धांवून आलं. जसं कांहीं संगनमत झालंय् दोघांचं.

आमच्या घरावर दुहेरी कौलं होतीं. तरी त्या कौलांतून शिंट आंत यायला लागली. भरीला विजांचा कडकडाट! असं वाटायचं क्षणभर, कीं सगळ्या जगाला आग लागल्यै. दुसऱ्या क्षणाला पुनः अंधारायचं. आमच्या कंद्याचा उजेड, तोच तेवढा आसरा त्या अंधाराच्या नि कडकडाटाच्या खाईत. कथेकरी-बुवा उठले, नि त्यांनीं कंद्या आपल्या जवळ घेतलीं. तेवढाच बुडत्याला काडीचा आधार! नुसते थरथर कांपत होते. म्हंजे ब्रह्मज्ञान तेवढं आम्हांला सांगण्या-पुरतंच तर!

बनूवन्संच्या आईचं बोलणं आठवलं. एकदां वाटलं, सांगावं भावजींना त्यांच्या-कडून जाऊन यायला. पण या कहारांत सांगायचं तरी कसं!

मग वाटलं, होऊं दे काय होतंय् तें. देवाला बरं वाटतं तें करतो तो.

वारा नि पाऊस, दोन्हींचा आवाज सगळा एकंकार झाला. मधूनच एखादं झाड पडायचं, नाहीं तर गडगडायचं. घरांत गळायला लागलं. दोनचार ठिकाणीं तर धार धरल्यै जशी शिवलिंगावर. भांडीं ठेवायचीं तरी कुठं कुठं? मी नी भावजी, दोघं रात्रभर सामान तिकडचं हिकडं नि हिकडचं तिकडं करतोंय्.

पहाट झाली खरी, पण नुसती नांवाला. थेंबभर पाऊस कांहीं कमी नाहीं. उलटा जास्तीच. पुढलं दार उघडून पाहिलं, त अंगणांतून गंगामाई वाहत्ये जशी कांहीं. चहूं बाजूंनीं वरवंडयांवरून धो धो पाणी वाहून अंगणांत कोसळतंय्. घराच्या पलिकडे बागेकडे उतार होता. तिथं तर पऱ्हयाच झालाय्. पऱ्ह्या तरी कसला, महापऱ्ह्याच.

भावजींनीं डोसक्याला घोंगडी गुंडाळली, नि त्यावर इरलं घेतलं. मीं विचारलं,

"निघालांत कुठं?"

"आवशांत. ढोरांचं बघून येतां."

"नि हें बघा, शेजारीं जाऊन याल का?"

"यादोनानाकडे? कशाला?"

"संध्याकाळीं वासरी आपल्या आवश्यांत बांधायची म्हणून सांगायला आल्त्या."

"बारं बारं."

गेले खरे भावजी, पण दहा पावलं कुठं जातात न जातात, तों अशी कांहीं वीज कडाडली, कीं दे माय धरणी ठाय! मी किंचाळल्यें,

"भावजी, अहो भावजी—"

पत्ता नाहीं! जीव अगदीं जायला आला. वीज का यांच्यावर कोसळली! अगदीं गदगदून आलं. असं वाटलं, कीं खूप मोठ्यानं रडावं.

शाहामत भावजींची. थोडया वेळानं परतले. म्हणाले,

"काय पाणी! वाटलं का काय वाहून जातोंय्!"

"गळतोय् का आवसा?"

"तर काय! पारडी तर पार गारटली होती. म्हैस एवढी पाण्याची हौशी, पण अगदीं कांकडून गेली!"

"मग पारडीचं काय केलंत?"

"दिली सोडून. पिऊं दे म्हटलं, तेवढ्यानं तरी थोडा उबारा येईल."

"बरं केलंत. नि शेजारीं जाऊन आलांत?"

"दार ठोठावलं पुढलं बराच वेळ. पण कांहीं साद नाहीं."

"पावसांत नि वाऱ्यांत ऐकूं का जातंय् ?"

घरांत कोरडीं लांकडं होतीं, तीं पेटवलीं. कशीबशी अंग धुतल्यें, नि भात चढवला चुलीवर. मला भूक नव्हती. पण हे दोघे जेवायचे होते ना!

हरदासबुवांची बोलती अगदीं बंद झाली. सगळा वेळ हंतरूण धरून राह्यले. कसेबसे चार भाताचे घास गिळले, नि पुनः आपलं हंतरूण!

दिवसभर वारा नि पाऊस—अगदीं रात्रींसारखाच धिंगाणा. दिवसां थोडं अंधुक अंधुक दिसत तरी होतं. रात्र तर निभतां निभेना झाली.

बुवा रात्रीं एकदम उठले, नि भेदरलेल्या स्वरांत म्हणाले,

"गणूभाऊ!"

"काय हो?"

"प्रळय म्हणतात तो ओढवला वाटतं! आतां माझं कसं होईल हो?"

"आमचं होईल तसं तुमचं."

"बायकोमुलं तिकडं घाटावर—मी हितं—असाच वहात जाणार! शिव हरे! शिव हरे!" थोडा वेळ थांबले, नि पुनः म्हणाले, "दाभोळला चिंतुभाऊ गोगट्यांकडे मीं आरतीचे पैसे नि बिदागी ठेवली होती दाभोळच्या राम-मंदिरांतली—"

गणूभावजी हांसत म्हणाले,

"बुवा, जर आपण वहात गेलों ना, तर दाभोळ कांहीं वांचत नाहीं. पैसे ठेवले असतील, तर ते मिळतील."

"कसे? कुठं?"

"परलोकांत. तिथं खर्चायला होतील!"

पहाटे पहाटे पुनः वाऱ्याचा जोर वाढला, नि मग ब्रह्मांड कडकडलं! अगदीं आम्हांलासुद्धां हादरा बसला. गणूभावजी ताड्दिशीं उठून म्हणाले.

"कलम कोसळलं!"

मी पटकन् उठल्यें, नि त्यांचा हात धरून त्यांना जाग्यावर बसवलं. म्हणाल्यें,

"कोसळूं द्या."

"पण वहिनी—"

"पणबीण कांहीं नाहीं भावजी."

"तो आंबा आजोबांनीं लावला होता —"

"काय राह्यलंय् जुनं त्या आंब्यासाठीं रडायचं? सगळंच जातंय्. जाऊं दे. आपण नको म्हटल्यानं का तें थांबायचंय्?"

पहाट झाली नि दोन्ही महाभुतं विसांवलीं. अगदीं स्वच्छ उजाडलं. जसं कांहीं काल आकाशांत कांहींसुद्धां नव्हतं.

पहात्यें तों हरि दारांत उभा! गणूभावजींनीं विचारलीं,

"कां रे हरि?"

"चल बाबा!"

"कशाला?"

"रांडेच्ची आमच्या दारांत मरायची होती!"

"कोण?"

"यादोकाकी!"

मला वाटलं, कीं आतां धरित्री फाटत्येय्. पण फाटली नाहीं हो! हरि पुढं बोलत होता. शब्द नुसते कानांत शिरत होते. खांबाला धरलं होतं, म्हणून बरं झालं. नाहीं तर खालींच कोसळायची.

"झालं काय?" गणूभावजींनीं विचारलीं.

"व्हायचंय् काय? परवां रात्रीं ही पिशाच्चलीला सुरू झाली. आम्ही सगळीं जणं कोठीच्या खोलींत बसलों. म्हटलं, काय होतंय् तें होऊं दे. त मध्यरात्रींशी बाहेर येऊन आरडायला लागली!"

"काय?"

"म्हणे कीं गणूच्या आवश्याच्या वाटेंत पाणलोट वहातोय्. तुझ्या मागं पडवींत वांसरी बाधत्यें! तिच्या आवश्यापासून माझं घर जवळ, म्हणून मला ही शिक्षा!"

"मग?"

"कोकलत होती तासभर!"

"तूं उठला नाहींस दार उघडायला?"

"अरे, आकाश फुटून वहातंय्! कसा उठूं मी? भिजलों नसतों? खोकला कोण झालाय् मला!"

"ती बाहेर भिजतच होती ना?"

"कोण जाणे काय होत होतं तें! तासाभरानं आवाज बंद झाला. आमच्या

समोर मुचकुंदाचं झाड होतं—"

"हो—"

"तें मोडलं रात्रीं."

"नि मग?"

"त्याच्याखालीं सांपडून मेली झालं! आज आत्तां दिसली."

उठल्यें, नि धांवत सुटल्यें. पाहिलं त झाड छातीवर पडलं होतं. उताण्या पडल्या होत्या. एक दिवस पुरता होऊन गेला होता. हातांत दोरी तशीच होती. वासरी शेजारीं मरून पडली होती—बहुधा गारठून!

प्रेतावर पालथी पडल्यें, नि रडायला लागल्यें. शब्द कांहीं तोंडावाटे फुटेना.

गेल्या ना! जल्मभर कष्ट केले. अगदीं त्यागमीमागमीनुं'. नि मरतांनाहि वासरीसाटीं मेल्या. आमच्या घरीं कां हो आलां नाहींत? अगदीं देवघरांतसुद्धां बांधली असती तुमची वासरी!

अन् या चांडाळानं—

त्यानं खोकला वाढेल म्हणून दार कांहीं उघडलं नाहीं! तुम्ही बाहेर पावसांत—मुसळधारेंत भिजत होत्यांत तासभर—नि हा बायकोच्या उबेंत कोठींत बसला होता—राक्षस!

नको नको हें गांव! मुसुनमानांतहि असं करीत नाहींत कुणी!

जात्यें मी—

कुठं? कुठंहि. काशी, गया, प्रयाग, पंढरपुर—कुठंहि. आबाकडे जात्यें मुंबईला! पण या राक्षसांच्या गांवांत नको! नको!

भावजी त्यांचं सगळं उरकून आले. मी ओटीवर बसल्यें होत्यें. माझ्याकडे पाहून चमकून भावजींनीं हांकारलीं,

"वहिनी!"

मीं त्यांच्याकडे नुसतं पाहिलं.

"अगो, झालं आहे काय तुला?"

मी कांहीं बोलल्यें नाहीं. एकदम भावजी माझ्याजवळ आले, नि माझ्याजवळ बसून भरल्या गळ्यानं ते म्हणाले,

"वहिनी!"

त्यांच्या खांद्यावर डोकं ठेवलं, नि मी रडायला लागल्यें. असलं कसलं रडणं तें? तोंडावाटे शब्द नाहीं! भावजीहि रडायला लागले.

थोड्या वेळानं मी एकदम म्हणाल्यें,

"भावजी, मी जात्यें!"

"कुठं?"

"कुठं तरी! मुंबईला जात्यें आबाकडे—तिथून काशीला."

डोळे पुशीत भावजी म्हणाले,

"जा वहिनी! चार दिवस बाहेर जाऊन आलीस कीं बरं वाटेल तुला. चल, मी तुला पोंचवून येतों."

चार दिवस? नव्हे भावजी. आतां परत येणं नाहीं.



मी जायची हें कळलं, तशीं सगळा कुळवाडवाडा धांवला. त्यांतल्या कुणाचीं बाळंतपणं केलीं होतीं, कुणाला औषध दिलं होतं, कुणाची अडचण निभावली होती, कुणाचं कांहीं त कुणाचं कांहीं.

सगुणी म्हणाली,

"व्हयनीबाय, तूं जातीस खरी, मलाही न्हेये बरुबर! हंयसर करमायचा न्हाय्. बामनवाड्यांत येऊन टयेकायचा खंयसर?"

काल्याची बायको बोलली,

"सासूबाय्, तुमी गेल्यावर आमचा वो कोन करील?"

नाना परींनीं बायका बोलत होत्या. पण मी जशी वेड्यासारखीच झाल्यें. बोलणं नाहीं नि चालणं नाहीं. एक गोष्ट. जायचं. हितं रहायचं नाहीं.

मी मुंबईला येणार, हें कळतांच कथेकरीबुवा हरिखले. ते म्हणाले,

"हितं कांहीं कथा झाली नाहीं. पण मुंबईला ठाकुरद्वारच्या रामांत ऐकवतों तुम्हांला! ऐका तर खरी! असं ब्रह्मनिरूपण तुम्हीं आजवेरीं कुठं ऐकलं नसेल. गुरुजींनीं कीर्तनभूषण पदवी दिल्यै मला!"

गणूभावजी म्हणाले,

"ब्रह्मनिरूपण सावकास ऐकवा वहिनीला. पण जातांना दाभोळला गोगट्यां-कडून पैसे घेणं तेवढं विसरूं नका म्हंजे झालं!"

कर्माचं ब्रह्मनिरूपण!

दुसऱ्या दिवशीं पौर्णिमा. भावजींनीं बोटीचा पत्ता काढला, नि बांधाबांध करायला सुरुवात केली. नाना परी बांधत होते ते. पोह्यांचे पापड, आमसुलं,

कडवे, वाल, दगड नि धोंडे. ते नि गडी, दोघे ..कीं बांधीत होते. येताजाता मदत करीत होता.

माझं कशांतच लक्ष नव्हतं. मोडलेल्या कलमाच्या फांद्या पार दारांत पोंचल्या होत्या. त्यांच्याकडे पाहून असं वाटे, मोडली पडघवली! गेली!

जोशी, टोसर, केरू, सगळे येऊन गेले. सगळे पडझडीचं रामायण सांगत होते. मारुतीच्या देवळावर गेंगाण्याच्या आंब्याची फांदी कोसळली म्हणे. कोसळूं दे. पार सगळं मोडूं दे. करायचं काय राहून?

संध्याकाळ झाली. ओट रात्रीं बारा वाजतां सुटायची. हितून नऊला होडींत बसायला हवं. भावजींनीं भात टाकला, नि आग्रहानं इवला दहीं-भात जेऊं घातला.

हात धुवायला परसांत गेल्यें. लख्ख चांदणं पडलं होतं. पावसानं धुवून गेल्यानं पोफळींचे शेंडे चकाकत होते. त्यांतच पडलेलीं झाडं दिसत होतीं.

ती तुळस, तें मामंजींनीं लावलेलं मोगरीचं रोप, तो चिकू, तो पपनस

नाहीं—नाहीं—जायचं! जायचं! जायचं!

ही कोठी, तो घरटा, त्या कणग्या, ही लांकडी पेटी—

ऊंहूं! जायचं!

हात धुतले, नि एकदम अंगणांत येऊन डोळे मिटून बसल्यें. त्या घराकडे पाहणं नको!

साडेआठ झाले. आमचे गडी नि त्यांच्या बायका—कुळं, त्यांच्या म्हाताऱ्या, उरल्या सुरल्या—सगळ्या गोळा झाल्यैत.

म्हणताहेत,

"व्हयनीबाय्, लई दी नका ऱ्हाऊं बरां काय! लवकर या!"

बायांनो, हें शेवटलं जाणं. आतां यायचं नाहीं.

साडेआठाचा सुमार होऊन गेला. हितून खाडी म्हंजे नाहीं म्हटलं तरी अर्ध्या तासाची वाट. भावजी म्हणाले,

"चलायचं वहिनी."

कळसूत्री भावलीसारखी उठल्यें. अगदीं घराकडे पाहिलंसुद्धां नाहीं. यादोनानांचं घर, शारदेचं, एकेक मागं पडतंय्.

लहानपणीं याच वाटेनं एकदां सतीवर दिवा लावायला गेल्तों आम्ही तिघी चौघी. त्यांच्यापुढं ही सांवट.

माणसं बरोबर येताहेत पोंचवायला. वाटेंत झाडं पडलीं आहेत. संभाळू

चलायला सांगताहेत. कराकरा वहाणा वाजताहेत. फटाफटा काठ्यांचे आवाज होताहेत.

अगबाई! उसासे कोण टाकतंय्! अगदीं जवळ—कोणी तर नाहीं!

"चल वहिनी, पाय उचलायला हवेत. बोट मिळाली पाहिजे."

पडघवली मागं पडल्येय्. पायांत गोळे येताहेत. तरी यंत्रानं लोटल्यासारखी चालल्यें आहें.

कोळीवाडा दिसायला लागला. तिथं होडी तयार आहे. तींत बसलं कीं दाभोळ. दाभोळला बोट उभी आहे. विजेचे दिवे हितून दिसताहेत. बोटींत बसलं कीं मुंबई—

माझी बाई ती! पुनः उसासे! अगदीं कानांशीं!

पाहिलं त कोणी नाहीं!

अंगाला घाम सुटला. तरी तशीच चालल्यें. मला पडघवलींतून बाहेर पडायचं आहे!

हा कातळ—त्या करवंदी—तें खिरणीचं झाड—ती केकताडी—

नाहीं. मी जाणारें.

बंदर आलं. आणखी कांहीं माणसं जायच्यैत. भावजी म्हणताहेत,

"काळू, नाळेवर वहिनीसाठीं जागा ठेव. अगोदर हे बोजे घ्या. बाकी माणसं बसूं देत. चला, आवरा लवकर."

नाव भरायला लागल्यै. आतां मी जाईन—कुठं? मुंबईला!

मुंबईला? मीहि मुंबईलाच? पडघवली सोडून?

एकदम मागं पाहिलं. जसं कांहीं कुणींतरी मला वळवलं धरून.

अग बाई! मला भ्रम होतोय् कीं काय? मग हें दिसतंय् काय मला?

गिरोबा?

हो! तोच! पिकलेला म्हातारा—डोईवर पागोटं—बाराबंदी—

मला बोटानं दाखवतोय्—

मामंजी? आतेसासूबाई? हे? नि त्यांच्या मागं पडघवली? साक्षात् पडघवली? वाडवडिलांनीं वसवलेली? माडापोफळीनीं झांकलेली?

त्यांना सोडून मी चालल्यें? आपला जीव घेऊन चालल्यें? पळून? सगळीं गेलीं, म्हणून मीहि चालल्यें?

नाहीं! मी जाणार नाहीं! मी जाणार नाहीं! मी जाणार नाहीं!

कसेबसे माझ्या तोंडून शब्द निघाले,

"भावजी!"

"काय वहिनी?"

"मला जायचं नाहीं."

भावजी पटकन् माझ्याजवळ आले, नि म्हणाले,

"नाहीं जायचं?"

"नाहीं! पडघवली सोडून नाहीं जायचं."

क्षणभरच भावजी उभे राह्यले. माझ्याकडे निरखून पाह्यलं नि मग हात उभावून आरडले,

"काल्या, बोजे काढ खालीं."

"कां वो खोत?"

गणूभावजी आनंदानं गहिंवरून म्हणाले,

"विचारताएस काय बावळ्या? वहिनी पडघवली सोडून जायचं नाहीं म्हणत्ये!"

